# मांडवी ! तूं आटलीस ?

मांडवी ! तूं आटलीस ?

लक्ष्मणराव सरदेसाई

किंमत सहा रुपये

*

पूज्यवर्य

**काकासाहेब कालेलकर**

यांस अत्यादरपूर्वक.

*

# दोन शब्द

प्रो. लक्ष्मणराव सरदेसाई हे मराठीचे एक सिद्धहस्त कथालेखक आहेत. महाराष्ट्रांत त्यांची ख्याति शृंगार-चतुर आणि सौंदर्यकुशल लेखक म्हणून असली तरी गोमंतकाच्या हृदयसौंदर्याप्रमाणेंच गोमंतकाच्या सामाजिक सामर्थ्याचें चित्रणहि त्यांनीं तितक्याच प्रभुत्वानें केलें आहे हें त्यांच्या "ढांसळलेले बुरुज" या कथा-संग्रहावरून दिसून येईल. त्यांच्या रससिद्ध कलमांतून निर्माण झालेली ही त्यांची पहिलाच कादंबरी आहे. जवळ जवळ तीन वर्षांमागें ही लिहिली गेली. १९४६ त गोमंतकात जी अपूर्व क्रांति सुरू झाली आणि अजून चालू आहे तिच्या अंतःप्रवाहांचें दर्शन त्यांना आधींच कसें होऊन चुकलें होतें, त्याचें प्रत्यंतर या कादंबरींत दिसून येईल. या क्रांतीचे ते केवळ द्रष्टेच नाहींत तर तिचे एक आवाडीचे वीरहि आहेत. तिच्यापायीं त्यांना तीनदां कारावास भोगावा लागला असून आज ते आग्वादच्या प्रसिद्ध तुरुंगांत विनाचौकशी बद्ध आहेत. अशा या तेजस्वी साहित्यिकाच्या या पहिल्या कादंबरी-मुळें नवगोमंतकाचें महाराष्ट्राला योग्य दर्शन घडेल आणि तिचें योग्य स्वागत होईल अशी आम्हांस उमेद आहे.

—बा. भ. बोरकर

# १

वर्ग संपवून अशोक घरीं आला. या दिवसांत त्याला मनःस्वास्थ्य कसें तें नव्हतें. रोज कोणती तरी क्षोभजनक घटना घडून येई. मागेंपुढें सगळीकडे त्याला अंधार दिसत होता. या अंधारांतून मार्ग काढणें मोठें कठीण होतें.

आतां त्यानें मेजावर पडलेलें टपाल चाळलें व त्यांतलें एक पाकीट फोडलें. तो ज्या शिक्षणसंस्थेंत काम करीत होता तिच्या कार्यकारी मंडळाच्या अध्यक्षांचें तें पत्र होतें. त्यांतला मजकूर त्यानें कल्पनेनें ताडला. पण पत्र वाचल्यानंतर त्याला दिसून आलें कीं तो मजकूर त्याच्या कल्पनेच्याहि पलीकडचा आहे. तो वाचतांच त्याचें मन चवताळून उठलें. संस्थेचे अध्यक्ष लिहीत होते, 'तुम्ही संस्थेचे नोकर आहां हें विसरतां... माझी कमिटी तुमचें हें वर्तन चालूं देणार नाहीं. आमच्या आज्ञेप्रमाणें ज्यांना वागावयाचें नसेल त्यांनीं संस्थेंतून निघून आम्हांला वाट मोकळी करून द्यावी हें उत्तम...'

त्याच्या जिवाची तडफड झाली. आपल्या तपाला काय हें फळ आलें! संस्थेची आजची नवी सृष्टि आपण निर्माण केली; आपल्या हृदयाचे धागे मिळवून आपण हा गोफ तयार केला; आतां तोच आपल्या गळ्याला बसत आहे. राजीनामा मागायाचा कां !

पण त्या संस्थेंत अशोकनें आज दहा वर्षें काम केलें होतें. स्वार्थत्यागाच्या तत्त्वावर त्यानें संस्थेच्या कार्याला स्वतःस वाहून घेतलें होतें. त्याच्या स्वाधीन संस्था करण्यांत आली; तेव्हां तिची स्थिति सगळ्याच दृष्टींनीं शोचनीय होती. तिला नवजीवन देऊन त्यानें तिची पुनर्घटना केली होती. संस्थेचा तो आधार होता आणि संस्था त्याचा आधार होती. कारण, तेवढेंच त्याच्या चारितार्थाचें साधन होतें.

त्याचा कणखरपणा हाच त्याचा अपराध ठरला. त्याची मनोवृत्ति मूलतःच स्वतंत्र आणि स्वाभिमानी असल्यामुळे नोकराळ वृत्तीच्या अधिकाऱ्याच्या जुलमी हुकुमांना मान तुकवणें त्याला साधलें नाहीं. त्यानें त्यांच्या मूर्ख अरेरावीचा प्रतिकार केला.

तत्त्वशील जीवनाला साजेल अशा राजीनाम्याशिवाय त्याला दुसरा मार्ग दिसेना. पण हा प्रश्न साधा नव्हता. व्यवहाराचीं बंधनें त्याला अडवीत होतीं. कुटुंबाच्या पांच सात मंडळींच्या निर्वाहाची जबाबदारी त्याच्यावर होती. घरची गरिबी होती. वडील सेवानिवृत्त सरकारी नोकर होते.

त्यानें दुसरें पाकीट फोडलं. तें त्याच्या चुलतभावाचें होतें. तो पणजीला लिसेवचें शिक्षण घेत होता. त्यानें पत्रांत पन्नास रुपयांची मागणी केली होती. त्याच्या शिक्षणाचा खर्च अशोक चालवीत होता. त्याची आई आणि त्याचीं दोन भावंडें यांचाहि भार त्याच्यावरच होता.

हिराचा आवाज त्याच्या कानांवर पडला. हो. हिरा अन् त्याची निराधार काकी, तिचीं तीन मुलें, त्यांचें शिक्षण......हा सारा संसार त्याच्या जिवावर चालला होता. कशावर विसंबून आपण आतां राजीनामा देणार ? यापेक्षां सरकारी नोकरी काय वाईट होती ? ज्या भीतीमुळें आपण सरकारी नोकरी टाळली ती भीति शतपटीनें भयाण होऊन स्वतंत्र शिक्षणसंस्थांतून नंगा नाच घालीत आहे, असें त्याला वाटलें.

भेकडांच्या राज्यांत स्वाभिमानाला अस्तित्व असूं नये काय ? स्वत्वाला उद्धटपणाचें स्वरूप यावें ? स्वावलंबी आयुष्यक्रमावर नालायकीचा शिक्का असावा ? पण परिस्थितीचा भोंवरा भयानक होता. आसपासच्या सगळ्या वस्तू या ना त्या तऱ्हेनें त्यांत सांपडत होत्या. समाजाच्या गुलामी मनोवृत्तीच्या या साऱ्या आपत्ती होत्या. त्यांचा संसर्ग टाळणें कुणालाच शक्य नव्हतें. सरपटणाऱ्या प्राण्यांना ताठर चाल असह्य झाली तर नवल नाहीं. 'हां जी' चा मंत्र दिवसरात्र पुटपुटणाऱ्या जिवांना संस्थांच्या अधिकारपदावर नेऊन बसविलें म्हणजे त्या संस्थांच्या लहानमोठ्या सगळ्या सेवकांनीं 'हां जी' चे मंत्रघोष चालू ठेवले नाहींत, तर त्यांच्या अस्तित्वाला बाधा आल्याशिवाय कशी राहील ? स्वतःच्या नोकराळ मनोवृत्तीच्या मापानेंच ते इतरांचे व्यवहार मोजूं पहात होते.

पण अशोकची तत्त्वनिष्ठा प्रखर होती. तिच्या पायींच त्यानें हें त्यागी जीवन पत्करलें होतें. या बाबतींत तो इतरांपासून कितीतरी दूर होता. सगळ्या सुशिक्षितांचा, बुद्धिमंतांचा वर्ग नोकरशाहींत रमून गेला होता. हीन लौकिक सुख हेंच त्यांचें ध्येय होतें. स्वाभिमान, स्वार्थत्याग, लोकसेवा, ही त्यांच्या दृष्टीनें वायफळ बडबड होती. स्वार्थ आणि सुख हें त्यांचें ब्रीदवाक्य होतें. मागच्या पुढच्या तीन पिढ्या याच कार्यांत व्यग्र होऊन गेल्या होत्या.

लोकसेवेच्या तत्त्वानें प्रेरित होऊन दहा वर्षांपूर्वी तो या संस्थेंत शिरला होता. त्यापेक्षांहि मोठ्या तत्त्वाच्या स्फूर्तीनें संस्थेला रामराम ठोकण्याची त्याच्यावर पाळी येऊं पहात होती. सत्य आणि न्याय यांची गळचेपी होते म्हणून त्याला सरकारी नोकरी नको होती. व्यक्तिविकासाला जेथें वाव नाहीं, तेथें आपल्या सहकार्याची गरज नाहीं असें त्याला लहानपणापासून वाटत आलें होतें. परसत्तेच्या सेवेंत माणुसकी हळूहळू मरत जाते हें त्याला स्पष्ट दिसत होतें आणि म्हणूनच नोकरीच्या

या मायावी नगरीकडे पाठ करून तो या माणुसकीच्या आश्रमांत आला होता. पण गेल्या तीन वर्षांत त्याला दिसून आलें कीं पवित्र आश्रमालाहि नरक बनवणारीं माणसें आहेत. आपल्याला माणुसकी मारावयाची नाहीं, आपल्याला हा नरक नको...त्याचा निश्चय ठरला होता. परस्पर विरोधी विचारांनीं त्याचें मन द्विधा होत होतें. अशा मनःस्थितींतच त्यानें तिसरें पत्र वाचावयास घेतलें. त्यांत संस्थेशीं संबंध असलेल्या त्याच्याच एका प्रतिष्ठित आप्तानें लिहिलें होतें, 'आपल्या प्रकरणांत आम्हांला कांहींच करतां येत नाहीं याचें वाईट वाटतें. आपली बाजू न्यायाची आहे हें खरें, परंतु कार्यकारी मंडळाच्या अध्यक्षांशीं आमचे संबंध सलोख्याचे असल्यामुळें आम्ही या प्रकरणांत प्रत्यक्ष असें कांहीं करूं शकत नाहीं. संस्थेच्या चालकांचें आजचें धोरण संस्थेला घातक आहे हें स्पष्ट दिसत आहे. तरीहि आपल्या तत्त्वांना आपण चिकटून राहिलां तर व्यवहाराच्या दृष्टीनें आपलेंच अहित होण्याचा संभव अधिक आहे. म्हणून आपण विचारपूर्वक पाऊल टाकावें असें आम्हांस वाटतें.'

हा मजकूर वाचून अशोकची तळमळ अधिकच वाढली. जेथें तेथें ढोंगाचा बाजार ! हें पत्र एका पुढाऱ्याचें होतें. सार्वजनिक प्रश्नाच्या बाबतींत त्याची मनोवृत्ति ही अशी दुबळी होती. त्याच्या दृष्टीनें सत्यापेक्षां स्नेहसंबंधाची किंमत अधिक होती. संस्थेच्या कल्याणापेक्षां खाजगी ऋणानुबंध त्याला अधिक महत्त्वाचे वाटत होते. असल्या पुढाऱ्यांच्या नेतृत्वाखालीं नवी पिढी वाढत होती. गोमंतकाच्या एका प्रमुख पुढाऱ्याचे ते शब्द होते.

आतां त्याच्या मनांतील काहुराचा कांटा एका निश्चयावर स्थिर झाला. मोठ्यांचा हा दुबळेपणा पाहूनच त्याला नवें धैर्य आलें. आपलें आयुष्य हा एक झगडा आहे. सत्याच्या उपासकानें हा झगडा आनंदानें, धैर्यानें, शांतपणानें लढवला पाहिजे. लौकिक सुखासाठीं नाहीं, तर आत्म-

समाधानासाठीं लढवला पाहिजे. आयुष्यांतल्या या पायऱ्या आहेत. त्या चढतच आपल्याला वर गेलें पाहिजे. भीति आहे, संकटें आहेत त्यांना तोंड दिलें पाहिजे. ती तयारी नसली तर ज्या तत्त्वांवर आपण आपला जीवनक्रम अधिष्ठित केला त्यांच्याशीं द्रोह केला पाहिजे. तें आपल्याला कदापि शक्य नाहीं. कारण, तो आपला आत्मघात होईल.

तो खोलींत येरझारा घालूं लागला. मनाप्रमाणें शरीरालाहि त्यानें गति दिली. त्याचा निश्चय ठरला. समोरच्या सुरूच्या वृक्षराजींतून वारा सोसाट्यानें वहात होता. खालच्या ओढ्यावर चार पांच तरुण परटिणी कपडे धूत होत्या. मावळत्या उन्हांत पाण्याचा प्रवाह सर्पाप्रमाणें चमकत धांवत होता. लहानमोठ्या टेकड्यांनीं क्षितिज झांकून टाकलें होतें.

असल्याच प्रसंगांनीं व्यक्तिमत्व बनत जातें अशी त्याची श्रद्धा होती. त्यानें पेन उचललें व राजीनाम्याचा मसुदा तयार केला.

‘ हुकुमशाही मनोवृत्तीनें आपण सध्यां संस्था चालवीत आहां. याचे दुष्परिणाम आतांपासूनच दिसून येऊं लागले आहेत. आपल्या जुलमी व एकतंत्री कारभाराला सुरवातीपासून मी विरोध दर्शवीत आलों आहें. चालक, शिक्षक व विद्यार्थि या तिन्ही वर्गांत ऐक्यभाव असल्याशिवाय संस्थेचा उत्कर्ष अशक्य आहे. शिक्षकवर्गाला तुडवून तुम्ही पुढें जाऊं पाहतां. न्यायनीतीची तुम्हांला कदर नाहीं. त्यांचे अर्थ तुम्ही तुमच्या लहरीप्रमाणें फिरवतां आणि त्याप्रमाणें शिक्षकांनीं वागलें पाहिजे, असा तुमचा आग्रह आहे. अशा स्थितींत तुम्हांला विरोध केल्याशिवाय मला गत्यंतर नाहीं. सत्तेच्या बळावर तो विरोध तुम्ही हाणून पाडूं शकतां. पण या झगड्यांत संस्था बळी जाते हें तुम्ही विसरतां. संस्थेचा मृत्यु मला स्पष्ट दिसत आहे. त्याला अंशतः देखील मी जबाबदार व्हावें, हें मला नको आहे. म्हणून मी संस्थेंतून निघून जात आहें. ’

त्याचें मन हलकें झालें. या समाधानांत त्याला भावी अडचणींची क्षिति वाटली नाहीं. साऱ्या सुखसोयींनीं स्वतःला वेष्टून घेऊन आपणाला पुढें पाऊल टाकतांच यायचें नाहीं. परिस्थितीचीं दुःखें, तत्त्वनिष्ठेचा आधार, आयुष्यांतल्या उच्च मूल्यांवरील आपली श्रद्धा, या सगळ्यांचें गांठोडें पाठीशीं बांधूनच आपणाला मार्गक्रमण करावयाचें आहे. आपण जेते आहों; जित नाहीं. आपल्याला वीराचें तत्त्वज्ञान अनुसरायचें आहे; भागूबाईचें नव्हे.

त्यानें बहिणीला हांक मारली.

हिरा धांवतच बाहेर आली. आठ वर्षांची पोरगी, भावाची प्रतिमा. त्याच्यापेक्षां किंचित् गोरी. चेहरा आकर्षक व तरतरीत. विलग ओठांतून दांतांच्या कण्या चमकत असलेल्या.

' अशी इथें ये. '

ती त्याच्याजवळ आली.

' आज किनई आमच्याकडे एक भिकारी आला होता. ' तिनें म्हटलें.

' भिकारी नेहमींच येतात. ' त्यानें तिला जवळ ओढीत म्हटलें.

' पण आजचा भिकारी वेगळाच होता. त्याला हातभर दाढी होती.

' एवढंच ना ? '

' अन् तीन मुलें होतीं. '

' अन् त्यांची आई कुठं होती ? ' अशोकनें प्रश्न केला.

' त्यांची आई म्हणे वारली. म्हातारा आंधळा आहे. मुलें त्याला वाट दाखवतात. '

'मग, तूं काय भिक्षा घातलीस त्यांना ? '

'काकींनें त्यांना पेज घातली. मीं माझा जुना परकर भिकाऱ्याच्या मुलीला दिला. मग म्हाताऱ्यानें एक छान गाणें म्हणून दाखवलें. '

' म्हणून दाखवशील तें गाणं ? '

तिनें जरा ओशाळून आढेवेढे घेतले. हें पाहून त्यानें म्हटलें, 'गाणं म्हटलंस तर मी तुला शांतादुर्गेला घेऊन जाईन. '

' खरंच ? '

' हो. म्हण आतां '

हिरानें केंसांवरून हात फिरविला, खिडकींतून बाहेर नजर टाकली आणि आवाज चढवून गाणं म्हणायला सुरवात केली.

हंसाचा चारा न इच्छिती वायस ॥
आणि मेल्या मांस । भक्षितील त्यांचे ॥ १ ॥
अग्नीमाजी सती एकलीच जळे ॥
आणि पहावया मीळे । सकळ जन ॥ २ ॥

अशोकच्या मनाचा सगळा शीण ओसरला. त्याच्या चित्तवृत्ती आनंदित झाल्या. विलक्षण मार्दवानें त्याचें अंतःकरण भरून आलें. ध्येयवादाचा कणखरपणा कलासक्तीच्या वेषांत चमकूं लागला. तत्त्वनिष्ठा व कलासक्ति हे त्याचे स्वभावविशेष थोड्याच अवधींत उत्कटपणें दिसून आले.

आतां त्याची मुद्रा पूर्णपणं बदलली. निश्चयानें दबलेले ओठ विलग झाले. डोळ्यांतलें काठिण्य मधुर झालें. गांभिर्याच्या छटेवरून बालिशते-चा कुंचला फिरला गेला. कलेच्या सुंदर आवरणाखालीं ध्येयाचें रूप मोठें मोहक दिसूं लागलं,

" चला, आतां आपण फिरायला जाऊं. तूं कपडे करून ये अन् रामलक्ष्मणाला इकडे पाठवून दे. " अशोकनें बहिणीला म्हटलें.

हिरा धांवतच आंत गेली. शांतादुर्गेला भेट दिल्याला आज तिला किती तरी दिवस झाले होते. तें देऊळ तिला फार आवडे. तेथील दृश्याचें विस्मरण तिला कधींच पडत नव्हतें. त्या सुंदर चिमुकल्या तलावा-

ची मोहिनी तिच्या बालमनावर कायम होती. देवळामागची मोठी बाग आणि दोन्ही बाजूंच्या लांबच लांब व उंच अग्रशाला, यांमुळें तेथील प्रकाशाला जी अपूर्व रमणीयता प्राप्त झाली होती, तिचा ठसा तिच्या हृदयावर खोलवर उमटला होता. अधून मधून हें दृश्य तिच्या कल्पनासृष्टींत सजीव होई आणि ती आनंदांत रंगून जाई, आणि म्हणूनच आतां उड्या मारीतच ती कपडे करायला आंत पळाली.

खोलींत लवकरच रामलक्ष्मणांच्या जोडीनें प्रवेश केला. दोघेहि तुरुतुरु धांवतच आले आणि कोणतीच शंका न बाळगतां अशोकच्या अंगावर चढले. राम त्याच्या मांडीवर बसला व लक्ष्मणानें त्याच्या खांद्या-वर आरोहण केलें. मोठ्या लाडांत येऊन दोघेहि त्याला कुरवाळू लागले. राम काळा कुळकुळीत होता, आणि लक्ष्मण पांढरा शुभ्र होता. त्याच्या मस्तकावर मात्र हिरवा डाग होता. त्यामुळें त्याच्या शोभेंत भर पडली होती.

अशोकनें त्यांच्या पाठीवरून आळीपाळीनें हात फिरवला. त्यांना थोपटलें, त्यांना कुरवाळले, त्यांचे मुकेसुद्धां घेतले. या मुक्या प्राण्यांच्या संगतींत त्याचें हृदय फुलून आलें.

नेहमीं घरच्या चार पांच मांजरांवर तो ममता करी, त्या त्या वेळीं त्याला एक गोड अनुभव येई. कोणत्याहि बऱ्या वाईट भावनांचा पगडा त्याच्या मनावर बसलेला असला, तरी घरच्या मांजरांना अंगावर खेळवलें म्हणजे त्यांचा अंतरात्मा तृप्त होत असल्याचा त्याला भास होई. त्यांचें मन पवित्र होई आणि त्याला वेगळीच धार चढे. माणसांना जें कांहीं मिळत नाहीं त्याचा टाव त्याला येथें लागत असे शुद्ध भावनांची देवाण-घेवाण त्याला या मुक्या प्राण्यांच्या जगांत अनुभवाला येई आणि त्यामुळें तो संसारांतील व्यापताप विसरून तेथेंच रंगून जाई.

कांहीं वेळानें हिरा बाहेर आली. ती किती साधी पण मोहक दिसत होती ! 'चल, भाऊ, आपण जाऊं आतां ती म्हणाली. देऊळ

पहायला ती अधीर झाली होती. तिनें आपल्या दोन्ही पशुमित्रांना उचलून जमिनीवर ठेवलें. अशोकहि तयार झाला. दोघेंहि बाहेर आलीं. दिवाणखान्यांत टांगलेल्या आईच्या प्रतिमेला त्यांनीं नमस्कार केला.

त्यांच्या काकीनें दारापर्यंत येऊन म्हटलें, 'हिरू, दिवेलागणीच्या पूर्वी घरांत यायचं हं. अन् भाई, तिला जास्त फिरवूं नकोस बरं. नाहीं तर तिची आवड म्हणून तूं तिला खूप फिरवून आणायचास आणि आठवडाभर तिचे पाय दुखत रहायचे.मागच्या खेपेची आठवण आहे ना तुला?'

'हो तर. तिच्या पावलांना या माझ्या हातांनीं तेल चोळलं आहे ना ! मग ती आठवण मी कशी विसरेन?' अशोकनें हंसत हंसत उत्तर केलें.

हिरेचा चेहरा गोरामोरा झाला. तिनें काकीकडे पाहून म्हटलें, 'या खेपेला तसं कांहीं होणार नाहीं बरं, काकी.' आणि ती घराच्या पायऱ्या उतरूं लागली.

घरचीं पांचसहा मांजरें, दोन कुत्रीं, दारांत गोळा झालीं. त्यांच्या घोळक्यांतून प्रयासानें वाट काढीत अशोकनें घराबाहेर पाऊल टाकलें.

वाटेंतलें निसर्गाचें दृश्य जितकें सुंदर तितकेंच तें अशोकला उद्बोधक वाटलें. जेथें तेथें नारळीच्या समृद्ध बागा दिसत होत्या. भाताचीं विस्तृत शेतें पिकून तयार झालीं होतीं. तीं जणूं काय भाताच्याच राशींनीं भरलीं आहेत, असा दुरून पाहणाऱ्याला भास होत होता. त्यामुळें अशोकला एकाद्या खजिन्यापेक्षांहि हीं मौल्यवान वाटलीं आणि स्वतःचीच मिरास पाहिल्याचा त्याला आनंद झाला. शेतांच्या कडाकडांनीं पाण्याचे वहाणारे पाट पाहून त्याच्या मनाची तृप्ति झाली. परमेश्वर आपल्या या भूमीवर इतका कृपाळू आहे,ही कल्पना अशोकला त्या वेळीं विशेष सुखद झाली.भरपूर अन्न देऊन आपलें भरण, पोषण करणारी जमीन आपली माता आहे ही जाणीव त्याच्या मनाला आल्हाददायक वाटली.

पण निसर्गाची ही समृद्धि लोकांना काय उपयोगाची होती ? या संपन्न लागवडींतून जीं घरें डोकावत होतीं, तीं भिकार होतीं. त्यांना घरें कोण म्हणणार ! झोंपड्याच त्या ! त्यांत आयुष्य कंठणाऱ्या असंख्य जीवांचें दैन्य त्याला अपरिचित नव्हतें. आयुष्यांतील प्राथमिक सुखसोयीहि ज्यांना लाभत नाहींत, त्यांचें जीवित किती कष्टमय जातें हें त्याला साहित्याच्या वाचनानें कळलें आणि प्रत्यक्ष अनुभवानें पटत होतें.

देवळाचें उंच शिखर व भव्य घुमट त्यांना दुरून दिसूं लागले. त्यांच्यावर सुवर्णरस ओतल्याप्रमाणें ते पिवळ्या उन्हांत चकाकत होते. आसपासच्या चिमुकल्या टेकड्या आणि वृक्षराजी यांनीं आकाशाचा गोल मर्यादित केला होता. समोरच्या डोंगरमाथ्यावर मारुतीरायाचें मंदिर शोभत होतें आणि लगतच्या टेकडीवर उभ्या असलेल्या ख्रिस्ती देवालयाला आपल्या दिमाखानें जणूं काय खिजवीत होतें.

चिमुकली हिरा हा क्षणोक्षणीं बदलत जाणारा देखावा मोठ्या कुतूहलानें पहात होती आणि आपल्या भाईला निरनिराळे प्रश्न विचारीत होती.

थोड्या वेळानें त्यांनीं तलावाला वळसा घालून मुख्य दरवाजांतून प्राकारांत प्रवेश केला. पुढचें दृश्य पाहून हिरेचें मन हर्षोत्फुल्ल झालें. कां, तें तिचें तिलाच कळत नव्हतें. अनंत जन्मींच्या संस्कारांचाच हा परिणाम असेल काय ?

प्राकाराच्या कोंपऱ्यांतील पिंपळाच्या पारावर एक म्हातारा बसला होता. अशोकवर नजर पडतांच तो मोठ्या अदबीनें व घाईनें त्याच्याजवळ आला. अशोकनें त्याला लगेच ओळखलें. त्याची मुद्रा कृतज्ञतेनें फुलून आली. त्याचें पोशाखांतील अन् मुद्रेवरील दैन्य पाहून अशोकला त्याच क्षणीं त्या म्हाताऱ्याच्या मुलाची आठवण झाली. आपला हा विद्यार्थी सध्यां कुठें असेल, काय करीत असेल, हें जाणून घेण्याची त्याला इच्छा झाली.

काय, सोनूबाबा, आम्हांला विसरलांत तुम्ही. हल्लीं आमच्या-कडे फिरकलां देखील नाहीं. ' अशोकनें प्रेमळ स्वरांत त्याला विचारलें.

ओशाळल्यागत मुद्रा करून सोनूबाबांनीं उत्तर केलें, ' तुम्हांला विसरायचं ? आमच्या केशवाला तुम्हींच नाहीं का पोटापाण्याला लावलं?'

शेवटचा हा उद्गार अशोकच्या शालीन वृत्तीला रुचला नाहीं. ' भलतंच कांहीं तरी ! सगळी कर्तबगारी त्यांचीच. '

' असं कसं म्हणतां ? आम्ही बोलून चालून रानमाणसं. तुम्ही पाठच्या भावाप्रमाणं त्याला जवळ करून त्याचें चार पांच वर्षांचें शिक्षण केलं नसतं तर आज पोर्तुगीज शिक्षणाची शाळा चालवण्याऐवजी गांवच्या इतर मुलांप्रमाणें तो कुळागरांत पोफळं गोळा करीत राहिला असता ! '

' कशी काय चालली आहे शाळा ? '

' तुमच्या कृपेनें चांगली चालली आहे. पांचपन्नास मुलें येतात. त्याच्या शिकवण्यावर सगळे लोक खूप आहेत. महिन्याकांठीं चार पैसे घरांत येतात. आपल्या या प्रसादानें एकंदरींत आमचं बरं चाललं आहे. ' म्हाताऱ्यानें अभिमानानें म्हटलें.

' मग घरांत सून आणायला हरकत नाहीं आतां. ' अशोकनें म्हटलें.

' तेंच तर तुमच्याशीं बोलणार होतों. तुमच्यामुळेंच निर्वाहाचा प्रश्न सुटला. आतां मठींत दिवा लावायचीहि सोय तुम्हीच करून द्या. '

त्याच वेळीं म्हाताऱ्याला आपल्या दिवंगत पत्नीच्या आठवणीनें आणि ती हयात असती तर केशवचें भाग्य पाहून तिला कसें धन्य वाटलें असतें या विचारानें त्याच्या क्लांत दृष्टींत कारुण्य उभें राहिलें.

' केशवचें सुख पहायला त्याची आई हवी होती,' मनांतला विचार भावनेच्या उमाळ्यासरशीं त्याच्या तोंडून बाहेर पडला.

अशोकला हे उद्गार ऐकून वाईट वाटलें. त्याला आपल्या स्वर्गस्थ मातेची आठवण झाली आणि माणसाचें यश त्याच्या मातेच्या वत्सल

दृष्टीखालून गेल्याशिवाय त्याला पूर्तता कशी येत नाहीं, या विचारानें अशोकचें मन सद्गदित झालें. तो म्हणाला, ' हो हो. अवश्य. गरज लागेल तेव्हां मला कळवा. केशव मला भेटला तर त्याच्याशीं यासंबंधीं मी बोलेनच. '

' केशवला कांहीं सांगायचं आहे का ? '

अशोक क्षणभर थांबला. त्याला तसें कांहीं सांगायचें नव्हतें; पण सांगण्यासारखें मात्र पुष्कळ आहे असें त्याच्या मुद्रेवरून दिसलें. शेवटीं तो म्हणाला,' केशवला सांगा कीं तुझ्यासारखीं किती तरी मुलें तुझ्या आवतीभोवतीं असतील, त्यांना विसरू नकोस.'

या उत्तरांतील खरा अर्थ म्हाताऱ्याच्या हृदयाला भिडला आणि केशवसारख्या शैंकडों अनाथ विद्यार्थ्यांना प्रेमानें कवटाळणाऱ्या त्या हृदयाचा मोठेपणा जाणवून तो सद्गदित झाला व त्यानें म्हटलें,

' तुमची ही अपेक्षाहि शांतादुर्गा सफल करो ! हें मागण्यापलीकडे आम्हां गरिबांच्या हातीं आणखी काय आहे ? '

' तुमच्यासारख्या वडीलधाऱ्यांचा आशीर्वाद हेंच आमचें खरें भाग्य. '

जवळच्या गुलाबाचीं दोन फुलें तोडून म्हाताऱ्यानें हिरेच्या हातीं दिलीं आणि आपली कृतज्ञ दृष्टि अशोकवरून फिरवीत तो निघून गेला.

आणि त्या म्हाताऱ्याच्या पाठमोऱ्या आकृतीकडे पाहतां पाहतां अशोकच्या मनांत आलें कीं ज्या पांचपन्नास गरीब, निराधार विद्यार्थ्यांना गेल्या दहा वर्षांत सर्व तऱ्हेचें सहाय्य पुरवून आपण सुशिक्षित व स्वावलंबी व्हावयास हातभार लावला, त्यांचे वडील या म्हाताऱ्याच्या रूपानें आपल्याला आशीर्वाद देत आहेत, आपलें अभीष्ट चिंतीत आहेत आणि या आशीर्वादाचा आधार आपल्या पाठीशीं उभा आहे. कोणतींहि संकटें आपण तरून जाऊं.

नगाऱ्यावर काठी बसली. चौघडा झडूं लागला. त्याचे प्रसन्न मंजुळ स्वर वनश्रीनें वेष्टिलेल्या त्या शांत वातावरणांत पावित्र्याचे तरंग पसरूं लागले. तें वाद्य कानावर पडतांच हिरा तर आनंदभरित झालीच; पण अशोकचें अंतःकरणदेखील एका गूढ आनंदानें भरून आलें. सगळ्या हिंदु वाद्यांत चौघड्याचें वाद्य त्याच्या सुप्त मनांतील ज्ञातअज्ञात पाकळ्या उमलवी आणि हजारों वर्षांच्या हिंदुसंस्कृतीचें भावात्मक दर्शन त्याला घडवी. हिंदुमनाच्या शांतिसमाधानाचें पोषण करणारें कांहींतरी त्या स्वरलहरींत आहे, असें त्याला वाटे आणि मनाच्या अशा अवस्थेंत चौघड्याचें संगीत तो जिवाचे कान करून ऐकत बसे.

त्यांनीं देवळांत प्रवेश केला. छताला टांगलेल्या शुभ्र हंड्यांच्या पोटांत खोबरेलाच्या वाती तेवत होत्या. त्यांच्या स्निग्ध पिवळसर प्रकाशांत आणि चौघड्याच्या त्या सौम्य व मधुर स्वरसंगतींत कांहीं तरी सख्य आहे असें त्याला वाटलें. तिन्हीसांजाच्या वेळीं मनावर उमटणारा निसर्गाचा करुणरम्य ठसा, चौघड्याचे शुचिरुचिर संस्कार आणि देवळांतील दीपज्योतींचीं मुग्धमधुर प्रतिबिंबें, या सर्वांत आत्मीय संगति आहे, अशी काव्यकल्पना त्याच्या मनांत येऊन गेली आणि विवेकवादी असूनहि आपली दृष्टि संस्कृतिनिष्ठ कशी बनली याचें आश्चर्य करीत तो देवळांतून बाहेर पडला.

बाहेर आतां चांदणें फुललें होतें. रातराणीचा सुगंध हवेंत दरवळत होता. क्षितिजाच्या नीलवर्णावर पृथ्वीची काळीभोर भेदरेषा वळणावळणांनीं उठून दिसत होती.

# २

लीना जळफळतच आपल्या खोलींत शिरली. तिचा उद्वेग आतां अनावर झाला. ‘ Patria ’ ( स्वदेश ) साप्ताहिकाचा अंक तिच्या हातांत होता. त्याचा तिनें चोळामोळा करून तो कोपऱ्यांत फेंकून दिला आणि पोषाख वगैरे न बदलतां ती तशीच आरामखुर्चींत पडली. मनावर पडलेला विलक्षण ताण जणूं काय तिला सहन होईना.

क्षणभर तिला असें वाटलें कीं तडक वडिलांकडे जाऊन त्यांना स्पष्ट विचारावें कीं हा राजद्रोह तुम्ही कोठवर करणार ? कोणत्या लाभासाठीं हें विनाशक कार्य तुम्हीं आरंभलें आहे ? आपला प्रांत रसातळाला गेला, तरीहि तुमचें समाधान होत नाहीं काय ? वैभवासाठीं तुम्ही कोठंवर स्वाभिमान विकणार ? स्वातंत्र्याच्या बदली तुम्ही कीर्ति मिळवितां तिची काय मातब्बरी आहे ? सत्याचा गळा दाबून तुम्हीं खिस्ती धर्माची कसली प्रतिष्ठा वाढवूं पहातां ? या तिरीमिरींत ती उठलीसुद्धां.

पण, पपांना असें फैलावर घेऊन तरी काय उपयोग ? यापूर्वी एक दोनदां आपण त्यांना नाहीं का विचारलें ? त्या वेळीं आपल्या विचारसरणीबद्दल अधिक्षेप दर्शवून आपल्याला गप्प बसवण्याचा त्यांनीं प्रयत्न केला, हें तिला आठवलें आणि तिनें संयम केला.

आपलें तप्त मस्तक शांत करण्याकरतां ती खिडकीपाशीं येऊन बसली आणि बाहेरचा वारा व पुढचें दृश्य यांच्या सान्निध्यानें आपल्या चित्तवृत्ती शांत करण्याचा तिनें प्रयत्न केला. माडीवरच्या त्या खोलींतून दोन्ही बाजूला दोन निरनिराळे देखावे दिसत. समोर नारळीचे असंख्य झुपके समुद्रावरील वाऱ्यानें एकसारखे खिदळत आणि किनाऱ्यावरील लाटांचा नाच तेथून स्पष्टपणें दृष्टीस पडे. सागराचा वर्तुलाकार पृष्ठभाग क्षितिजाशीं जेथें भिडल्यासारखा दिसे, तेथें गलबतांचीं धूसर शिडें एखाद्या चित्रांतल्याप्रमाणें तटस्थ दिसत. लीनेच्या विचाराच्या गतीपेक्षांहि वायूच्या व समुद्राच्या लहरींच्या गतींत अधिक वेग होता. त्यामुळें तिचें विचल चित्त त्या लयींत मिळून जात होतें.

थोड्या वेळानें लीनेचें लक्ष चुरगळलेल्या त्या वर्तमानपत्राच्या गोळयावर गेलें व ती स्वतःशींच हंसली. कारण, त्या एका अंकाची रागाच्या भरांत तिनें तशी दशा करून टाकली तरी इतर शेकडों अंक आपलें विध्वंसक कार्य केल्याशिवाय कसे राहातील ? आपल्या वडिलांची ही पापी शिकवण लोक श्रद्धेनें वाचतात, अन् आपले विचार बनवतात, त्याला आपण कशा रीतीनें आळा घालणार ? आपण गोमंतकस्थ पोर्तुगीज आहोंत, पोर्तुगाल देश ही आमची मायभूमि आहे, त्या देशाचा इतिहास हा आमचा इतिहास आहे, आमच्या सुधारणेचें सारें श्रेय पोर्तुगीजांच्या सांस्कृतिक कार्याला आहे. आम्ही स्वतंत्र आहों. कारण, पोर्तुगाल स्वतंत्र आहे, त्याचें स्वातंत्र्य हेंच आपलें स्वातंत्र्य आहे, खिस्ती धर्मानेंच गोमंतकाचा उद्धार केला आहे. इत्यादि विचारप्रणाली आपले वडील या वर्तमानपत्राच्याद्वारा आज सतत पंधरा वर्षें लोकांपुढें मांडीत आले आहेत. त्यामुळें, धर्म व राजकारण या दोन्ही बाबतींत समाजाची जी मनोवृत्ति बनलेली आहे, ती सहजासहजीं बदलणें शक्य आहे काय ?

या प्रकारचे विचार तिच्या मनांत येऊन गेले. तेव्हां तिला असें दिसून आलें कीं त्वेषानें, उद्वेगानें, आपणाला कांहींच करतां येणार नाहीं. लोकांना कठोर वस्तुस्थितीचें दर्शन सतत घडत राहिलें पाहिजे; विवेकवादाच्या भूमिकेवरून त्यांना विचार करायला शिकवलें पाहिजे; धर्म, समाज, राजकारण यांच्या बाबतींत हरेक साधनांचा अवलंब करून शास्त्रशुद्ध विचारसरणी जनतेपुढें नेहमीं मांडण्यांत आली पाहिजे.

अशा विरोधी भूमिकेवरूनच आपणाला लढलें पाहिजे. ती खुर्चीवरून उठली आणि तिनें तो अंक उचलून उलगडला. तिच्या चेहऱ्यावर आतां मिस्किल हास्य खेळूं लागलें. पहिल्याच पृष्ठावर पाद्रि जुजे व्हाज याचें धर्मकार्य व त्यानें घडवून आणलेले चमत्कार या विषयावर तीन स्तंभी लेख होता. पुढच्या दोन स्तंभांतून सहा व्यक्तींचे मृत्युलेख आले होते. त्या व्यक्ती, वस्तुतः किरकोळ होत्या. परंतु, ते मृत्युलेख वाचल्यावर कुणालाहि असें वाटावें कीं, हे मृत महाशय महाभाग, सच्चरित, पुण्यपुरुष होते. हे सगळे लेख भाडोत्री होते. दुसऱ्या पृष्ठावर कांहीं सरकारी अधिकाऱ्यांचें विस्तृत गुणवर्णन होतें. यापुढें पोर्तुगीजांच्या गोमंतकांतील विजयदिनाचा चतुर्थशतसांवत्सरिक उत्सवाचा कार्यक्रम छापला होता. आणि शेवटीं सरकारी बड्या अंमलादारांची हालहवाल, श्रीमंत कुटुंबांतील जन्म, बाप्तिस्मे, वाङ्निश्चय, लग्न, इत्यादि किरकोळ घडामोडी सुरस भाषेंत आणि ठळक टाइपांत छापल्या होत्या.

या सगळ्या सदरांवरून लीनेनें नजर फिरवली आणि आपल्या दरिद्री आणि हतभागी देशाची ही थट्टाच नव्हे का ? असा प्रश्न तिच्या मनांत उद्भवला आणि वास्तव गोमंतकाचें करुण चित्र तिच्या नजरेसमोर तयार होत गेलें.

दरिद्री याचकांचा तांडा तिला दिसूं लागला. सगळे सुशिक्षित या वर्गांत गोळा होऊन नोकरीसाठीं गर्दी करीत होते. देशाची बरीचशी

संपत्ति निष्क्रिय लष्कराच्या मलिद्यासाठीं जात होती. पोपटपंची करणाऱ्या दुबळया व निस्तेज विद्यार्थ्यांचे घोळके मागाहून येत. रोग्यांना, निराश्रितांना आश्रय देऊन त्यांना दुःखमुक्त करणाऱ्या संस्था नव्हत्या. श्रीमंत रोग्यांची चैन चालवणारीं ऐश्वर्यशाली अशीं दोन तीन इस्पितळें होतीं. सरकार हें सरकारि नोकरांसाठीं असून लोकांसाठीं नव्हे; उलट, लोकच त्यांच्यासाठीं आहेत अशी भावना सरकारी अंमलदारांत जारी होती. समाज दारुडा व्हावा म्हणून दारूच्या उत्पत्तीला शक्य तें प्रोत्साहन सरकारकडून मिळत होतें आणि हें अपुरें पडूं नये म्हणूनच कीं काय पोर्तुगालाहून उंची मद्याची खास आयात होत होती. हजार दीड हजार पाद्री सरकारी आश्रयावर धार्मिक योगाचा पुरस्कार करण्यांत गढून गेले होते. पोर्तुगीजांनीं येथें पहिलें पाऊल ठेवलें, त्या वेळीं उद्योगधंदे ज्या अवस्थेंत होते, त्यापलीकडे त्यांची मजल गेली नव्हती. असें गोमंतकीय समाजाचें भीषण वास्तवचित्र लीनेच्या नजरेसमोर तरळूं लागलें.

तिच्या लक्षांत आलें कीं आपण अजून पोशाख बदलला नाहीं. समोरच्या आरशांत पडलेलें आपलें प्रतिबिंब पाहून ती तेथेंच थबकली. तिनें आपले केंस अशा पद्धतीनें बांधले होते कीं तिच्या चेहऱ्याला रमणीय गांभीर्य प्राप्त झालें होतें. किरमिजी रंगाची सफेत किनारीची साडी तिनें अशा पद्धतीनें परिधान केली होती कीं तिच्या उमलत्या अवयवांचा गोंडसपणा व रेषांचें सौंदर्य त्यांतून अर्धस्फुट होत होतें. तिच्या पाणीदार चेहऱ्यावर बुद्धिमत्तेची व आग्रही वृत्तीची चमक तळपत होती आणि तिच्या काळयाभोर टपोऱ्या नेत्रांत मार्दवापेक्षां प्रखरताच अधिक जाणवत होती.

मनाच्या अशा विषण्ण स्थितींत तिनें मेजावरील 'पायाचे दगड' हा कथासंग्रह उचलला आणि त्यांतील ' प्रलय ' ही कथा ती वाचूं लागली. गोमंतकाच्या दुबळेपणाचें विदारक चित्र वाचतां वाचतां ती इतकी

तन्मय होऊन गेली कीं गड्यानें टपाल आणून तिच्या शेजारीं ठेवलें याची देखील तिला दाद लागली नाहीं.

त्या कथासंग्रहाचा लेखक तिच्या आवडीचा होता. गोमंतकाच्या दैन्याचीं हृदयद्रावक चित्रें ज्याप्रमाणें त्यानें रेखाटलीं होतीं, त्याचप्रमाणें त्याच्या भावी उद्धाराचीं ऊर्जस्वल कथानकेंहि त्यानें लिहिलीं होतीं. ललित साहित्याच्या आत्माविष्कारासाठीं उपयोग करून तो स्वस्थ राहिला नव्हता. आपल्या हतभागी जनतेची जी कुचंबणा चालली आहे तिच्यावर मराठी व पोर्तुगीज नियतकालिकांतून त्याचे प्रभावी लेख मधूनमधून प्रसिद्ध होत. ते लीना मोठ्या आवडीनें वाचीत असे. एका प्रमुख शिक्षणसंस्थेचा मुख्याध्यापक या नात्यानें त्याच्या आयुष्याची दुसरीहि एक बाजू तिच्या परिचयाची झाली होती. परंतु त्याला प्रत्यक्ष पहाण्याचा योग मात्र अजून तिला आला नव्हता.

अशोक या नांवांत तिला हळूहळू जादूची प्रचीति येऊं लागली. त्याच्या साहित्यावरून व कीर्तीवरून तिनें आपल्या कल्पनेच्या जोरावर त्याचें मनोमय चित्र तयार केलें होतें. त्या चित्रांत बारीकसारीक छटा देखील तिच्या भावनेनें भरल्या होत्या. तिच्या सौन्दर्याकुल वृत्तीनें त्याच्यावर दर्शनी व आंतरिक सौन्दर्याचा साज चढविला होता आणि तिच्या ध्येयवादी मनानें त्या चित्राच्या मुखमंडलाभोवतीं तेजाचें वलय निर्माण केलें होतें.

बराच वेळपर्यंत या मानसचित्राच्या अवलोकनांत ती रंगून गेली आणि ही भावसमाधि ओसरल्यावर जवळच्या टपालाकडे तिचें लक्ष गेलें. त्यांत 'युगांतर' मासिकाचा अंक होता तो उचलून त्याचें आवरण तिनें फोडलें आणि मुखपृष्ठावरील अशोकचें छायाचित्र पहातांच हर्षाची एक लाट तिच्या आंगांगांतून उठून गेली.

तेजस्वी व ध्येयदर्शी नेत्र; मस्तकावर विपुल केससंभार; उंच व सरळ नाक; जाड पण दबलेले ओंठ; आणि या सगळ्या अवयवांतून त्याच्या वृत्तीचा करारीपणा प्रतीत होत असलेला.

मेघाच्छादित आकाशांत तेजस्वी तारा अकस्मात् उदयाला यावा, तसेंच तिला वाटलें. तृप्तीची भावना तिच्या मनाला स्पर्श करून गेली. समाजाच्या भीषण दैन्यांत आपल्या प्रतिभेनें आणि त्यागानें हा तरुण चमकत आहे आणि अधिकाधिक असाच चकमत रहाणार अशा श्रद्धेनें तिनें तें पाहून घेतलें आणि पहिलें पान उलटलें.

पहिल्याच पृष्ठावर अशोकचें व्यक्तिचित्र दिलें होतें. तें अधाशीपणानें तिनें वाचून टाकलें. त्यावरून तिला दिसून आलें कीं अशोकचें साहित्य हा त्याच्या जीवनाचा आरसा आहे. कठोर वास्तवता व उज्ज्वल ध्येयवाद यांची संगति त्याच्या साहित्यांत त्यानें घडवून आणली आहे.

त्यानंतर त्याची एक लघुकथा छापली होती. ती देखील तिनें वाचून काढली. तिनें निर्माण केलेल्या त्याच्या कल्पनाचित्राशीं समोरच्या प्रत्यक्ष चित्राचें कितीतरी साम्य आहे, या कल्पनेनें ती आनंदित झाली आणि शक्य तितक्या लौकर त्याचा परिचय करून घेतला पाहिजे असा तिनें आपल्या मनांत निश्चय केला.

थोड्याच दिवसांनंतर तिला ती संधी प्राप्त झाली.

लीनंचे वडील बडे जमीनदार होते. ख्रिस्ती समाजांत व सरकार दरबारांत त्यांच्या 'स्वदेशा'ला मोठा मान होता. वस्तुतः त्यांचें कार्य प्रतिगामी होतें. सरकारी बऱ्यावाईट धोरणाचा नेहमीं पुरस्कार करावयाचा आणि समाजांतील दुबळ्या अंधश्रद्धेचें हरतऱ्हेनें पोषण करावयाचें हें त्यांच्या साप्ताहिकाचें सामान्य धोरण होतें. लीना वृत्तीनें व शिक्षणानें सर्वस्वी वेगळी होती. ती बी. ए. झाली होती. तिचे वडील पेरैरा इंग्रजी शिक्षणाच्या विरुद्ध होते. कारण त्या शिक्षणानें मुलांमुलींत राष्ट्रीयत्वाचें वारें

शिरतें व तीं बिघडून जातात अशी त्यांची तक्रार होती. तरी देखील लीनेला इंग्रजी शिक्षण देणें त्यांना भागच पडलें. लीनेची आत्या मुंबईतील एका बड्या सरकारी अंमलदाराची बायको होती. त्यामुळें लीनेचें पोर्तुगीज प्राथमिक शिक्षण पुरें झाल्याबरोबर तिच्या आतेनें तिला आपल्याबरोबर मुंबईला नेलें आणि मग तेथेंच तिच्या इंग्रजी शिक्षणाला सुरुवात झाली. पेरैरा अधून मधून तिला पोर्तुगीज शिकण्याचा आग्रह करीत. परंतु तिच्या निश्चयापुढें त्यांचें कांहीं चाललें नाहीं. अशा स्थितींतच लीना वयाच्या विसाव्या वर्षी पदवीधर झाली.

इंग्रजी शिक्षणानें तिला राष्ट्रीय दृष्टि दिली असें नाहीं. ती स्वभावतःच स्वाभिमानी, स्वतंत्र वृत्तीची, अन्यायाचा तिरस्कार करणारी अशी होती. त्यामुळें तिच्या वृत्तीला पोषक असे संस्कार तिच्यावर घडत गेले. उत्कृष्ट ग्रंथांचें वाचन, हिंदुस्थानांतील परिस्थितीचें निरीक्षण, आणि तेथील राजकीय आंदोलनाचे तिच्या संस्कारक्षम मनावर होणारे परिणाम, इत्यादि गोष्टींमुळें तिचें व्यक्तिमत्व घडत गेलें आणि गोमंतकाच्या दैन्यवाण्या स्थितीच्या अवलोकनानें तिच्या व्यक्तित्वाला विचाराच्या आंचीनें हळूहळू विलक्षण धार चढत गेली.

लीनेची विचारप्रणाली मुंबईच्या इंग्रजी नियतकालिकांतून लेखांच्या व गोष्टींच्या रूपानें प्रकट होऊं लागली. तेव्हां पेरैरांना धक्का बसल्याशिवाय राहिला नाहीं. कारण त्यांच्या व्यावहारिक तत्त्वज्ञानावर ' मूले कुठारः करणारी अशी तिची विचारसरणी होती. पेरैरांना लोकांच्या धार्मिक अंधश्रद्धेचा फायदा घेऊन धर्ममार्तंड म्हणून मिरवायला हवें होतें. पोर्तुगीज सरकारच्या एकतंत्री कारभाराची स्तुति करून सरकारी गोटांत प्रतिष्ठा मिळवायची होती. गोमंतकीयांनीं सरकारी नोकऱ्या पतकरून आपला उत्कर्ष साधला पाहिजे या तत्त्वज्ञानाची कास धरून आपला विचारवंत पुढारी म्हणून टिमकी वाजवायची होती. वर्तमानपत्र चालवून स्वार्थसाधु

पुढारीपणा मिरवायचा होता आणि एकादें व्याख्यान देऊन किंवा एकाद्या सार्वजनिक समारंभाचें अध्यक्षस्थान स्वीकारून वेळीं अवेळीं स्वार्थ-त्यागाचें नाटक करावयाचें होतें. या त्यांच्या देशद्रोही कार्यक्रमांत त्यांना नेहमीं यशच मिळत गेलें होतें. कारण खिस्ती समाजाच्या दुबळ्या वृत्तीचा आणि खुळचट समजुतींचा फायदा घेण्याचें तंत्र त्यांना चांगलें अवगत झालें होतें. सरकारच्या कुटिल धोरणावर नोकरशाही तत्त्वज्ञानानें आवरण घातल्यामुळें त्यालाहि ते प्रिय झाले होते. अशा स्थितींत लीनेचें लेखन व वर्तन त्यांना धोक्याचें वाटावें यांत नवल नव्हतें.

पधवीधर झाल्यानंतर लीनेनें मुंबईलाच एकादी नोकरी पतकरावी अशी पेरेरांची इच्छा दिसली. परंतु, तिनें स्पष्ट नकार दर्शविला. कारण, गोमंतकाच्या प्रश्नानें तिचें मन वेधून घेतलें होतें. वडिलांच्या सार्वजनिक कार्यांतले दोष तिला स्पष्ट दिसत होते हें खरें; परंतु गोमंतकाचीं दुःखें कोणतीं आहेत अन् तीं किती तीव्र आहेत हें तिला अजून तपशीलवार समजलें नव्हतें. कारण येथील वर्तमानपत्रांच्या वाचनानें लोकस्थितीची खरी कल्पना येणें तिला शक्य नव्हतें. उलट त्यांच्या वाचनानें नवख्या सुशिक्षितांना असेंच वाटावें कीं, आपण किती सुखी आहोंत, पोर्तुगीज सरकार किती उदार, दयाळू आहे. ही प्रतारणा लीनेच्या लक्षांत आली होती. परंतु लोकांच्या आशा-आकांक्षांच्या मर्यादा तिला अज्ञात होत्या. वैभवाच्या उच्च वातावरणांतून खालीं उतरून उघड्या डोळ्यांनीं जनतेच्या जिव्हाळ्याच्या प्रश्नांशीं समरस झाल्याशिवाय मार्गदर्शन होणें शक्य नव्हतें. या गोष्टींची तिला जाणीव होती. आणि म्हणूनच, समाज-कार्याला स्वतःला वाहून घेण्यासाठीं तिनें मडगांवच्या एका प्रमुख शिक्षणसंस्थेंत विनामूल्य काम करण्याचें पतकरलें होतें. त्याप्रमाणें पपांच्या नाखुषीची पर्वा न करतां गेल्या वर्षभर ती या शिक्षणसंस्थेची स्वार्थत्याग-पूर्वक सेवा करूं लागली होती.

तिला दुःख होत होतें, तें फक्त वडिलांच्या वर्तनाचें नव्हे, तर तरुण पिढीच्या मनोवृत्तीचें. ध्येयाची जाणीव नाहीं, त्यागाचें मोल नाहीं, कार्याची चाड नाहीं, स्वातंत्र्याची तळमळ नाहीं, भावनांना बधिरता आली आहे. स्वार्थांधतेमुळें चार पावलांपुढचें दृश्य पहाण्याची ताकद नाहीं. सत्याचें तेज सहन होत नाहीं, स्वार्थाला पूजेचें रूप प्राप्त झालें आहे. पाश्चात्त्यांची पोषाखी सुधारणा आत्मसात् केली आहे. पण, उच्च गुणांच्या अभावामुळें माणुसकीचें मातेरें झालें आहे. हें दारुण दृश्य पाहून लिनेचें अंतःकरण कष्टी होई आणि ही भयाण परिस्थिति कधीं तरी पालटेल का, हा प्रश्न तिला जाचीत असे.

या तिच्या मनोवृत्तीमुळें अशोकचें लेखन हळूहळू तिच्या दृष्टोत्पत्तीला येऊं लागलें, तसतसें तिचें मन त्याच्याकडे आकृष्ट होत गेलें आणि आपल्या ध्येयसृष्टींत सहभागी होऊन गोमंतकाच्या उद्धाराच्या मार्गाला लावूं शकणारी एक शक्ति आपल्या समाजांत अवतीर्ण होत आहे या आशेनें ती अतिशय उल्हसित झाली.

ती ज्या कन्याशाळेंत काम करीत होती त्या शाळेचा लौकरच वाढ-दिवस समारंभ व्हावयाचा होता. त्या समारंभाचें अध्यक्षस्थान यंदा कोणाला द्यावें असा प्रश्न चर्चेला आला. तेव्हां, लीनेनें अशोकचें नांव सुचविलें. चालकांनीं सुरुवातीला आढेवेढे घेतले. कारण आतांपर्यंत त्यांची प्रथा अशी होती कीं असल्या समारंभाचें अध्यक्षस्थान प्रायः बड्या सरकारी अधिकाऱ्यांना किंवा पिढीजाद जमीनदारांना द्यावयाचें. मग त्यांच्या लायकी नालायकीचा प्रश्नच नव्हता. त्यांच्या नांवांपूर्वी विद्वद्वर्य, पंडित, लोकप्रिय व आदर्श पुढारी असे जाडे किताब ठेवून दिले कीं सहजच लोकांची दिशाभूल होत असे आणि समारंभालाहि लोकमान्यता व भारदस्तपणा प्राप्त होई.

ही प्रथा मोडायला लीनेनें चालकांना भाग पाडलें. अशोकचें कार्य, त्याच्या लेखनाचें महत्त्व, एका प्रमुख शिक्षण-संस्थेचें मुख्याध्यापकत्व व नेतृत्व, इत्यादि गोष्टी त्यांच्यापुढें मांडून तिनें त्यांचें मन आपल्या बाजूनें वळवून घेतलें आणि अशा रीतीनें अशोकची त्यांच्या संमतीनें त्या जागेची निवड जाहीर झाली.

शाळेच्या पटांगणांत समारंभाची व्यवस्था करण्यांत आली होती. या व्यवस्थेचें काम लीनेकडे होतें. शहरांतले सातआठशें स्त्रीपुरुष जमले होते. अशोकचें भाषण ऐकण्यासाठीं ते उत्सुक झाले होते.

योग्य वेळीं अशोक आला. लीनेनें व तिच्या इतर मैत्रिणींनीं त्याचें स्वागत केलें. नंतर त्याची श्रोतृवर्गास ओळख करून देण्यासाठीं लीना व्यासपीठावर उभी राहिली. पण अशोकच्या नांवाच्या उच्चार करतेवेळीं तिची नजर त्याच्याकडे वळली आणि त्याचे डोळे आपल्यावर स्थिर झाले असून त्यानें आपलें निरीक्षण चालवलें आहे असें दिसून येतांच तिच्या चेहऱ्यावर मुग्ध लाली पसरली आणि एका गोड भावनेचा संचार तिच्या गात्रांगात्रांत होऊन तिची जीभ कांहीं क्षण अडकल्यागत झाली.

पण हें क्षणभरच. आपला विभ्रम लक्षांत येतांच तिनें आपल्या वृत्तींवर तत्काळ विजय मिळविला व ती बोलूं लागली.

ओळख करून देण्याचें काम संपलें.अशोक व्यासपीठावर चढला.टाळ्यांच्या गजराचें कृतज्ञ स्मितानें त्यानें जणु काय स्वागत केलें आणि प्राथमिक शिष्टाचाराची भाषा संपल्यावर साहित्य व समाज या विषयावरील आपलें भाषण तो करूं लागला.

लीनेनें त्याच्याकडे पाहिलें अन् त्याची बेदरकार मुद्रा, त्याचा आवेश, त्याच्या आवाजाची धार, त्याच्या नजरेंत .चमकणारा त्वेष, या गोष्टींकडे तिचें लक्ष वेधतांच तिला जितका आनंद झाला तितकाच अभिमान तिच्या अंतःकरणांत जागृत झाला आणि आपल्या निकटवर्ती

स्नेह्याच्या यशाकडे आपण आत्मीयतेनें पहातों तितक्याच आत्मीयतेनें लीना अशोकच्या लहानसहान हालचालींचें निरीक्षण करूं लागली; इतकेंच नव्हे तर, त्याच्या वक्तृत्वाचा परिणाम श्रोतृसमुदायावर काय होत आहे, याचा ठाव घेऊन त्याच्यावर ज्या भावनाविकारांचा पगडा बसत होता, त्यांच्यावर तीहि तरंगूं लागली.

अशोक साहित्याच्या कार्यावर बोलूं लागला. इतर कोणत्याहि विषयावर बोलावयाची त्याला कायदेशीर बंदी होती. सरकारच्या दृष्टीनें ‘ साहित्य ’ हा विषय असा होता कीं ज्याच्यावर जहालांतील जहाल देखील तात्त्विक विचारांपलीकडे कांहीं सांगूं शकत नाहीं.

अशोकनें प्रचलित घडामोडींना स्पर्श केला नाहीं. पण ललित साहित्याचें महत्त्वदर्शन घडवतांना जागतिक श्रेष्ठ साहित्यकृतींनीं मानवतेच्या उद्धारासाठीं काय कार्य केलें आहे हें निरनिराळ्या देशांतील थोर साहित्यिकांच्या उदाहरणांनीं त्यानें दाखवून दिलें. सगळ्या जुलमी बंधनांचा नायनाट करून श्रेष्ठ साहित्यिक पिचणाऱ्या मानवजातीला क्रांतिवादी बनवीत असतात हें त्यानें व्हिक्टर ह्यूगो, व्हॉल्टॅर, टॉलस्टॉय, गॉर्की, इत्यादिकांच्या कार्यावरून पटवून दिलें. ललित साहित्य हें निरुपद्रवी वाटतें; पण त्याच्यांतूनच क्रांतीचे उद्घोष निघतात, मानवतेच्या सनातन हक्काचा पुरस्कार होतो, निर्वीर्य समाजांना नवचैतन्य प्राप्त होतें......

त्याचें भाषण संपलें. तेव्हां लीना आपल्या तंद्रींतून जागी झाली. त्याच्या वक्तृत्वांतून विचारांचा व भावनांचा जो तुंबळ भोंवरा फिरत होता त्याचें सकंप प्रतिबिंब त्याच्या चेहऱ्यावर थरथरत होतें आणि त्याच्या लहानसहान अंगविक्षेपांतूनहि तें व्यक्त होत होतें. त्यामुळें त्याच्या शब्दांतील अर्थ शतपटींनीं तीव्र व उद्दीपक होऊन तो श्रोत्यांच्या मनावर तांडवनृत्य करीत होता.

लीना सद्गदित झाली. तिचें हृदय उचंबळून आलें. भोंवतालच्या अंधारांत तिला क्षणभर उजळल्यासारखें दिसलें. अशोकच्या हृदयांत जी ध्येयज्योति धगधगत आहे, तिच्या प्रकाशांत आपला मार्ग न्हाऊन निघत आहे असें तिला वाटलें.

समारंभ आटोपून लोकांची पांगापांग झाली. तेव्हां लीनेनें आनंद-भरानें अशोकशीं हस्तांदोलन करून त्याचें अभिनंदन केलें. त्याबरोबर एक सुखसंवेदनेचा त्याला अनुभव आला आणि त्याच्या मानसिक शीणाचा निमिषार्धांत निरास झाला. आपल्याकडे येऊन जायचा तिनें त्याला शेवटीं आग्रह केला. तेव्हां त्यानें हंसत हंसत म्हटलें:

‘ तुम्हीं मला आमंत्रण देतां पण त्याचा तुम्हांला नंतर पस्तावा होईल.’

‘ असं कां वाटावं पण तुम्हांला ? ’

‘ तुमच्या वडिलांना माझें आगमन रुचणार नाहीं. त्यांच्या दृष्टीनें मी विरोधी गोटांतला आहें, हें तुम्हांला माहीत आहेच.’

‘ तुमचं म्हणणं खरंहि असेल. पण ही गोष्ट आपल्या मैत्रीच्या आड येणार नाहीं. ’

‘ तसं झालं तर त्यांत मला आनंद आहे. ’

‘ मग तुमची वाट मी केव्हां पाहूं ? ’

‘ येत्या आदितवारीं. ’

‘ **abri gada** ’

पुन्हां एकदां अशोकशीं स्नेहभरानें हस्तांदोलन करून तिनें त्याचा निरोप घेतला व ती मोटारींत जाऊन बसली.

एरवीं ती किती विचारशील होती ! संयम हा तिचा मोठा स्वभाव-विशेष होता. पण ती गोंधळल्यागत झाली होती आणि आपल्या या

मनःस्थितीचीं कारणें उलगडून पहाण्याइतकी शांतता आणि अवसर तिला मिळाला नव्हता.

पण इतकें खरें कीं कसली तरी अननुभूत भावना पाण्यांत टाकलेल्या खडीसाखरेच्या खड्याप्रमाणें विरघळत विरघळत तिच्या जीवाचा कणन्-कण माधुर्यानें व्यापीत आहे असें तिला वाटत होतें.

# ३

अशोक घरीं आला. त्याच्या राजीनाम्याचें वर्तमान आतां सगळ्यांना कळून चुकलें होतें. इतरांची आतां त्याला पर्वा नव्हती. वडील व काकी यांना काय वाटेल हाच काय तो प्रश्न त्याला टोंचीत होता. त्याची चाहूल लागतांच घरचीं पांच सहा मांजरें त्याच्याभोंवतीं गोळा झालीं. तीं सगळीं आपापल्या परीनें त्याच्याशीं लडिवाळपणा करूं लागलीं. हिरा त्यांच्या कागाळ्या भाईच्या कानावर घालूं लागली.

अशोक कुत्र्यामांजरांना घरच्या माणसांप्रमाणें वागवीत होता. त्यांच्या आवडीनिवडीशीं तो इतका तन्मय झाला होता कीं माणसांप्रमाणें या प्राण्यांनाहि स्वभावविशेष आहेत हें त्याला कळून आलें होतें. हे त्यांचे विशेष लक्षांत घेऊनच तो त्यांच्याशीं वागत होता. त्यामुळें त्यांची अशोकवर एवढी ममता जडली होती कीं, एक दिवस त्याला घरीं यायला उशीर झाला किंवा तो परगांवीं गेलेला असला तर ही सगळी मंडळी दरवाजाशीं गोळा होत आणि घरच्या माणसांच्या पायाशीं घसट करून आपल्या धन्याविषयीं पृच्छा करीत.

कृत्रिमतेचे जे बांध घालून त्याला जगाशीं वागावें लागे ते कुत्र्या-मांजरांच्या सहवासांत नष्ट होत. आपल्या मनांतील सगळ्या प्रेमाचा वर्षाव तो त्यांच्यावर करी. त्यामुळें जें समाधान त्याला इतरत्र लाभत

नसे त्याचा अनुभव त्याला येथें येई. हिरा आतां त्याला मांजरांसंबंधीं क्रमवार सांगूं लागली. रामानें काय केलें, लक्ष्मणानें काय केलें, पेद्रू व महंमद यांची कशी जुंपली, मग हें भांडण तिनें कसें मिटवलें, इत्यादि प्रसंग ती वर्णन करूं लागली. शेवटीं तिनें म्हटलें, 'भाई, तूं माणसांच्या सुंदर गोष्टी लिहितोस मग आमच्या कुत्र्यामांजरांच्या कां नाहींस लिहीत ? तीं तर आमच्याचप्रमाणें वागतात. '

हिराची ही कल्पना अशोकला फारच आवडली. या जनावरांच्या स्वभावावर आपणाला कितीतरी लिहितां येईल असें त्याला वाटलें. थोड्या वेळानें तो मेजाजवळ आला आणि त्यानें लवकरच एक लहानशी गोष्ट लिहून काढली. आणि मग ती हिराच्या स्वाधीन केली. हिरा गोष्ट वाचूं लागली.

राम व लक्ष्मण हे दोघे भाऊ होते. त्यांचें एकमेकांवर फारच प्रेम होतें. ते आपआपसांत कधींहि भांडत नसत. एकदां धन्यानें टाकलेला पावाचा तुकडा खात असतांना शेजारच्या एका बोक्यानें-काळूनें-रामावर हल्ला केला. रामानें मोठ्या धैर्यानें प्रतिकार केला. त्यानें काळूला ओरबाडलें, त्याचे चावे घेतले व त्याला रक्तबंबाळ करून सोडलें. पण या झगड्यांत तो बराच घायाळ झाला. लक्ष्मण बाहेर फिरावयास गेला होता. तो घरांत आला तेव्हां भावाची स्थिति पाहून त्याला फार वाईट वाटलें. त्यानें ते दोन दिवस त्याची फारच काळजी घेतली. तो तेथून हलला नाहीं. थोड्या दिवसांनीं राम हिंडूं फिरूं लागला. तेव्हां दोघांनीं कोणतें तरी खलबत केलें. काळूवर सूड उगवण्याच्या संधीची ते वाट पाहूं लागले. तो एकदां घरांत आला आहे असें पाहून त्यांनीं त्याच्यावर हल्ला चढविला. तो अशा रीतीनें कीं त्याला पकडींत कोंडून मागें रेटीत रेटीत त्यांनीं त्याला विहिरीकडे आणलें व त्याला आंत फेकून दिलें. काळूची स्थिति मोठी केविलवाणी झाली. दोन दिवसपर्यंत अन्नपाण्याशिवाय तो

विहिरीच्या एका खबदाडांत पडून राहिला. तिसऱ्या दिवशीं त्याला घरच्या माणसांनीं मोठ्या प्रयासानें वर काढलें. तेव्हां तो लंगडत लंगडत पळून गेला. यापुढें रामलक्ष्मणांच्या वाटेला तो परत कधींहि गेला नाहीं.

नंतर अशोक माजघरांत आला. राजीनाम्यासंबंधीं आज आपल्याला काकी विचारल्याशिवाय रहाणार नाहीं ही त्याची खात्री होती म्हणून त्यानें त्या दृष्टीनें काकींच्या चेहऱ्याकडे पाहिलें आणि तिची अस्वस्थ मुद्रा पहातांच तिचें समाधान आपण कसें करणार हा त्याला प्रश्न पडला. पण काकीनें त्याला राजीनाम्यासंबंधीं विचारलें नाहीं, तिनें त्याला निराळाच प्रश्न केला. 'गांवाला जाऊन तुला हल्लीं बरेच दिवस झाले. अशोक, चार पांच महिने झाले असतील नाहीं का ? '

'कशाला जायचं तिथं ?' अशोकनें हिरवट स्वरांत म्हटलें.

'तात्यांना काय वाटेल तूं अधून मधून तिथें गेला नाहींस तर ? ते तिथें एकटेच नाहींत का ?'

'त्यांना कांहीं देखील वाटणार नाहीं. तुला तरी हें सांगायला नको.' त्यानें किंचित् त्वेषानें म्हटलें.

'कांहीं माणसांचा स्वभाव वरून दिसतो तसा नसतो. त्यांना आपल्या भावना व्यक्त करतां येत नाहींत. तात्यांवरचा तुझा रोष रास्त नाहीं. तुझी त्यांना कळकळ नाहीं असं का तुला वाटतं ?' त्याची समजूत घालण्याच्या इराद्यानें तिनें म्हटलें.

'माझ्या मायेचा प्रश्न नाहीं इथं, काकी. तात्यांची आकुंचित एकलकोंडी वृत्ति मला नाहीं आवडत. माणसानं एवढं रुक्ष कां व्हावं ?'

'स्वभाव अन् परिस्थिति; दुसरं काय ? तात्या इतरांच्या सुखदुःखांशीं समरस होत नाहींत असें दिसतं खरं; पण मी विचारतें कीं आपलीं दुःखं तरी आपल्या माणसापुढें उघड करतात का ते कधीं ?

तुझी आई किती लहानपणीं वारली तुझ्या ? तेव्हांपासून तूं आमच्या मायेखालीं वाढलास. त्यामुळं तुझ्या त्यांच्यांत हळूहळू आजचा हा दुरावा निर्माण झाला. पण तुझ्याबद्दल त्यांना कांहीं वाटत नाहीं असं मात्र समजूं नकोस. तूं आतां संस्थेंतून निघालास हें कळलं म्हणजे त्यांना फार दुःख होईल.'

अशोक चमकला. आपल्या राजीनाम्याचें वर्तमान काकीला माहीत होऊन चुकलें आहे तर !

'मी अजून संस्थेंतून निघालों नाहीं.'

'म्हणजे ? मीं ऐकलं तें खोटंच का ?'

'तसं नाहीं......' तो अडखळत म्हणाला—'राजीनामा दिला आहे. मार्चपर्यंत संस्थेंत काम करावें लागेल. नंतर...'

'नंतर काय करायचं ठरवलं आहेस तूं ?' काकीनें काळजीच्या स्वरांत विचारलें.

'नंतर...तें अजून ठरवलं नाहीं.' हें उत्तर देतांना अशोक ओशाळा झाला.

'मग तें ठरवण्यापूर्वींच हा निश्चय केलास ?'

'तसं केल्याशिवाय इलाज नव्हता.'

'चालकांशीं मतभेद झाला हेंच कारण ना ?'

'हं. चालक हुकूमशाही गाजवीत आहेत. ती चालूं देणं मला शक्य नाहीं.'

'हुकूमशाही कुठं नाहीं असं तुला वाटतं ? दुसरीकडे हाच अनुभव येणार नाहीं कशावरून ?'

'तें मी आतांच कसं सांगूं ?'

'अशोक, हा स्वभावाचा प्रश्न आहे...'

थोडा वेळ कुणीच बोललें नाहीं. शेवटीं काकीनें म्हटलें:

'अशोक, या गडबडींत तूं तुझ्या तत्त्वनिष्ठेचा विचार केलास. पण एका महत्त्वाच्या प्रश्नाकडे दुर्लक्ष केलंस .'

अशोकच्या लक्षांत तिच्या बोलण्याचा रोख आला. जो नाजुक विषय तो टाळूं पहात होता, तोच आतां काकीनें पुढें आणला होता. या बाबतींत तिचें समाधान करणें सोपें नव्हतें. तत्त्वनिष्ठेनें व्यवहाराचे प्रश्न सुटत नाहींत हें त्यालाहि कळत होतें. त्याच्या आश्रयाला सात आठ माणसें होतीं. काकीचीं तीन मुलें, त्याचीं दोन भावंडें, एकाददुसरा गरीब विद्यार्थी आणि पैपाहुणा, अशा सात आठ माणसांच्या निर्वाहाची जबाबदारी त्याच्यावर होती. काकीच्या मुलांना तो भावंडाप्रमाणें वागवीत होता आणि त्यांना शिक्षण देऊन स्वतंत्र व स्वावलंबी बनवणें हें त्याचें कर्तव्य होतें.

अशोकच्या लहानपणीं काका-काकींनीं त्याला पुत्रवत् वाढवलें होतें. त्याचे सर्व प्रकारचे लाड त्यांनीं पुरवले होते. तो पंधरा वर्षांचा झाल्यावर काकीला पहिलें मूल झालें आणि नंतर थोड्याच वर्षांनीं काका वारले. दोन तीन मुलें झालीं, तरी अशोक आपला थोरला मुलगा आहे असें मानून ती वागली.

काका मृत्युशय्येवर पडले होते. तेव्हां अशोक आपलें लिसेवचें शिक्षण पुरें करून घरीं आला होता. काकांनीं शेवटच्या घटकेला त्याला जवळ बोलावून त्याच्या पाठीवरून हात फिरवून व मुलांकडे दृष्टि वळवून सांगितलें होतें: 'आतां माझ्या जागीं तूं हो आणि यांचा सांभाळ कर.'

या आठवणी अशोकच्या मनांत जाग्या झाल्या आणि काकीच्या बोलण्यांतील भीति त्याला आतां तीव्रतेनें जाणवली. नोकरशाहीचे दरवाजे त्याला आतां बंद होते. कारण, त्या तत्त्वावरच त्यानें सार्वजनिक आयुष्यक्रमांत उडी घेतली होती. गोमंतकीय वृत्तपत्रांतील त्याचें लेखन अर्थदायी कांहींच होऊं शकत नव्हतें. महाराष्ट्रांतील नियतकालिकांत

प्रसिद्ध होणाऱ्या लेखनावर त्याला पैसे मिळत. पण ही मिळकत अनियमित असल्यामुळें निर्वाहाला अपुरीच पडे. अशा स्थितींत त्याच्या वृत्तीला मानवेल असा व्यवसाय शोधून काढणें त्याला कठीणच होतें.

पण काकीला धीर देण्याच्या हेतूनें त्यानें म्हटलें:

' काकी, ही जागा सोडली म्हणून कांहीं भिण्याचें कारण नाहीं. असल्याच दुसऱ्या एकाद्या संस्थेंत मी काम करीन. शिवाय माझं लेखन आहेच. तूं मुळींच काळजी करूं नकोस. ' अशा शब्दांनीं तिची भीति नष्ट झाली नव्हती.

संकटासंबंधीं अगदींच थोडा विचार करायचा आणि भविष्यकाळाकडे आशापूर्ण दृष्टीनें पहावयाचें हा अशोकचा जन्मस्वभाव होता. परिस्थितीची दुर्घटता त्याला माहीत होती तरीहि स्वतःच्या कार्यशक्तीवर त्याचा विश्वास होता. आपल्यामध्यें सुखवस्तु जीवन सरकारी नोकरांच्या व जमीनदारांच्या वांट्याला गेलें आहे याची त्याला जाणीव होती. तरीहि या ना त्या साधनानें आपण अब्रूनें दिवस काढूं शकूं आणि चरितार्थाची जबाबदारी पार पाडीतच आपण ध्येयाचा मार्ग आक्रमूं शकूं असा त्याचा आशावाद होता.

या आशावादांत तो रंगून जात असे त्या वेळीं वास्तवतेची दारुण तीव्रता तो विसरून जाई. त्याची काव्यात्म वृत्ति जागृत होई आणि हिराच्या तोंडचीं सुंदर सुंदर गाणीं तो तन्मयतेनें ऐकत बसे किंवा Gerva Jun Guiro आणि Joad de Deas या त्याच्या आवडत्या थोर पोर्तुगीज कवींच्या काव्यवाचनांत दंग होऊन जाई.

' उद्यां आम्हांला सुटी आहे. आपण फिरायला जाणार. ' हिरानें भाईला म्हटलें.

आदितवारची आठवण झाल्याबरोबर लीनेला दिलेल्या वचनाची अशोकला जाणीव झाली आणि तिच्या सहवासांत जे गोड अनुभव

आपणाला येतील त्यांचीं कल्पनाचित्रें निवांतपणें रंगवण्यासाठीं तो खोलींत येऊन खाटेवर पडला.

# ४

अशोक पहिल्याच मोटारीनें ' राय ' ला जायला निघाला. त्या वेळीं सकाळचे सात वाजले होते. धुक्याच्या झिरझिरीत पडद्याआडून रसिकाला निसर्गाचें सुरम्य दर्शन घडत होतें. सूर्य नुकताच क्षितिजावर येत होता व त्याच्या कोवळ्या लालसर प्रकाशांत हिमस्नात सृष्टीला अवर्णनीय लावण्य प्राप्त झालें होतें.

त्याच्या मनांत या वेळीं लीनेसंबंधींचे विचार चालू होते. तिच्या बुद्धि-वैभवानेंच तो तिच्याकडे आकृष्ट झाला होता असें नव्हे. तिचें सौंदर्य, तिचें तारुण्य,आणि तिच्या अंगीं दिसून येणारा दोन संस्कृतींचा संगम या गोष्टींची त्याच्या मनावर त्या दिवशीं विशेष मोहिनी पडली होती आणि त्यामुळेंच फारसा विचार न करतां तिचें निमंत्रण त्यानें मोठ्या आनंदानें स्वीकारलें होतें.

आपल्या ध्येयाच्या सृष्टींत तो रंगून जात असे; पण भावनांच्या प्रांतांत तो ज्या ज्या वेळीं प्रवेश करी त्या त्या वेळीं त्याची सौंदर्यपिपासु वृत्ति जागृत होई आणि मधून मधून स्त्रीसौंदर्याचे विचार त्याच्या मनांत गोंधळ मांडीत. ध्येयाच्या व तत्त्वनिष्ठेच्या खालीं सुप्त राहिलेले विकार उफाळून वर येत, त्या वेळीं ते कलात्मकतेच्या सुंदर वेषांत नटून आले तरी त्यांचें अंतरंग कसें आहे याची त्याला पूर्ण जाणीव होती.

कधीं कधीं घरासमोरच्या ओढ्यावर कपडे धुणाऱ्या तरुण ख्रिश्चन पोरींकडे सौंदर्यासक्तीमुळें तो पहात राही. त्या वेळीं त्यांच्या अनावृत अवयवांचें निरीक्षण करतां करतां त्याची उपजत कामवासना जागृत होई. आपली ही दृष्टि केवळ कलाकाराची नाहीं, तींत भोगपिपासा आहे, हें त्याला कळून येई आणि तो मनांतल्या मनांत शरमून जाई. आपण स्वीकारलेल्या उच्च भूमिकेशीं आपली भोगलालसेची ही आगंतुकी सुसंगत नाहीं या कल्पनेचें शल्य त्याला सलूं लागे.

आतां त्यानें आपल्या मनाची चिकित्सा केली. तेव्हां त्याला असें दिसून आलें कीं लीनेच्या लावण्याची आपणाला ओढ लागली आहे. तिची गोंडस पण सडपातळ काया आपणाला भुरळ पाडीत आहे. तिच्या काळ्याभोर टपोऱ्या डोळ्यांनीं आपल्या हृदयाचा ठाव घेतला आहे. या विलोभनांत बुद्धीचें आकर्षण आहे; पण भावना-विकारांचा भाग अधिक आहे.

त्याच्या मनापुढून निरनिराळ्या कल्पना येऊन जात आणि त्याच्या नजरेपुढून निरनिराळीं निसर्गदृश्यें झराझर बदलत.

मोटार बोटीच्या पुलावर थांबली. त्याच्या समोरच्या बाकावर दोन सुस्वरूप तरुणी बसल्या होत्या. त्यांच्यावर त्याचें लक्ष स्थिर झालें नव्हतें. आपलें कल्पनासर्वस्व लीनेलाच अर्पण करावयाचें असा जणूं काय त्यानें मनाशीं निश्चय केला होता.

पुढचें दृश्य भव्योदात्त होतें. अघनाशिनीचें जलनिर्भर पात्र विस्तीर्ण शेतखाचरांमधून वळणावळणांनीं जात होतें आणि मखमली विलास-शय्येवर आळस झाडीत व उघड्या अंगाला आळोखेपिळोखे देत पहुडलेल्या रूपगर्वितेप्रमाणें तें शोभत होतें. खाडीच्या तीरावरील बांधावर पर्णाच्छादित वृक्षांची डौलदार रांग लागली होती आणि त्यांच्या दाट छायेखालीं कितीतरी कामकरी स्त्रीपुरुष विसांवा घेत होते. पिकलेल्या शेतां-

तून नागमोडी वळणानें एकादा कालवा वाहतांना दिसे. तो जणूं काय आईच्या कुशीत शिरून विश्वस्त वृत्तीनें दुग्धपान करणाऱ्या अवखळ बालकाप्रमाणें दिसत होता. शेतांच्या पलीकडे डोंगरांच्या ओळी एकामागून एक खडया होत्या. जणूं काय हें दृश्य पहाण्यासाठीं अहमहमिकेनें माना वर करून गर्दी करीत होत्या.

अशोक 'राय' ला केव्हां पोंचला हें त्यालाच कळलें नाहीं. मोटार थांबली. तो खालीं उतरला व पेरैराच्या घराची विचारपूस करीत चालूं लागला.

पेरैरांचा बंगला फारच भव्य व सुंदर होता. त्याला शोभण्यासारखीच पुढची बाग होती.

लीना बाहेर व्हरांड्यांतच त्याची वाट पहात बसली होती. ती या वेळीं काळ्या रुंद किनारीचें शुभ्र पातळ विकच्छ पद्धतीनें नेसली होती. आणि अंगांतला काळा पोलका सफेत धारेमुळें जास्तच खुलून दिसत होता. तिनें भुवयांच्या मधोमध कुंकवाची तीट लावली होती आणि तिनें आपली केशभूषा अशा रीतीनें सजवली होती कीं तिच्या कपाळाभोंवतीं केसांचें कृष्णवलय तयार झालें होतें व त्यामुळें तिच्या मुखमंडळाला दिव्य कांती प्राप्त झाली होती.

या खेपेला ती त्याला अधिकच मोहक दिसली. तिचा वेष तर किती साधा होता. अंगावरहि कोणतेच भारी अलंकार नव्हते. कानांत निळे लोलक डुलत होते तेवढेच. पण त्यांची प्रभा तिच्या कोवळ्या गालांवर नाचत होती आणि त्यामुळें तिच्या चेहऱ्यावर गोड स्मिताची लकेर खेळत राहिल्याचा भास होई. या सरळ साध्या प्रसाधनामुळें तिच्या मूळ सौंदर्यांत सांस्कृतिक पावित्र्याची भर पडली होती. आणि त्यावर पाश्चात्त्य कलादृष्टीच्या काव्यरम्य संस्कारांची झिलई चढली होती.

अशोक बंगल्याच्या पायऱ्या चढूं लागला. लीना लगबगीनें त्याला सामोरी आली Bom dia ची देवघेव झाली. हस्तांदोलनाचा विधि पार पडला. दोघांच्याहि मनांत भावनांची गर्दी झाली.

‘ इतक्यांत तुमच्या भेटीचा योग येईल असं वाटलं नव्हतं. ’

‘ म्हणजे फार लवकर आलों म्हणायचा मीं !’ तो स्मितपूर्वक म्हणाला.

‘ तसं नव्हे. कांहीं दिवसामागं मी ‘ विकास ’ मधला तुमचा परिचय वाचला त्या वेळीं इतक्या लवकर ही अशी भेट होईल असें वाटलें नव्हतं, असं मला म्हणायचं होतं. ’

या उत्तरानें त्याच्या मनाला आल्हाद झाला. लीनेला मराठी वाचनाचा नाद आहे असें कळून येतांच आपला हा नवा स्नेह दृढ करणारा एक धागा त्याला सांपडल्यासारखें झालें आणि तो म्हणालाः

‘ तुम्हांला मराठीचा व्यासंग असेल असं मला वाटलं नव्हतं. ’

या वेळीं त्याच्या मनांत अशी कल्पना येऊन गेली कीं लीनेनं आपलें साहित्य वाचून काढलें असेल आणि अशा रीतीनें आपल्या परिचयाचें काम पूर्वीच होऊन बसलें असेल या नाजुक कल्पनेनं त्याच्या मनाला गोड गुदगुल्या झाल्या.

‘ खरं सांगायचं तर आपल्या संस्कृतीचा अभ्यास करण्यासाठींच मी मराठी शिकलें. हो, आमचीच नाहीं का ही संस्कृति ? परक्यांच्या आक्रमणामुळें आम्ही तुमच्यापासून दुरावलों असलों तरी रक्तानं, परंपरेनं आणि भवितव्यानं आम्ही एकच आहों. ’

‘ मग त्या दृष्टीनं माझ्या पुस्तकांचा कांहीं उपयोग झाला का तुम्हांला? ’ असा प्रश्न तिला करावा असें त्याला वाटलें; पण त्यानें निग्रहानें तो विचार बाजूला सारला.

बोलत बोलत तीं दिवाणखान्यांत आली. तेथील वैभवशाली सौंदर्यसंपूर्ण दृश्य त्यानें पाहून घेतलें. विविध रंगांचें व आकाराचें नक्षीदार

जड फर्निचर, तैलवर्ण भिंतींना लटकावलेल्या भव्य तसबिरी, अधूनमधून तिपाईवर चकाकणारी धातूचीं घाटदार भांडीं, चिनी मातीच्या वेलबुट्टी-दार तबकड्या, दहाबारा दरवाजांना वरपासून खालपर्यंत लावलेले तलम जाळीदार रेशमी वस्त्रांचे पडदे, इत्यादि वैभवाचें अशोकनें निरीक्षण केलें. आणि नकळत त्याच्या मनावर विषण्णतेची छाया पसरली. वस्तुतः त्याच्यासारख्याच्या मनाला वैभवाचें हें दर्शन सुखद व्हावें; पण त्यांतच त्याला आपणां दोघांच्यामध्यें खोल दरी पसरलेली दिसली आणि लीना आपल्या इतक्याजवळ असूनहि त्याला ती दुरावल्याचा भास झाला. तिला मराठी अवगत आहे या जाणिवेनें थोड्या वेळापूर्वीं जो आनंद त्याला झाला होता, तो आतां कुठल्याकुठें नाहींसा झाला आणि त्याची जागा निराशेनें घेतली.

थोड्या वेळानें तीं लीनेच्या खोलींत आलीं. तिनें म्हटलें:

'अशोक, तुम्ही थकलेले दिसतां. थोडा वेळ विश्रांति घ्या. तुम्हांला इथं परकेपणा नाहीं.' तिच्या स्वरांतून आपुलकीचा भाव व्यक्त होत होता.

तो आरामखुर्चीत लवंडला. बाहेरून येणाऱ्या वाऱ्यानें त्याला किती तरी बरें वाटलें. एका वेगळ्याच जगांत नव्यानें प्रवेश केल्यामुळें त्याच्या हृदयांत विलक्षण हुरहूर उत्पन्न झाली.

लीना चहाचें ताट घेऊन आली. दोघेंही न्याहारी करूं लागलीं. लीना म्हणाली:

' घर तुमचेंच आहे. संकोच करूं नका. '

हे उद्गार कानावर पडतांच त्याला लाजल्यासारखें झालें. चहा घेतां घेतां तिनें विचारलें:

' तुम्ही आपल्या जागेचा राजीनामा दिला हें खरं का ? ' तिच्या प्रश्नांत ओतप्रोत कळकळ भरून राहिली होती.

‘ हो. त्याशिवाय मला गत्यंतर नव्हतं. ’ अन् त्यानें थोडक्यांत आपल्या राजीनाम्याचा इतिहास तिला सांगितला. तो ऐकून घेतल्यावर ती म्हणाली:

‘ तुमचा ध्येयवाद दांडगा आहे. तुमच्या पुस्तकांतून देखील त्याचें दर्शन यापूर्वींच मला झालें आहे. ’

अशोकला समाधान वाटलें. आपलीं पुस्तकें लीनेच्या वाचनांत आलीं असून तीं तिला आवडलीं आहेत, हा विचार त्याला स्फूर्तिदायक वाटला. तो कांहींच बोलला नाहीं. त्याची नजर खोलींतील लहानमोठ्या वस्तूंवरून खेळूं लागली. आलमारींतील लहानमोठे ग्रंथ, कोपऱ्यांत टांगलेलें फिडल व रॅकेट, इत्यादि सामानाचें निरीक्षण करतांना त्याचें मन द्विधा झाल्याशिवाय राहिलें नाहीं.

लीना म्हणाली, ‘ अशोक, मुंबईहून इथं येऊन मला दोन वर्षें झालीं. या अवधींत माझा कोंडमारा झाला होता. येथील परिस्थिति पाहून माझं मन गुदमरत होतें. हल्लींच तुमचें साहित्य वाचून माझ्या मनांत आशेचा किरण चमकला. ’

तिच्या बोलण्यांतील तळमळ पाहून तिच्या व्यक्तित्वाचा नवा पैलू आपल्या दृष्टोत्पत्तीला येत आहे असें त्याला वाटलें आणि कृतज्ञतेच्या स्वरांत तो म्हणाला:

‘ तर मग मीं स्वतःला भाग्यवान समजायला हरकत नाहीं. ’

‘ अशोक, व्यक्तींचीं सुखदुःखं तुम्हीं सुंदर रीतीनें रेखाटलीं आहेत. त्यांत तुमचा ध्येयवाद उजळून दिसतो, हेंहि खरं. पण एवढ्यानं आपलं काम झालं असं तुम्हाला वाटतं ?’

लीनेच्या बोलण्याचा रोख त्याला कळला नाहीं. त्याचा गोंधळ पाहून ती म्हणाली:

'सामाजिक दृष्टिकोनानं आतां तुम्ही व्यक्तींच्या सुखदुःखांकडे पाहिलं पाहिजे, नाहीं का ?'

अशोकला तिचें म्हणणें पटलें. ध्येयवादाची ज्योत आपण सगळ्या कृतींतून पाजळत ठेवली खरी; परंतु या ध्येयवादाला सामाजिक स्वरूपांत उभा करण्याचा प्रयत्न आपल्याकडून झाला नाहीं. शिवाय आपला ध्येयवाद अजून पोकळच नाहीं का ? तो अजून प्रत्यक्षांत कुठं उतरला आहे ? आपलीं उच्च तत्त्वें व्यवहारांत आणून त्यांच्या अनुरोधानें नवीन सामाजिक जीवन घडवण्याचा प्रयत्न अजून कुणी केला आहे ?

हें सगळें मनांत येऊन अशोक म्हणाला, 'लीना, आपला दोघांचा मार्ग एकच आहे.'

तिला आनंद झाला; पण तो चेहऱ्यावर दिसूं न देतां ती म्हणाली, 'तुमचा मार्ग कोणता तें मात्र कळूं द्या.'

अशोक क्षणभरच गोंधळला. उच्च तत्त्वांवर त्याचा विश्वास होता, स्वार्थत्यागाचें तत्त्व त्याला शिरोधार्य वाटत होतें, हें सगळें खरें; पण तत्त्वनिष्ठेची ही मर्यादा नेहमीं आपल्या पुरतीच आकुंचित ठेवायची का ? कीं तिचा विकास करून तींत समाज व स्वदेश यांचा अंतर्भाव करावयाचा ? तत्त्वनिष्ठेच्या आत्मप्रौढीवर आयुष्यभर गुजराण करावयाची कीं तिचें परिवर्तन सामाजिक चळवळींत करावयाचें? तत्त्वनिष्ठेचा गाजावाजा करून त्यांतून पोकळ वांझोटा ध्येयवाद उभा करावयाचा काय ? लीनेच्या एका प्रश्नांत असल्या कितीतरी शंका दडून राहिल्या होत्या. त्या तोडलेल्या झाडावरील पांखरांप्रमाणें चाळवून उठल्या.

अशोक स्तब्ध होता. लीनेनं त्याच्या उत्तराची अपेक्षा केली नाहीं. त्याला निरुत्तर करण्यासाठीं तो प्रश्न तिनें केला नव्हता. त्याचा तेजस्वी ध्येयवाद स्वर्गांत तरंगत आहे, त्यानें यापुढें जमिनीवर उतरावें, एवढेंच तिला सुचवायचें होतें.

' अशोक, मी तुमच्यापेक्षां सगळ्याच बाबतींत लहान आहे. तुमचा ध्येयवाद अंगीं बाणायला भाग्य पाहिजे, हें मला कळतं. तरीहि तो तुम्हीं पूर्ण केला पाहिजे आणि त्यासाठीं आजच्या गोमंतकाचें आपण दर्शन घेतलें पाहिजे. '

या शेवटच्या वाक्यानें अशोकला प्रकाशाचें दर्शन झाल्यासारखें वाटलें. गोमंतकाचें दर्शन ! होय. गोमंतकाचा आपण अभ्यास केला पाहिजे. त्याचीं सुखदुःखं आपण जाणून घेतलीं पाहिजेत. आपल्या दारुण दैन्याचा आपण ठाव घेतला पाहिजे. मग आपणाला मार्गदर्शन होईल अन् नंतर मार्गक्रमण.

त्याला लीनेचें म्हणणें पटलें. किती साध्या शद्बांत ती बोलत होती! पण तिचा आशय किती खोल व सत्य होता. ती स्त्री होती. त्यांत वैभवांत लोळणारी होती आणि तरीहि प्रत्यक्षाचें भेदक ज्ञान तिच्या ठिकाणीं होतें.

सौंदर्य व तारुण्य यांच्यावरच काल आपण भाळलों होतों. या दोन्हीं-पेक्षां बुद्धिवैभव व चातुर्य लीनेच्या अंगीं आहे याची जाणीव अशोकला झाली. तेव्हां त्याला आपल्या बालिश अपेक्षांची शरम वाटली आणि त्याच्या मनांत उत्पन्न झालेल्या आकर्षणाला आदराचें पूट चढलें.

हें सगळें वैभव आणि त्यांत वाढलेली तिची ही मनोवृत्ति यांचा मेळ कसा घालायचा, हें त्याला कळेना. अशा कितीतरी प्रश्नांनीं त्याच्या मनांत थैमान घातलें.

'अशोक, ही चर्चा आतां पुरे करूं. आम्हांला यापुढं खूप खूप बोलायचं आहे,नाहीं का?' तिच्या चेहऱ्यावरील गांभीर्य आतां ओसरलें व तेथें मनोवृत्ती-चा खेळकरपणा आतां नाचूं लागला.

ती उठली. तिनें फिडल उचललें आणि अशोककडे स्निग्ध नजरेनें पहात ती म्हणाली:

' शीण जायला छान आहे हें. '

तिनें फिडल डाव्या खांद्याला टेकलें व गज हातांत धरून तो तारांवरून फिरवतांना ती आकाशांत उड्डाण करण्याच्या तयारींत असलेल्या बलाक पक्ष्याच्या पवित्र्यांत उभी राहिली. फिडलमधून आर्त स्वरलहरी निघूं लागल्या. अशोकला वाटलें, जमिनीवरचे पाय सुटून लीना हळूहळू उडून गंधर्वलोकांत जात आहे.

इतक्यांत दोघां तरुणांनीं खोलींत प्रवेश केला आणि......

# ५

लीनेच्या हातांतला गज जिथल्या तिथें थांबला. वातावरणांत तरंगणारी स्वरमाला एकदम लुप्त झाली. अशोकच्या आंदोलित मनाला धक्का बसल्यासारखें झालें.

'लीना, चालूं द्या तुमचें वादन. आम्ही दोघे नाचाला सुरवात करतों. आम्हांला साथ होईल तुझी.' आणि इतकें म्हणून आल्बेर्तला लीनेच्या भावानें जवळ ओढून अवखळपणानें म्हटलें, 'चल, मित्रा, थोडा वेळ या पाहुण्यांना नाचून दाखवूं.'

या अनपेक्षित प्रकारानें अशोक थिजून गेला. त्याची मनःस्थिति लीनेच्या लक्ष्यांत आली. ती अस्वस्थ झाली. प्रसंग सांभाळून घेण्याच्या इराद्यानें तिनें कार्लुशला उद्देशून म्हटलें, 'कार्लुश, या पाहुण्यांची व तुमची आधीं ओळख करून देतें.' इतकें म्हणून तिनें फिडल खालीं ठेवलें व अशोककडे स्मितमुखानें पहात ती बोलूं लागली, 'हे अशोक देशपांडे. मराठींतील प्रतिभासंपन्न कथालेखक, एका शिक्षण-संस्थेचे मुख्याध्यापक, पोर्तुगीज लेखक...'

दोघांनींहि आश्चर्यानेंच अशोककडे रोखून पाहिलें. एक हिंदु तरुण इतकें सुंदर पोर्तुगीज लिहूं शकतो काय, या प्रश्नामुळें त्यांच्या मनांत कुतूहल निर्माण झालें होतें. कारण त्यांनीं स्थानिक नियतकालिकांतून

अशोकच्या कथा व लेख वाचले होते आणि त्यांचा लेखक कोण असेल, हें जाणण्याची उत्कंठाहि त्यांना अधूनमधून लागली होती. अशोकचे विचार त्यांना पसंत नव्हते, ही गोष्ट निराळी. लीनानें लवकरच त्या दोघांकडे मान फिरवून व अशोककडे नजर वळवून म्हटलें:

'हा माझा भाऊ कार्लुश आणि हे याचे मित्र आल्बेर्त लॉपिश. दोघेहि मेडिकल कॉलेजच्या चौथ्या वर्षांत आहेत.'

दोघांहि मित्रांनीं हंसतमुखानें अशोकशीं हस्तांदोलन केलें व त्यांच्यांत औपचारिक प्रश्नोत्तरें झालीं.

आल्बेर्त हा फिरंगी संस्कृतीचा अद्यावत नमुना होता. त्याचा उंची व ढंगदार पोशाख, लंपट वागणूक, भंपक बोलणें, इत्यादि गोष्टींमुळें अशोकचें त्याच्याबद्दल अतिशय वाईट मत झालें.

लीनेनें पुन्हां हत्यार हातीं घेतलें आणि त्यांच्याकडे दृष्टिक्षेप टाकीत म्हटलें, 'करतां ना सुरवात ?' आणि तिनें 'तांगु' नाचाची एक रोमांच-कारी गत वाजवायला सुरुवात केली.

फिडलच्या स्वरांतील विशिष्ट ठेके व आघात, त्यांचा उच्चनीचपणा, त्यांतली आर्तता व माधुर्य यांचा अशोकच्या मनावर इतका परिणाम झाला कीं नकळत त्याचे पाय हलूं लागले. त्याचें हृदय जणूं काय त्याच ताला-वर त्याच गतींत नाचूं लागलें.

हा पालट लीनेच्या चटकन लक्षांत आला. तिनें सुंदर हास्य करून म्हटलें, 'कार्लुश, तुमचा नाच सुरू होण्यापूर्वींच अशोकचे पदाघात सुरू झाले !' आणि अशोककडे वळून तिनें म्हटलें, 'तुम्हीं भाग घेऊं शकतां का यांत ?'

अशोकला हसूं आल्याशिवाय राहिलें नाहीं. कारण त्या कलेंत तो सर्वस्वीं अनभिज्ञ होता. स्वरसंवदेना ग्रहण करण्याइतका तो रसिक होता एवढेंच.

वर्तुळाकार मेजाभोवतीं दोघेहि नाचूं लागले.

लीना हंसत हंसत वाजवूं लागली. तिचें मघांचें गांभीर्य कुठेंतरी विरून गेलें. तिच्या शरीरांत एका खेळकर मोकळ्या विनोदी बालिकेचा आत्मा शिरला आहे असेंच अशोकला वाटलें.

त्याच्या कलात्मक दृष्टीला नर्तकांची जोडी बेढब वाटली. दोघेहि तरुण सुस्वरूप होते यांत शंका नाहीं. पण त्या जोडींत स्त्रीचीहि जागा पुरुषानेंच घेतल्यामुळें नृत्य निर्दोष असूनहि त्याच्या परिणामांत फार मोठें वैगुण्य राहून गेलें आहे असें त्याला वाटलें.

याच वेळीं लीनेच्याहि मनांत हा विचार उद्‌भूत झाला अन् तो व्यक्त करण्यासाठीं तिनें म्हटलें, 'अहं. असं हंसायचं नाहीं, अशोक.'

त्याबरोबर तर अशोकला हसूं आवरेना. कार्लुश व आल्बेर्त यांनीं वळून त्याच्याकडे पाहिलें. ते खजील झाल्यासारखे दिसले. 'मग तूंच ये ना, लीना. बघ तरी नाचाला कसा रंग येतो तो !' आल्बेर्त म्हणाला.

लीनेनें आढेवेढे घेतले नाहींत. तिनें फिडल भावाच्या हातांत दिलें. साडी नीट केली. केसांवरून हात फिरवला आणि आल्बेर्तच्या हाताचा पंजा पकडून आपल्या कंबरेभोवतीं त्याला आपल्या हाताचा सैल विळखा घालूं दिला. फिरून नाचाला चक्राकारपणें सुरवात झाली.

अशोकचें निरीक्षण चालू झालें.

लीना व आल्बेर्त यांचे देह पावलोपावलीं बिलगत व विलग होत. हातांचा विळखा कधीं आवळला जाई तर कधीं ढिला होई. वक्षःस्थलें भिडूं लागत, श्वासोच्छ्वास मिसळून जात आणि नजरेंत नजर मिळून जाई.

दिवाणखान्यांतल्या वैभवाच्या दर्शनानें त्याला वाटलें होतें कीं, लीनेचें व आपलें मीलन शक्य नाहीं. ती शंका आली, तशी लगेच निघूनहि गेली होती. आतांच्या या प्रकारानें मात्र एक नवाच संशय त्याच्या मनांत निर्माण झाला आणि त्यानें हळुहळू भयाण रूप धारण केलें.

तो कथालेखक होता. क्षुल्लक प्रसंगांत गूढ व्यापक अर्थ शोधण्याची व पात्राचें मनोविश्लेषण करण्याची त्याला संवयच होती.

त्या दोघांचें परस्परांवर प्रेम तर नसेल ना ? अशी शंका त्याला चाटून गेली आणि त्याच्या हृदयाला सूक्ष्म वेदना होऊं लागल्या. अन् ही शंका अगदीं स्वाभाविक नव्हती काय ? लीना सुंदर, सुशिक्षित, कथा-प्रेमी होती. त्यांचा दोघांचा धर्म एक होता. संस्कृति एक होती. लीनेनें जरी साडी परिधान केली आणि कुंकवाची तीट रेखली तरी तिच्या मनाची ओढ असल्या विलासी जीवनाकडे असली तर त्यांत नवल तें काय ? पण मग तिच्या लेखनांत व भाषणांत दिसून येणारा मनाचा निर्धार व जळजळीतपणा यांची संगति कशी लावायची ?

सार्वजनिक प्रश्नांसंबंधीं तिची आपली जी चर्चा झाली, तिचा अर्थ काय ? ध्येयवादाची तिनें एवढी स्तुति केली ती त्यागाला तिच्या दृष्टीनें कांहीं तरी मोल आहे म्हणूनच नाहीं काय ? मग...

या प्रश्नांनीं तो गोंधळून गेला. त्याच्या भावनांना विलक्षण हळुवार-पणा आला. लीनेसंबंधीं ज्या निरनिराळ्या सुखद कल्पना केल्या, त्या करण्यांत आपण फार मोठी घाई केली असेंच त्याला वाटलें. आणि या विचारामुळें समोरच्या सुरम्य नृत्याशीं त्याला समरस होतां आलें नाहीं.

नाचाला गति आली. रंग भरला. तेव्हां उभय देहांचा एकच देह बनला असून त्यांत एकाच प्राणाचें स्पंदन चालू आहे आणि एकाच संवेदनेचें स्फुरण त्यांना गति देत आहे, असा त्याला भास झाला. आणि त्यासरशीं एक दाहक वेदना आपादमस्तक त्याच्या देहांत चमकून गेली.

थोड्या वेळानें लीना व आल्बेर्त दमलीं. त्यांनीं नाच संपवला. लीनेनें अशोकला उद्देशून म्हटलें, ‘कंटाळा नाहीं ना आला तुम्हांला ?’ अशोकला

रिझविण्यासाठीं तिनें आपल्यापरीनें नृत्य-कौशल्याची पराकाष्ठा केली होती. आणि आतां त्याच्या तोंडचे गौरवपर उद्गार मिळवण्यासाठींच जणूं अधीरपणें हा प्रश्न तिनें केला होता.

'छे ! छे ! छान झाला तुमचा नाच.' अशोकनें उत्तर केलें. पण या उत्तरानें ती उल्हासित झाली नाहीं. उलट तिचा विरसच झाला. कारण त्याच्या शद्बांतील स्वरांचा झोंक व मुद्रेवरचा विद्धतेचा भाव हे लक्षांत येतांच ही स्तुति वरकरणी आहे अशी तिची खात्री झाली. पण लगेच त्याच्या या मनःस्थितीचें खरें कारण तिला उमगलें आणि कोणत्याहि गौरवपर उद्गारांपेक्षां ही जाणीव अधिक सुखकर झाली.

इतक्यांत नोकरानें टपाल आणून लीनेच्या हातीं दिलें. त्यांतलीं पत्रें बाजूला काढून नियतकालिकांचे अंक तिनें अशोकच्या पुढें केले. त्याची परवानगी मागून ती पत्रें वाचूं लागली आणि अशोक 'एदाल्द'च्या अंका-वरून नजर फिरवूं लागला.

एकाएकीं त्याची मुद्रा पालटली. तो अस्वस्थ झाला. आणि खुर्चीवरून उठून त्यानें म्हटलें, 'लीना !...'

लीजेनें त्याच्याकडे पाहिलें अन् ती दचकली. त्याच्या मुद्रेवरील पालटाचें कारण तिला कळेना.

'मी तुमचा निरोप घेतों.' तो पुढें म्हणाला.

'इतक्यांतच चाललांत ? अशी घाई कां ?'

अशोकनें वर्तमानपत्रांतल्या त्या बातमीवर बोट ठेवून तें तिच्या-पुढें केलें.

तिनें चटकन ती वाचून टाकली. त्यांत जनतेचीं गाऱ्हाणीं घेऊन गेलेल्या पुढाऱ्यांना सरकारनें अटकेंत टाकल्याचें वर्तमान होतें.

सारा खेळकरपणा विसरून लीनाहि गंभीर झाली. क्षणमात्र तिच्या मनाची ओढाताण झाली. एका बाजूनें अशोकप्रमाणें तिचेंहि मन

अस्वस्थ झालें. पण दुसऱ्या बाजूनें अशोकच्या बाबतींत तिनें जे संकल्प केले होते ते जेथल्या तेथें विरून जाण्याची वेळ आली होती. अशा द्विधा मनःस्थितींतच ती बोलून गेली, 'ताबडतोबच गेलं पाहिजे का? किती किती बोलायचं होतं मला !'

'क्षमा करा. मी आतां न गेलों तर माझं मन कशांतच रमणार नाहीं.' असें बोलून घाईघाईनें अशोकनें त्यांचा निरोप घेतला व तीराप्रमाणें तो तेथून निसटला. त्या वेळीं लीना, तिचें वैभव, तिची बुद्धि, तिचें लावण्य, तिच्या सहवासांतल्या स्मृती, आल्बेर्तोविषयींच्या शंकाकुशंका, हें सगळें तो पार विसरून गेला होता. एकच प्रश्न त्याला सारखा सतावीत होताः 'त्यांना सरकारनं अटकेंत कां टाकलं असेल...? कां...?'

## ६

अशोक गांवीं आला तेव्हां त्याच्या कानावर अशी बातमी आली कीं, कैदेंत टाकलेल्या पुढाऱ्यांची मुक्तता करण्यांत आली आहे. हें वर्तमान कळतांच त्याच्या मनावरील भार अकस्मात् हलका झाला व त्याला समाधान वाटलें. परंतु त्या पुढाऱ्यांची भेट घेऊन हें प्रकरण समजून घेण्याची त्याची इच्छा कायमच राहिली आणि हा बेत कांहीं दिवसापुरता बाजूला सारण्यासारखी परिस्थिति उत्पन्न झाली.

दुसऱ्या दिवशीं त्याच्या आईचा श्राद्धदिन होता. त्याची त्याला आठवण नव्हती. काकींनीं त्याला ती करून दिली. तेव्हां कोणताच विलंब न लावतां तो तांतडीनें बाहेर पडला. कांहीं झालें तरी संध्याकाळपर्यंत त्याला आपल्या मूळगांवीं पोंचल्याशिवाय गत्यंतर नव्हतें.

अशोकच्या मनांत वडिलांविषयीं खोल अढी होती. ते सरकारी नोकर होते. शिवाय कृपण होते. निदान त्याची अशी समजूत होती. या कारणामुळें त्याच्या मनांत वडिलांबद्दल फारसा आदर नव्हता. आई वारली तेव्हांपासून त्याचा काकाकाकींशींच अधिक निकट संबंध आला. नोकरीच्या निमित्तानें रामराव पणजीला असत. त्यामुळें अशोक त्यांच्या मायेला दुरावला होता हें तर खरेंच; पण शिवाय ज्या ज्या वेळीं ते घरीं येत किंवा पणजीला अशोकची व त्यांची भेट होई त्या त्या वेळीं देखील

त्यांच्या वर्तनांत प्रेमाचा ओलावा त्याला फारसा कधीं जाणवला नाहीं. मुलाच्या सान्निध्यांत ते मुकस्तंभ बनत. त्यामुळें त्याच्यावर मायेचें जें पांघरूण काकांनीं घातलें त्याबद्दल त्याच्या मनांत जसजशी कृतज्ञता व आदर हीं वाढत गेलीं, तसतसें रामरावांबद्दल त्याच्या मनांत औदासिन्य शिरलें, व कित्येक वेळां त्याला तिरस्काराचें स्वरूप प्राप्त झालें.

अशोकची प्रकृति भावनाप्रधान होती. तो जात्या कलावान होता. त्यागाची प्रतीति जेथें येई, तेथें त्याची मान आदरानें नम्र होई. दिव्य व भव्य असें कांहींतरी एखाद्या व्यक्तींत त्याला दिसून आलें कीं तेथें त्याचा प्रणाम असे. माणसांना तोलण्याचें त्याचें मोजमाप हें असें जगावेगळें होतें. लौकिक मोठेपणाचें कवच भेदून त्याची मूलग्राही दृष्टि अंतरंगाचा ठाव घेई. एखाद्या गरीब व अडाणी माणसांत हृदयाचा थोरपणा किंवा भावनेची तेजस्वी चमक व त्यागाची अलौकिक छटा त्याच्या नजरेला आली म्हणजे लौकिकाचीं सगळीं बंधनें विसरून तो त्याचा दास होई. उलट सत्ता व संपत्ति यांच्या शिखरावर चमकणाऱ्या व्यक्ती कित्येकदां त्याच्या निषेधाला पात्र होत.

नोकराळ मनोवृत्तीच्या माणसाचा त्याला तिरस्कार होता. या बाबतींत तो कांहींसा आत्यंतिकतेनें वागत असे. सगळेच सरकारी नोकर स्वार्थी, देशद्रोही, स्वाभिमानशून्य नसतात हें त्याला माहीत नव्हतें, असें नाहीं. तरीहि सरकारी नोकरीच्या चौकटींत बसलेल्या व्यक्तींबद्दल नेहमींच तो तुच्छतेनें बोलत असे आणि ही मनोवृत्ति ज्या पुढाऱ्यांनीं पोसली त्यांच्याबद्दल तर त्याला पराकाष्ठेचा तिटकारा होता.

एका प्रबल मोहाचा प्रतिकार करूनच तो आज घरीं आला होता. आज त्याच्या आईचा श्राद्धदिन होता. वडिलांच्या भावनांपेक्षां आईच्या स्मृतीचेंच आकर्षण त्याच्या बाबतींत प्रभावी ठरलें होतें. आपल्या राजी-नाम्यासंबंधीं वडील आपल्याला विचारल्याशिवाय राहाणार नाहींत, हें

त्याला पक्कें माहीत होतें. दहा वर्षांपूर्वी सरकारी नोकरीचें आमिष बाजूला सारून त्यानें आपल्या शिक्षण-संस्थेंत प्रवेश केला, त्या वेळीं तात्यांनीं त्याला पहिला मोठा उपदेश केला होता. आतां तो संस्थेंतून बाहेर पडत होता, अशा वेळीं त्यांच्या भावनांचा दुसरा उद्रेक त्याला पहायला मिळणार होता. त्यालाहि त्याच्या मनाची तयारी होती.

त्यानें श्राद्धविधि पार पाडला. त्या मंत्रतंत्रावर त्याची श्रद्धा नव्हती हें खरें; परंतु आपल्या आईच्या स्मृतीसाठीं त्यानें मोठ्या सहनशीलतेनें उपाध्येबुवांची कर्मकटकट मान्य केली. त्याला आईची पुसट आठवण होती. तो दहा वर्षांचा असतांनाच ती वारली होती; पण त्या वयांतहि तिच्या कांहीं गुणांचा ठसा त्याच्या बालमनावर उमटला होता. तिचा करारीपणा, तिची दयाशीलता, तिची सहनशीलता, इत्यादि गुण ज्यांत प्रकट झाले होते, असे कांहीं प्रसंग त्याला आठवल्याशिवाय राहिले नाहींत. आपल्या आयुष्यांत कधीं कधीं जो कसला तरी उणेपणा आपल्याला जाणवतो, तो आई ह्यात असती तर तिनें भरून काढला असता असेंहि त्याला वाटलें.

संध्याकाळीं तात्यांनीं त्याला बोलावून घेतलें. तो खोलींत शिरला. त्यांनीं त्याला बसण्याची खूण केली. तो खुर्चीवर बसला. ते आरामखुर्चीवर लवंडले होते.

अशोकनें त्यांच्याकडे पाहिलें. नेहमीं शांत, निर्विकार असणारा त्यांचा चेहरा आतां संत्रस्त दिसत होता. त्यांच्या अंतरींच्या कलहाचें प्रतिबिंब त्यावर पडलें होतें. त्यांच्या शुभ्र पिळदार मिशांनीं त्यांच्या मुद्रेला गांभीर्याची छटा आली होती. त्यांच्या थकलेल्या नजरेंत जी चमक अधूनमधून खेळत होती ती पाहिल्यानंतर असें वाटें की, सुखासीन जीवन व्यतीत करणाऱ्या या वृद्धालाहि जीवनाविषयींची एक निश्चित विचारसरणी असली पाहिजे.

'राजीनामा दिलास? ' त्यांनीं कांहीं वेळानंतर विचारलें. या वाक्याच्या मागें अर्थाची व भावनेची जी आंच होती ती अशोकला तीव्रतेनें जाणवली.

'हो.' त्यानें उत्तर केलें. यापलीकडे काय बोलावें तें त्याला सुचेना.

'आयुष्यांत हा दुसरा मूर्खपणा केलास.' इतकें म्हणून त्यांनीं ओठांची विचित्र चाळवाचाळव केली. भिवया वरखालीं केल्या. नशिबा-प्रमाणेंच सारें कांहीं घडतें असेंच जणूं कांहीं त्यांना दिग्दर्शित करावयाचें होतें.

आपण नोकरीकडे पाठ फिरवली हा आपला पहिला मूर्खपणा होता, असा विचार अशोकच्या मनांत चटकन येऊन गेला.

त्यानें उत्तर केलें नाहीं. त्याला वडिलांना यथेच्छ बोलूं द्यावयाचें होतें. त्याच्या दृष्टीनें त्यांची विचारसरणी चुकीची असली तरी तिचा उगम त्याच्या हिताबद्दलच्या त्यांच्या तत्परतेंत होता, हें त्याला माहीत होतें.

या स्तब्धतेंत कांहीं वेळ निघून गेला. घड्याळाची टकटक चालू होती. समोरच्या भिंतीला त्याच्या मृत आईचा फोटो टांगला होता. त्यावर जाईचा फुललेला हार लोंबत होता. त्याचा सुगंध खोलींत दरवळत होता.

'अशोक, तूं साधा सरळ आहेस. पण मूर्ख आहेस. जगाच्या दृष्टीनें तुझ्या ध्येयाला कोणतीच किंमत नाहीं.' तात्यांनीं ठासून सांगितलें.

अशोकच्या मुद्रेवर प्रश्नात्मक भाव उभा राहिला. विकारवश व्हावयाचें नाहीं असा त्यानें मनाशीं निश्चय केला होता.

'तूं अजून लहान आहेस. तुला जगाचा अनुभव नाहीं. तो तुला यापुढें यावयाचा आहे. माझ्या सांगण्यांत कांहीं तथ्य आहे, असें तुला त्या वेळीं कळून येईल.' त्यांच्या स्वरांत आतां भावनांचा कंप उमटूं लागला.

'तुझ्या ध्येयवादाची किंमत मला कळते. पण त्याच्या पायीं जें खडतर जीवन माणसाला घालवावें लागतें, तें तुझ्या नशिबीं येऊं नये अशी माझी इच्छा होती आणि म्हणूनच तुला दहा वर्षांपूर्वीं मीं विरोध केला होता. अनुभवांतीं तुला शहाणपणा येईल म्हणून मी तुझ्याबद्दल

उदासीन राहिलों होतों. पण तूं शहाणा झाला नाहींस. अन् आतां तर ही दुसरी चूक करून बसलास.'

'बाबा, जगाच्या कसोटीवर तुम्ही माझ्या कृत्याची पारख कां करतां ?' अशोकनें हळूच प्रश्न केला.

'याचें कारण असं कीं तुला या जगांत राहायचं आहे. जगाशीं संबंध तोडून तुला कांहींच करतां यायचं नाहीं. सभोंवतालचा व्यवहार व तुझा ध्येयवाद यांच्या अनिवार्य कलहांत तुझ्या ध्येयवादाचा कपाळमोक्ष होईल यांत मला मुळींच शंका नाहीं.' अशोकच्या वडिलांनीं आग्रही स्वरांत सांगितलें.

थोड्या वेळानें त्यांनीं आपलें भाषण चालू केलें, 'दरिद्याच्या ध्येयवादाला किंमत नसते. गरिबाच्या त्यागाला कोणी विचारीत नसतो. ध्येय व तत्त्व यांचा त्यानें सारखा आक्रोश करावा आणि एक दिवस आयुष्यांतील सगळ्या जहराचा अनुभव घेऊन मरून जावें, हें तुम्हां मूर्खांचें भवितव्य असतें.'

'पण, बाबा, या ध्येयवादानेंच मानवता पुढें सरकत आहे ना ?'

'मोठमोठे शब्द वापरले म्हणून हे प्रश्न सुटत नसतात. मानवतेच्या गोष्टी म्हणजे पोकळ बडबड आहे नुसती. चुकतोस तूं, अशोक. आपल्या समाजांत तुला ही माणुसकी दिसते का ?' अशोक गप्प राहिला. कारण त्याच्या वडिलांचें म्हणणें खोटें नव्हतें.

'आज येथील परिस्थितीच अशी आहे कीं नोकरशाहीच्या बाहेर स्वतंत्र कर्तृत्वाला येथें वाव नाहीं. म्हणूनच आमचा सगळा बुद्धिमान् वर्ग येथें अडकून पडलेला आहे. ज्याला स्वास्थ्य पाहिजे असेल, त्यानें नोकरशाहींतच शिरलें पाहिजे!'

'आणि मृतवत् जीवन अनुभवलं पाहिजे.' अशोक न कळत बोलून गेला.

रामरावांनीं चमकून त्याच्याकडे पाहिलें आणि थोड्या वेळानें उत्तर केलें, ' ज्यांना जीवनाचं खरं मोल कळलेलं नाहीं त्यांना नोकरशाहींतलं जीवन मृतवत् वाटतं असं का तुझं मत आहे ? '

' ज्यांना हें मोल कळतं त्यांनीं प्रवाहपतित व्हावं कां ? ध्येयाच्या मोलानं हें निष्क्रिय, स्वाभिमानशून्य जीवन पत्करावं कां ? '

'पत्करूं नये. पण कुणी ? तुझ्यासारख्यानं नव्हे. आयुष्याचा होम करण्याची ज्याची तयारी आहे अशा वैभवशाली तरुणानं. जगाचे सगळे संबंध स्वार्थावर, ढोंगावर, कुटिलतेवर आधारलेले असतात. त्यांच्याशीं तुला झगडा द्यावा लागेल. तुझी सांपत्तिक स्थिति चांगली नसली तर हा झगडा तुला पुढें चालवतांच येणार नाहीं हें तूं पक्कं समज. ''

वडिलांच्या उद्गारांतील सत्य त्याला हळूहळू पटत होतें.

' असत्याचा, अन्यायाचा, दांभिकतेचा तूं लेखनाच्या द्वारां निषेध करीत आहेस तोंवर तुझ्या वाटेला कुणी जाणार नाहीं; पण प्रत्यक्ष कार्यांत तूं आपला मार्ग कापूं लागशील तेव्हां शेंकडों संकटं तुझ्यापुढं उभीं राहातील. तुझा पक्ष सत्याचा असेल; पण तूं एकटा आहेस. सगळा समाज दुसऱ्या बाजूला आहे. '

बाबांच्या वर्तणुकीचें मर्म त्याला आतां कळूं लागलें होतें. ध्येयाच्या, साम्राज्यांत तो तरंगत होता. त्याला पहिला धक्का त्याच्या संस्थेच्या चालकांनीं दिला होता. वडील त्याला आतां नवी दृष्टि देत होते.

' तूं एकटा नाहींस. कांहीं माणसांच्या चरितार्थाची तुझ्यावर जबाबदारी आहे. सरकारला विरोध करून नोकरशाहींत असलेल्या तुझ्या मित्रांचा, नातेवाईकांचा अधिक्षेप करून आणि इतर समाजाच्या व्यवहाराभोवतालचें दांभिकतेचें आवरण फाडून ही जबाबदारी तुला पार पाडतां येईल, असं तुला वाटतं ?'

अशोक गप्प राहिला.

' श्रीमंत निर्बुद्धांना आज मोल चढलेलं आहे. नोकरशाहीकडे समाजाचें आज पुढारीपण गेलेलं आहे. ही स्थिति पालटायला आपल्या हातून प्रचंड धडपड झाली पाहिजे. हें काम एकस्यादुकस्याचं नाहीं. या धडपडींत तूं चिरडून जाशील. '

थोडा वेळ कोणीच बोललें नाहीं. घड्याळाची टकटक तेवढी चालू होती.

'तुला लोककार्य करायचं आहे का ? खुशाल कर. पण संसाराला लाथ मारून घराबाहेर पडण्याची तुझ्या अंगीं ताकद असली तर कर. तुझं ध्येय फलद्रूप होईल, तुझ्या कर्तृत्वानं समाज कार्यप्रवण होईल, तुझ्या निर्वाहाचा प्रश्न सहजतेनें सुटेल अशी वेडी आशा बाळगूं नकोस. संकटाची निश्चित कल्पना करून घेऊन मग पुढें उडी टाक. माझा तुला आशीर्वाद आहे. ' हें सांगतांना रामरावांची मुद्रा विलक्षण कारुण्यभावानें भरून गेली आणि त्यांच्या स्वरांत गहिंवर उमटला.

त्यानें आवेगभरांत त्यांना नमस्कार केला.

वडिलांच्या आकुंचित विचारसरणीचा केव्हां केव्हां त्याला राग येई, तो किती अनाठायीं होता तें त्याला आज कळून आलें. पण त्याच बरोबर दुसरी एक शंका त्याच्या मनांत येऊन गेली.

त्यांनीं आपल्या आयुष्याचें तत्त्वज्ञान सांगितलें खरें; परंतु अशोकची दुःस्थिति हलकी होण्यासारखें त्यांच्या हातून कांहींच घडलें नाहीं. त्यांच्याकडून आपणाला मोठी मदत होईल अशी अपेक्षा अर्थातच त्यानें कधीं केली नाहीं. तरीहि आतां त्यांनीं आपल्याबद्दल जी सहानुभूति दाखवली ती नुसती शाब्दिकच होती, हें शल्य त्याच्या मनाला बोंचल्याशिवाय राहिलें नाहीं.

वडिलांच्या वर्तनासंबंधीं असे परस्पर विरोधी विचार करीतच त्यानें त्यांचा निरोप घेतला.

## ७

अशोक अकस्मात् निघून गेला आणि लीनच्या मनाची रुखरुख सुरू झाली.

तिनें त्याला मुद्दाम निमंत्रण देऊन बोलावलें होतें. पण त्याच्याशीं तिला मनमोकळेपणानें बोलतां आलें नव्हतें. त्यांत आपलाच दोष आहे असें तिला विचारांतीं दिसून आलें. तेव्हां तिची तळमळ अधिकच वाढली.

अशोककडे त्या अवधींत तिला कितीतरी गोष्टींसंबंधीं बोलतां आलें असतें. त्याच्या आयुष्यांतील सुखदुःखासंबंधीं तिला जिव्हाळा दर्शवितां आला असता. त्याच्या गुणांबद्दल तिला जो आदर वाटत होता, तो व्यक्त करतां आला असता. त्याच्या व्यक्तित्वाबद्दल तिला जें आकर्षण पडलें होतें, तें सूचित करतां आलें असतें. आणि विशेषतः ज्या गोड व व्यापक भावनेनें तिचें हृदय व्यापून टाकलें होतें, ती भावना त्याच्या हृदयापर्यंत तिला भिडवितां आली असती. आणि मग अशोकची स्थिति काय होते याचा ठाव तिला घेतां आला असता.

तें कांहींहि न करतां तिनें व्हायोलीन वाजवून त्याची करमणूक केली होती आणि आल्बेर्तशीं नाच करून त्याचें नेत्ररंजन केलें होतें.

पण त्याला आपलें हें वर्तन आवडलें असेल काय ? नुकत्याच होत जाणाऱ्या आपल्या परिचयांतील आकर्षणापेक्षां आल्बेर्तबरोबर नाचण्याचा

मोह आपल्याला अधिक पडला, असेंच अशोकला वाटलें नसेल ना ? त्या दिवशीं तो आपल्याकडे राहील, मग संध्याकाळीं आपण दोघेंहि समुद्रावर फिरायला जाऊं; तेथें आपण निवांतपणें सर्व प्रकारच्या गप्पागोष्टी करूं; अशा आशेनेंच आपण नृत्यवादनाला त्या वेळीं प्राधान्य दिलें. पण याचा परिणाम विपरीत झाला नाहीं ना ?

आणि याच वेळीं तिच्या मनांत आल्बेर्तसंबंधीं निरनिराळे विचार येऊं लागले.

आल्बेर्त देखणा होता. सुशिक्षितहि होता. पाश्चात्त्य सुधारणा आपण आत्मसात् केली आहे अशी त्याला घमेंड होती. फिरंगी संस्कृतीचा आपण जणूं काय प्रतिनिधि आहों, अशा अभिनिवेशानें तो लोकांशीं वागत होता. आपण सुखी आहों म्हणून सगळा गोमंतक सुखी आहे अशी त्याची समजूत होती. सिनेमा, त्यांतील नटनटी, शहरांतील क्लब व तेथील घडामोडी, गांवच्या सुंदर तरुणींचे प्रेमळ व्यवहार, पोशाखाच्या, बोलण्याचालण्याच्या फॅशन्स्, दिखाऊ सुशिक्षितांच्या वाचनाचा विषय झालेल्या कादंबऱ्या, इत्यादि विषयांवर तो इतक्या अधिकारानें, तादात्म्यानें बोलत असे कीं त्याचे श्रोते खरोखरच त्याच्यावर खूष होत.

आल्बेर्तच्या या सगळ्या गुणांची लीनेला जाणीव होती. तिच्या जागीं दुसरी एकादी तरुणी असती तर त्याच्याशीं स्नेह जुळविण्यांत, त्याच्याशीं प्रणयाचे खेळ खेळण्यांत तिनें धन्यता मानली असती; पण हेच गुण तिला इतके नकली, बेगडी व दुबळे वाटत कीं त्यांचें वेळीं अवेळीं प्रदर्शन करणारा आल्बेर्त तिच्या तिरस्काराला नसला, तरी हास्याला पात्र झाला होता. तिच्या दृष्टीनें तो हास्यास्पद होत आहे, हें त्याला अद्याप कळून आलें नव्हतें; कारण तेवढी काळजी ती घेत होती.

जेवणाची वेळ झाली. तिचे वडील, तिचा भाऊ कार्लुश व आल्बेर्त जेवायला बसले; मेजाच्या मधोमध फुलांचे दोन तीन गुच्छ रंगीबेरंगी

पात्रांत घालून ठेवले होते. त्यांचा सुवास वातावरणांत दरवळत होता.

पेरैरांनीं लीनेकडे पाहिलें. ती त्यांना चिंताक्रांत दिसली. नेहमीं ती किती खेळकर, आनंदी, विनोदी दिसत होती ! इतकें असूनहि ती गंभीर होती. गांभीर्य हा तिच्या स्वभावांतील स्थायीभाव होता. पण तिच्या मनावर झालेले शिक्षणाचे व सहवासाचे संस्कार इतके निराळे होते कीं आपल्या स्वभावांतील वरील वैशिष्ट्य संभाळूनहि ती निरनिराळ्या कलांत रंगून जाई व खेळांत दंग होऊन जाई. त्यांच्याकडे येणाऱ्या पाहुण्यांच्या किंवा घरच्या मित्रांच्या संभाषणांत मोकळेपणानें भाग घेई;इतकेंच नव्हे तर वृत्तीनें व विचारसरणीनें ती वडिलांपासून सर्वस्वीं दुरावली असली तरी त्यांच्याशीं थट्टाविनोद करण्यांत व प्रसंगीं वादविवाद करण्यांत ती मागें रहात नसे.

आजहि असेंच झालें. पेरैरांनीं जेवतांना तिला विचारलें, 'अशोक देश-पांडे इथें येऊन गेले का ?'

' हो. तुम्हांला भेटायची त्यांची फार इच्छा होती. ' लीनेनें उत्तर केलें. वस्तुतः अशोकनें तशी इच्छा मुळींच दाखविली नव्हती, हें तिला चांगलें माहीत होतें.

" मग त्यांना ठेवून घ्यायचं होतंस तूं. " पेरैरांनीं उपरोधी स्वरांत म्हटलें.

त्यांच्या स्वरांतील कडवटपणा लीनेला जाणवला. परंतु तो बाहेर न दाखवतां तिनें शांतपणानें उत्तर केलें, ' त्यांना अकस्मात् काम आलं म्हणून ते निघून गेले. '

थोड्या वेळानें पेरैरा हंसत म्हणाले, ' तुम्हां दोघांचं छान जुळेल. '

' म्हणजे जोडा जुळेल म्हणतां ? ' आल्बेर्तनें पृच्छा केली.

' अरे, पण तूं आहेसना इथं. ' पेरैरा उद्गारले.

' आमची डाळ इथं कुठं शिजायला ? त्या दोघांचे स्वभाव जुळतात.

त्यांचीं ध्येयं एक. आवडीनिवडी एक.' आल्बेर्त फटकळपणानें बोलून गेला.

' तुम्हाला सांगितलं होतं का मी यासंबंधीं ? ' लीनेनें आल्बेर्तकडे वळून किंचित् रोषानें प्रश्न केला.

' असल्या गोष्टी लपून राहतात का कधीं ? लीनाताई, तुम्ही रागावूं नका. पण तुमचं साहित्यच पुरे नाहीं का हें सगळं कळायला ? '

' आतां बहुमत यांचं होईल आमच्या घरांत. ' लीनेकडे नजर वळवून पेरैरा म्हणाले.'आतांपर्यंत लीना एकटीच माझ्याशीं भांडत होती. यापुढं तिला प्रबल साथीदार मिळेल. आतां आपण जपून वागलं पाहिजे; नाहीं का ?'

सगळेजण मनमोकळेपणानें हंसले. लीनेनेंहि वरकरणी त्यांत भाग घेतला.

' हिचा माझ्यावर कटाक्ष कां आहे माहीत आहे का तुला, आल्बेर्त ? '

' तुम्ही सांगाना. ' आल्बेर्तनें डोळा मोडून लीनेला डिंवचण्याच्या इराद्यानें म्हटलें.

' मी इथं फिरंगी संस्कृतीचं समर्थन करतों म्हणून.' पेरैरा उद्गारले.

' पण मी म्हणतों, तुम्हीं तसं समर्थन कां करूं नये ? मी देखील तुमच्याच बाजूचा आहें. ' आल्बेर्तनें साथ केली.

' आणि भाऊ देखील आहेच ना तुमच्या बाजूचा ! आतां बहुमत तुमचंच झालं ना ? ' लीनेनें विचारलें.

' पण, लीनाताई, फिरंगी संस्कृतीचे दोष सांगाना आम्हांला. ' आल्बेर्त म्हणाला.

' हा विषय तुम्हांला करमणुकीचा वाटतो का ? ' लीनेनें प्रश्न केला.

' तसं नाहीं पण......' आल्बेर्तनें अडखळत उत्तर केलें.

' मग मी सांगतेंच. तुमच्यासारखे तरुण फिरंगी संस्कृति निर्माण करूं शकतात, हा तिचा दोष लहानसहान का आहे ? '

या उत्तरानें आल्बेर्त चमकला. पेरैरांचीहि मुद्रा पालटली. इतकें कडु उत्तर आपल्याला मिळेल ही आल्बेर्तची कल्पना नव्हती. तो कांहींसा वरमलाच. तो गप्प राहिला.

'आल्बेर्त, तूं वाईट वाटूं देऊं नकोस. स्वाभिमान नष्ट करणारी ही संस्कृति फार मोठी आहे, नाहीं का रे ?' लीनेनें पुढें म्हटलें.

'मग मी तुझा बाप स्वाभिमानी नाहीं का ? हा तुझा भाऊ कार्लुस, हा तुझा मित्र आल्बेर्त अन् तूं माझी लाडकी लीना, हीं सगळीं स्वाभिमानी नाहींत असें मी कसं म्हणूं ?'

'अन् ही आमची स्वैंपाकीण बेर्था स्वाभिमानी नाहीं ? आमची मोल-करीण देखील इतकी स्वाभिमानी आहे कीं घरच्या माणसानं तिला एखादं दुरुत्तर केलं तर लगेच ती भांड्यांची आदळआपट करायला सुरवात करते ! इतकं स्वाभिमानी वातावरण आहे आमच्या घरचं, समजलीस ?' कार्लुस संभाषणांत भाग घेत म्हणाला.

विषयाचें स्वरूप सुरवातीला गंभीर होतें, तें हळूहळू विनोदी होऊं लागलें. लीनेलाहि हेंच हवें होतें. कारण फिरंगी संस्कृतीचे दोष तिला हळुवारपणानें दाखवून द्यावयाचे होते. म्हणून तिनें म्हटलें, 'तुमच्या या थोर संस्कृतीनें निर्माण केलेला देखावा किती उदात्त आहे, पाहा. धर्म-तत्त्वांकडे दुर्लक्ष करून सगळे लोक कर्मकांडांत अडकून पडलेले आहेत. असहिष्णुता पुरेपूर अंगीं भिनलेली आहे; हिंदूंना माणसें म्हणायची देखील आमची तयारी नाहीं. युरोपच्या पश्चिम टोंकाला असलेला पोर्तु-गाल ही आमची मातृभूमि आहे, असं कंठशोष करून म्हणण्याइतका मूर्ख-पणा आम्हीं अंगीं आणलेला आहे. आम्हाला स्वातंत्र्य नको, स्वावलंबन नको, असें प्रतिपादन करणारें तत्त्वज्ञान आम्हीं आत्मसात् केलें आहे. मूठभर लोकां-च्या दिखाऊ तकलुपी सुधारणेचा 'उदो उदो' करतांना आपण असंख्य लोकांच्या जीवनार्थ कलहाचा विचार करीत नाहीं. गोमंतक सुखी आहे

असा आक्रोश करतांना समाजांतील हजारों दरिद्री कष्टांचें जिणें कंठीत आहेत, हें आपण मुद्दाम विसरून चालतों. आपली बुद्धि, आपलं मन, आपलं शरीर, आम्हीं फिरंगी संस्कृतीकडे गहाण टाकलेलं आहे. हा देखावा मोठा सुंदर आहे, नाहीं का ? '

लीना शांतपणानें बोलत होती; परंतु हळूहळू तिच्या स्वराला भावनेचा कंप येऊं लागला.

लीनेच्या शब्दाचा परिणाम पेरैरा व आल्बेर्त यांच्या मनावर झाल्याशिवाय राहिला नाहीं. तिची विचारसरणी दिवसेंदिवस आपल्यापासून दुरावत आहे; इतकेंच नव्हे तर ती उघडउघड आपल्या कर्तृत्वाला विरोधी होत आहे, हें पेरैरांना स्पष्ट दिसत होतें. ही त्यांची भीति हळूहळू वाढतच होती आणि म्हणूनच आल्बेर्तसारख्या कुलीन, सुस्वरूप व फिरंगी संस्कृतीनें भारलेल्या तरुणानें लीनेशीं निकट स्नेह घडवून आणावा आणि तिला मोहवश करून घेऊन तिच्या बुद्धीवर वर्चस्व चालवावें, असें त्यांचें कारस्थान होतें.

' आल्बेर्त, आमच्या लीनेची ही उसनी शिदोरी आहे. ती शिक्षणासाठीं मुंबईला होती ना ? तिथंच तिनं ही कमाई केली आहे. ' लीनेला खिजविण्याच्या हेतूनें पेरैरा म्हणाले.

' ही कमाई उसनी नाहीं. हें उपजत ज्ञान आहे. हा आपला स्वभावधर्म आहे. ' लीनेनें प्रत्येक शब्दावर जोर देऊन म्हटलें.

' होय ना ? मग हा स्वभावधर्म आमच्या समाजांतील हजारों माणसांत दिसून येत नाहीं याचा अर्थ काय ? ' लीनेला निरुत्तर करण्यासाठीं पेरैरांनीं युक्तिवाद केला.

' तुमच्या धर्मानंच तो मारून टाकला आहे. पोर्तुगीज लोकांनीं तुम्हांला ख्रिस्ती धर्म देऊन असं शिकवलं कीं आतां तुम्ही गोमंतकीय राहिलां नाहीं. आतां तुम्ही नी आम्ही एक. गोमंतक हा पोर्तुगालचा

अविभाज्य भाग आहे. ही शिकवण परधर्माबरोबरच आम्हीं इतकी आत्मसात् केली कीं आत्मनाशांत आम्हांला आत्महित दिसूं लागलं आहे. ' लीना त्वेषानें बोलत होती. तिच्या भावनांचा आवेश तिच्या मुद्रेवर उमटला होता आणि तिच्या हृदयाची तळमळ तिच्या स्वरांतील तीव्रतेतून व्यक्त होत होती.

पेरैरा आपल्या जागेवरून उठले आणि त्यांनीं [redacted] आवरण्याच्या हेतूनें म्हटलें, 'लीना, पोरी, तुझं मस्तक बिघडलं [redacted]ना आज ? '

'नाहीं. तुम्हां पुढाऱ्यांचेच मेंदू विकृत झाले [redacted]ोमंतकाच्या आजच्या स्थितीला तुम्हीच कारणीभूत आहांत. ' [redacted]कारवशतेनें उत्तर केलें.

'अशोक देशपांडेचं भूत आज तुझ्या अंगांत शिरल[redacted]ायत.' लीनेचा अवतार पाहून पेरैरा माघार घेण्याच्या उद्देशानें म्हण[redacted]

' असल्या थट्टेनं सत्य उडवून देतां येत नसतं, बाबा ! '

' पण तुझं सत्य किती हास्यास्पद आहे, याची तुला कल्पना नाहीं. '

' हास्यास्पद तुमच्या दृष्टीनं. आज हीं सत्यं तुम्हांला हास्यास्पद दिसतात; नव्हे, तुम्ही तसा भास निर्माण करतां. पण लवकरच तुम्हांला तीं भीषण दिसूं लागतील, अन् मग तुम्ही त्यांना विरोध करूं लागाल. '

संभाषण एवढ्या थराला आल्यावर पेरैरा थांबले. भावनेच्या आवेगांत दोघांहि तरुणांच्या समोर लीना आपला अपमान देखील करावयाची ही भीति त्यांच्या मनाला चाटून गेली आणि ते अस्वस्थ झाले.

लीनेला आतां ताळ्यावर कशी आणणार यासंबंधीं विचार करीतच ते तेथून निघून गेले.

# ८

लीनेला कितीतरी बोलून दाखवावयाचें होतें. पण पेरैरांनींच माघार घेतल्यामुळें तिचें उफाळून आलेलें मन तिला प्रयासानें दाबावें लागलें.

जेवण आटोपल्यानंतर ती खोलींत येऊन पलंगावर पडली. तिच्या वृत्तींना विलक्षण शीण आल्याचा तिला भास झाला. पपांच्या वर्तनाचा ती जसजसा विचार करूं लागली, तसतसें तिला असें दिसून आलें कीं, गोमंतकाच्या आजच्या दुःस्थितीला त्यांच्यासारख्या मनोवृत्तीचा जो फार मोठा प्रतिष्ठित वर्ग आपल्या समाजांत आहे, तोच प्रमुख्यानें कारणीभूत आहे. आपल्या स्वार्थासाठीं या बुद्धिमान् वर्गानें खिस्ती धर्म व पोर्तुगीज राष्ट्रीयत्व यांचें समीकरण तयार केलें आणि या देशद्रोही तत्त्वज्ञानावर आपला जीवनक्रम अधिष्ठित केला. त्यांनीं हिंदुधर्माचा व हिंदुसमाजाचा द्वेष केला आणि खिश्चन लोक हेच फिरंगी संस्कृतीचे व फिरंगी राष्ट्रीयत्वाचे एकमेव आधार व पुरस्कर्ते आहेत असा आक्रोश त्यांनीं पिढ्यान् पिढ्या चालविला. त्याचा परिणाम असा झाला कीं, त्यांना सरकार-दरबारांत मानमान्यता मिळाली. नोकरशाहीचें कुरण त्यांनाच मोकळें झालें. लष्कर, पोलीस, इत्यादि खात्यांत त्यांचाच भरणा झाला. अशा रीतीनें आपण आपल्या समाजाचें स्वतंत्र अस्तित्व मारीत आहोंत, ही जाणीव त्यांनीं कधींहि बाळगिली नाहीं. ज्या हिंदूंनीं धर्मरक्षणासाठीं फिरंगी राज-

वटींत अपरिमित जाचजुलूम सोसले व हुतात्म्याचें जीवन कांहीं शतकें व्यतीत केलें, ते हिंदु आपले शत्रू आहेत अशी विचारसरणी त्यांनींच प्रसृत केली. अशा ह्या कृत्यांमुळें हे लोक अस्तनींतील अंगार ठरले. अशा देशद्रोही व्यक्तींपैकीं आपले वडील प्रमुख आहेत ही जाणीव तिला अतिशय जाचक झाली आणि उघड्या डोळ्यांनीं त्यांचीं कृष्ण कृत्यें आपल्याला पाहावीं लागणार, या कल्पनेनें तिचा मनस्ताप वाढला. तिनें आपली विचारसरणी स्थानिक नियतकालिकांतून अद्याप जनतेपुढें मांडली नव्हती व तिच्या अनुरोधानें आपल्या कार्यालाहि प्रत्यक्ष सुरुवात केली नव्हती. पण आज ना उद्यां लवकरच आपलें निश्चित धोरण आपल्याला जाहीर करावें लागेल, त्या वेळीं पपांशीं आपली चकमक होईल आणि व्यक्ति व सार्वजनिक कार्यकर्ते ह्या दोन्ही भूमिका वेगवेगळ्या राखून वागणें त्यांना व आपल्यालाहि शक्य होणार नाहीं. वडील या नात्यानें ते प्रेमळ व सोशिक असतील; पण मुलीचें भावनात्मक खाजगी नातें सोडून आपण ज्या वेळीं त्यांच्या कर्तृत्वाला विरोध करूं, त्या वेळीं ते आपली गय करणार नाहींत ही गोष्ट तिला स्पष्ट दिसूं लागली.

आणि अशा दृष्टीनें ती विचार करूं लागली तेव्हां तिला आपल्या त्या वैभवाचा खरा अर्थ कळायला वेळ लागला नाहीं. सत्याचा व स्वातंत्र्याचा बळी देऊन तिच्या पूर्वजांनीं तें वैभव मिळविलें होतें. तिचे पणजे सेनापति होते. आणि तिचे आजे मेडिकल कॉलेजचे डीन होते. आणि तिचे वडील तर कौन्सिलर होते. या थोर पूर्वजांनीं जी संपत्ति कमावून ठेवली होती त्यांतच ती लोळत नव्हती का ?

या विचारांबरोबर लीनेच्या मनाची तळमळ अधिकच वाढली. कारण तिच्या पुढील प्रश्न आतां जास्तच गुंतागुंतीचा होऊं पाहात होता. तिच्या आयुष्यांत उत्पात घडवून आणण्याचें सामर्थ्य त्या प्रश्नांत होतें. केवळ बौद्धिक कलहापुरत्या त्याच्या मर्यादा आकुंचित राहाणार नव्हत्या. लवकरच

तिला वडिलांशीं, समाजाशीं, सरकारशीं, सगळ्या ढोंगांशीं, सगळ्या सोंगांशीं झगडणें प्राप्त होतें. त्या वेळीं तिला अशोकची आठवण झाली आणि जे शब्द तिनें त्याला मोठ्या जिव्हाळ्यानें सांगितले होते त्या शब्दांतील भेदक अर्थ तिच्या नजरेपुढें साकार होऊन नाचूं लागला. ‘ तुम्हांला यापुढें गोमंतकाचें दर्शन घ्यायला हवें. ’

या वाक्याची स्मृति होतांच तिला झटका बसल्यासारखा झाला. कारण या वाक्याचें सत्यसृष्टींत परिवर्तन व्हायला जें कष्टाचें जिणें कवटाळणें अवश्य होतें, तें तिच्या आतांपर्यंतच्या तात्त्विक व बौद्धिक भूमिकेपासून किती तरी दूर होतें. यापुढें तिऱ्हाइताची भूमिका उपयोगी नव्हती. आतां निरीक्षण व परीक्षण केल्याशिवाय गत्यंतर नव्हतें. रोगानें हैराण व बेशुद्ध होऊन पडलेल्या समाजाच्या बहिरंगाचा व अंतरंगाचा तिला ठाव घ्यायचा होता. फिरंगी सत्तेची काळी विषारी सावली ज्या ज्या ठिकाणीं पडलेली होती, त्या त्या ठिकाणचा आतां हळुवारपणानें अभ्यास करणें प्राप्त होतें. जनतेच्या दैन्याची दैनंदिनी राखणें अवश्य होतें. उन्मत्त वर्गाच्या अधिकाराची उपपत्ति निश्चित करणें अवश्य होतें.

ती उठली. तिचें मस्तक तप्त झालें होतें. तें शांत करण्यासाठीं तिनें गार पाण्याची धार त्याच्यावर धरली. खोलीच्या सगळ्या खिडक्या तिनें सटासट उघडल्या आणि प्रकाशाचे व वाऱ्याचे झोत आंत घेतले. सूर्य पश्चिमेकडे वळला होता. त्याचे किरण आतां सौम्य झाले होते. आकाशांत शेंकडों रंगांची उधळ चालली होती. त्याचें विराट् प्रतिबिंब समुद्र-सपाटीवर पडलें होतें आणि तें अवर्णनीय शोभेनें हेलावत व चकाकत होतें.

या दृश्याकडे नजर फेंकून लीनेनें मस्तकांतील विचार घालवून देण्याचा प्रयत्न केला व त्यांत तिला यश आलें.

थोड्या वेळानें ती समुद्रकिनाऱ्यावर फिरायला निघाली. तेव्हां तिचें मन कितीतरी हलकें झालें होतें.

ती एकटीच किनाऱ्यावर आली. नेहमीं तिच्या सोबतीला आल्बेर्त असावयाचा. त्याच्या सहवासांत तिचा वेळ मोठ्या मजेनें निघून जाई. त्याची गोड बडबड ऐकून ती अकारण उल्हसित होई.

पण आज त्याला आपल्याबरोबर बोलावण्याचें तिला भान राहिलें नाहीं. कारण आतां जीं मनोराज्यें ती करणार होती. त्यांत त्याला स्थान नव्हतें. तो तिला आवडत होता. त्याच्याशीं नृत्यवादनाच्या विषयावर बोलणें तिला प्रिय होतें. त्याच्या कुशल सफाईदार पदाघाताची साथ घेऊन नृत्य करण्यांत तिला मनस्वी आनंद होई. परंतु तिचें सबंध व्यक्तित्व आपल्याकडे खेंचून घेऊन तेथेंच तें स्थिर करण्याइतकें अलौकिकत्व आल्बेर्तच्या अंगीं तिला कधींच दिसून आलें नाहीं. आकाशांतील सुंदर तारका किती नयनमनोहर असतात ! पण उषेचें दर्शन घडलें म्हणजे आपल्या अंतरंगाचा फुलोरा होतो व देहभान हरपतें.

सूर्यबिंब आतां जलपृष्ठावर टेंकलें होतें. आणि त्याच्या सुवर्णकेसरी गोलांतून क्षणाक्षणाला रंगीबेरंगी दिव्य तेजाचा सडा क्षितिजावर पडत होता. वर्तुळाकार तीरावरील शुभ्र रेतींत जागोजाग शंख व शिंपले चकाकत होते. दोन्ही बाजूंना दोन टेंकड्या समुद्रांत दूरवर गेल्या होत्या. त्यांच्या काळ्या भीषण खडकांवर पाण्याच्या उन्मत्त लाटा वरपर्यंत चढून फुटत व त्यांच्या शुभ्र फेंसांत कांहीं वेळपर्यंत त्यांचीं कृष्णांगें आच्छादलीं जात. किनाऱ्याच्या आसपास पाण्यांत दबा धरून बसलेल्या खडकांवर मोठी लाट आदळली म्हणजे जो पाण्याचा फवारा वर उडे तो तर अवर्णनीय दिसे. लाखों सान शुभ्र फुलांची पाण्याच्या पोटांतून फुंकर घालून कुणीतरी वर आकाशांत ही उधळपट्टी केली आहे असेंच कुणालाहि वाटावें.

रांपणीचें जाळें घेऊन गेलेल्या दोन होड्या बऱ्याच अंतरावर वरखालीं होत होत्या. त्यांतील माणसांच्या काळ्या आकृती क्षितिजावर उठून

दिसत होत्या. आणि तीं रुंद व लांबच लांब जाळीं किनाऱ्यावरील रेतींत रांगेनें राहून ओढणाऱ्या शेंकडों कोळी लोकांची एकाच गतींतील व एकाच तालांतील ती जोरकस हालचाल लीनेला फारच मनोवेधक वाटली.

एका आवडत्या खडकावर बसून निसर्गाचा हा बदलणारा देखावा पाहाण्यांत लीना रंगून गेली. त्या जागेवरून बऱ्याच अंतरावर एका टेंकडी-वर असलेल्या तिच्या बंगल्यांतील माडीवरची तिची खोली स्पष्ट दिसत असे. तेथें तिची नजर आतां क्षणमात्र वळली.

तिला अशोकच्या सहवासाची अनावर ओढ लागली होती. तो आपल्या कामासाठीं अकस्मात् निघून गेला नसता तर त्याच्या सान्निध्यांत कांहीं घटका तिनें मोठ्या तादात्म्यानें घालविल्या असत्या आणि आपल्या हृदयांत जे नवे मनोरे घडत होते, त्यांचें अर्धस्फुट दर्शन तिनें त्याला करून दिलें असतें.

आपल्या मनांत विचारांचा व भावनांचा जो कल्लोळ वडिलांच्या भेटीनंतर उठला आहे, त्याचें शमन करायला अशोकाशिवाय कोणीहि समर्थ नाहीं. त्याच्या आधारानेंच आपण आतां पुढें पाऊल टाकूं शकूं, या आशेच्या किरणानें तिचें मन भरून गेलें. आणि अशोकशीं जें जें आपण बोलणार होतों, त्याची उजळणी मनांतल्या मनांत करून आपला दुःखभार हलका करण्याचा तिनें प्रयत्न केला.

सूर्य आतां पूर्ण मावळला होता. अंधाराच्या पोटचें भयाण रहस्य भित्र्या सृष्टीवर आतां हळूहळू पसरत होतें. कांहीं वेळापूर्वी भासमान होणारी वस्तुजातांतील विविधता अंधाराच्या विशाल सांवलींत विरून गेली होती. काळोखांत बुडत असलेल्या सृष्टीची प्रतिमा जणूं काय आभाळावर उमटून तें देखील भीषण दिसत होतें.

लीना आतां घराच्या दिशेनें चालूं लागली. किनाऱ्यावरील नारळी-च्या बागेंत ती शिरली असेल नसेल तोंच वाटेंत तिच्या नजरेला जो

प्रकार दिसला तो पाहून तिच्या अंगावर शहारे उभे राहिले.

वाटेच्या कडेला एक गरीब बाई बसली होती आणि तिच्या मांडीवर चारपांच वर्षांचें एक मरतुकडें पोर होतें. हें दृश्य पाहातांच लीनेला किळस आली व तसेंच पुढें जावें असें तिला वाटलें. पण त्या बाईचा केविलवाणा स्वर तिच्या कानावर पडला आणि नकळत ती तेथेंच थबकली. वैभवाच्या अनुभवामुळें आपलें मन किती दुबळें झालें आहे, याची तिला चांगली जाणीव झाली. दुसऱ्याचें दैन्य पाहून घेण्याची शक्तीदेखील आपल्यांत शिल्लक उरलेली नाहीं. मग तें दैन्य निवारण्याचे प्रयत्न करण्याइतकें धैर्य आपल्या अंगीं कोठून येणार, अशी शंका तिच्या मनांत येऊन गेली.

त्या बाईच्या आंगावर चिरगुटें होतीं, आणि ती अगदीं कृश व मलीन दिसत होती. दारिद्र्याच्या भारानें ती पूर्णपणें वांकली होती. तिच्या बाळाच्या दुर्दशेला तर पारावारच नव्हता. हाडाच्या सांपळ्यावर चामडी जणू काय लोंबत होती ! तोंड भयानक व विद्रूप झालें होतें. आसपास माणसें नसतीं तर लीनेनें त्याला पाहून किंकाळी फोडली असती.

त्या बाईनें कण्हत लीनेपुढें हात पसरला. लीनेचा सगळा जीव करुणेनें थरारला. क्षणमात्र ती हतबुद्ध झाली. वाटेवरच बसकण घ्यावी असें तिला वाटलें.

थोड्या वेळानें ती भानावर आली. तेव्हां तिनें त्या बाईची विचारपूस केली. त्या बाईनें म्हटलें, ' अन्न नाहीं... ' आणि तिनें हातानें तसा हावभाव करून दाखविला.

लीनेनें पोलक्याच्या खिशांतून रुप्याचें एक नाणें काढून तिच्या हातावर टाकीत म्हटलें, ' आतां माझ्यापाशीं अधिक नाहीं. '

" पैसे कशाला देतां ? ' बाईनें म्हटलें.

'मग ?' लीनेनें आश्चर्यानें विचारलें.

'पैसे दिले म्हणून अन्न कांहीं मिळत नाहीं.' थोडा वेळ थांबून तिनें पुढें म्हटलें, 'हें दारिद्य नाहीं. हा ईश्वरी क्षोभ आहे.' ती तळतळाटानें म्हणाली.

आपल्या दरिद्री समाजाचें हें एक प्रतीक आहे, असेंच लीनेला वाटलें. पण हें प्रतीक आपल्या सर्व प्रकारच्या दैन्याचें व पारतंत्र्याचें होतें हें तिला लवकरच कळून आलें.

तिच्या मस्तकांत प्रकाश पडला. तांदुळ नसल्यामुळें सगळया गरीब जनतेंत जो हाहाःकार उडाला आहे असें ती ऐकत होती, त्याचेंच तें प्रत्यंतर होतें.

ती बाई बोलूं लागली, 'आज दीड महिना झाला; तांदळाची पेज प्यायला मिळाली नाहीं. जोंधळा खाल्ला त्याचा हा परिणाम आहे. यांतून पोर कांहीं वांचत नाहीं.' आणि दोन्ही हातांनीं तिनें आपलें तोंड झांकून घेतलें व ती रडूं लागली.

लीना हळवी नव्हती; तरीहि तिच्या डोळयांत अश्रू उभे राहिले. तिच्या तोंडांतून उद्गार निघाले, 'या मुलासाठीं पेज नाहीं मिळत ?'

'नाहीं. लोक तरी काय करणार ? लोक बाजरी खाऊन राहातात. भीक मागितली तरी नशिबीं बाजरीच येते. पोराला हगवण लागलेली आहे. तुमच्याकडे किती खेपा गेलें पण मूठभर तांदुळ कांहीं मिळाले नाहींत.'

'चल, माझ्याबरोबर ये." लीनेनें म्हटलें व तिनें पाऊल पुढें टाकलें.

अंधार पडत होता. तरीहि त्याची पर्वा न करतां ती बाई पोराला पोटाशीं धरून उठली आणि लीनेच्या मागोमाग चालूं लागली.

लीनेचें विचारचक्र जोरानें चालू झालें. आज आपण या भिकारणीला थोडे तांदुळ दिले म्हणून हा प्रश्न सुटेल का ? हजारों बायकामुलें आज जागोजाग हिच्याप्रमाणेंच विव्हळत असतील, त्यांची गत काय? त्यांचा

कैवार कुणीं घ्यावा? आपल्या घरांत दोन वर्षें पुरेल इतका भरपूर दाणा-गोटा वडिलांनीं सांठवून ठेवलेला आहे. इतर जमीनदारांनीं हेंच केलें असेल, यांत शंका नाहीं. आपण शांतपणानें तांदळाचा भात जेवतों आणि काबाड-कष्ट करणारे हे लोक अन्नाला मोताद होऊन कुत्र्यावाणी मरून जातात.

याप्रमाणें विचार करीत लीना घरीं आली. सैंपाकिणीला सांगून तिनें त्या मायलेकाला पोटभर भात जेवूं घातला. नंतर शेरभर तांदूळ तिच्या ओटींत टाकले. पण तेवढ्यानें तिच्या मनाचें समाधान झालें नाहीं. म्हणून तिनें म्हटलें, ' अधूनमधून इथं येत जा. मी तुला जेवण द्यायला सांगेन. '

ती बाई त्या अंधारांतच लीनेचे आभार मानून निघून गेली. अन्नाच्या तुटवड्याच्या बाबतींत लीनेनें अधिक चौकशी केली. तेव्हां तिला असें कळून आलें कीं या दारुण परिस्थितीला सरकारच कारण आहे. युद्धजन्य परिस्थितीमुळें तांदळांची टंचाई पडणार ही भीति सगळ्यांनाच होती. असें असतां सरकारनें आगाऊ कोणतीच तरतूद करून ठेवली नाहीं. इतकेंच नव्हे तर कांहीं बडे व्यापारी मोठ्या प्रमाणांत तांदळाचा पुरवठा करायला तयार होते. त्यांनाहि सरकारनें परवाने दिले नाहींत. याचा परिणाम असा झाला कीं दोन महिन्यांपूर्वीं ब्रिटिश सरकारनें तांदळाच्या निर्यातीला बंदी केली. आणि या अन्नावरच निर्वाह करण्याची संवय झालेल्या जनते-वर उपाशी मरण्याची पाळी आली.

ज्यांना भाताचें उत्पन्न होतें अशा जमीनदारांच्या पोटाचा प्रश्न सुटला होता. पण बहुजनसमाज अन्नाविना तळमळत होता. तरीहि सरकार उदासीन होतें. कारण लोकांच्या निर्वाहाची तरतूद करण्याची कामगिरी आपली आहे, ही त्याला जाणीव नव्हती. तरी देखील तिचे वडील सरकारी धोरणाचें प्रत्येक बाबतींत समर्थन करीत होते. समाजाची दु:स्थिति उघडकीला येण्याचा मार्गच नव्हता; कारण सगळ्या स्वतंत्र लेखनावरून सेन्सॉरचा वरवंटा सारखा फिरत होता.

रात्रींच्या वेळीं त्रस्त मनःस्थितींत पलंगावर पडतांना लीनेनें निश्चय केला कीं लवकरच अशोकची गांठ घ्यायची आणि लोकांच्या या दैन्याची त्यांना जाणीव नसली तर आपण त्यांना ती करून द्यायची.

१

आपल्या शाळेचें काम आटोपून लीना संध्याकाळीं मोटरनें अशोककडे आली. तिला पहातांच अशोकला आश्चर्य वाटलें व आनंद झाला. ती आपल्याकडे यावी असें त्याला वाटत होतें. पण ती येईल असें मात्र त्याला वाटलें नव्हतें.

आपल्या नेहमींच्या मित्रमंडळींत तो आतां बसला होता. पांचसहा मांजरें, दोन कुत्रीं, त्याची बहीण आणि मांजरीचीं तीन पिलें, ही त्याची आतांची बैठक होती.

लीना खुर्चीवर बसली. आणि माणसांजनावरांचें हें स्नेहसम्मेलन मोठ्या कौतुकानें पाहूं लागली.

हिराच्या मांडीवर तीन पिलें पहुडलीं होतीं. तीं फार हुशार दिसत होतीं. अशोकच्या मांडीवर दोन मांजरी बसल्या होत्या. त्याच्या मांडीला टेंकून एक काळा बोका बसला होता. जवळच दोन कुत्रीं होतीं. त्यांच्या पाठीला पाठ लावून आणखी दोन मांजरें बसलीं होतीं.

'हा नाद केव्हांपासून लागला?' लीनेनें विचारलें. तिच्या घरीं मांजरें होतीं. पण त्यांचें अस्तित्वदेखील तिला कधीं जाणवलें नव्हतें. तसल्याच या प्राण्यांना अशोकच्या आयुष्यांत एवढें स्थान आहे हें पाहून तिच्या मनांत वेगळेंच कुतूहल निर्माण झालें.

अशोकनें हंसतमुखानें म्हटलें, ‘ आमच्या हिरेला लहानपणीं हा नाद होता. इतका कीं मांजरीच्या पिलाचाच तिनें जणूं काय ध्यास घेतला होता. जेवतांना देखील ही सोबत असायचीच. आपल्या या पोरांचा बाप कोण हा तिला प्रश्न पडला. शेजारच्या घरांत एक बोका होता. त्याला त्यांचा बाप समजून तिनें घरीं आणलें आणि मांजरांच्या खोलींत त्याची रवानगी केली. सकाळ झाली तेव्हां पिलांचा मागमूस लागेना. हिरा घरभर शोधून दमली. शेवटीं, खोलींतून बोकोबा बाहेर पडतांना घरच्या माणसांनीं पाहिलें. अन् आम्हांला कळून आलें कीं त्या तिन्ही पिलांना त्यानें आपल्या पोटांत स्थान दिलें आहे. आठवतें का तुला हें, हिरा ? ’

हिरेनें मान हलविली व ती लाजली.

‘ तुम्ही इथें रमूं शकतां ? ’ लीनेनें प्रश्न केला.

‘ यांच्या सहवासांत वेळ घालवायला मला मिळत नाहीं म्हणून मला वाईट वाटतें. ’ त्यानें उत्तर केलें. आणि एका मांजरीला पटकन उचलून तिच्या कानांत कांहींतरी पुटपुटल्यासारखें केलें. त्याबरोबर ती हळूच उठून बाहेर गेली.

अशोक म्हणाला, ‘ माणसांप्रमाणेंच या प्रत्येक जनावराला एक स्वतंत्र मन असतें, लीनाबाई ! जगांत मानवजातीचा एवढा उदो उदो करण्यांत येतो तें योग्य नाहीं. निदान या मानवजातींत या ‘मोन जातीं’-चा अवश्य समावेश केला पाहिजे.’

लीना उत्सुकतेनें ऐकत होती. आणि त्याच्या क्षुल्लक हालचालींकडे व त्याच्या चेहऱ्याकडे पहात होती. हें निरीक्षण चालू असतांना तिला असें दिसून आलें कीं अशोकच्या चेहऱ्यावर या वेळीं बालिश भाव खेळत आहेत. व्याख्यानाच्या वेळीं गंभीर दिसणारी त्याची मुद्रा आतां मोठी गोड, प्रेमळ व निरागस बनलेली आहे. त्याच्या नेत्रांतील चमक त्याच्या

बुद्धिमत्तेचीच निदर्शक राहिलेली नाहीं. तींत त्याच्या व्यापक सहानुभूतीचें केंद्रीकरण झालें आहे.

चहा आला. लीनेला वाटलें, मांजरीनेंच आंत जाऊन चहाची वर्दी दिली आहे. ज्या जळजळीत विचारांच्या आंचीनें ती अशोककडे आली होती, त्या विचारांचें तिला क्षणमात्र विस्मरण पडलें.

'आम्हाला माणसांबरोबर नृत्यवादन करतां येत नाहीं. यांच्याबरोबर मात्र मी नाचूं शकेन. नाहीं का रे, हुसेन ?' त्यानें एका बोक्याच्या कानावर टिचकी मारून हंसत म्हटलें.

'अशोक, त्या दिवशीं तुम्ही अकस्मात् निघून आलां. आणि मग मला किती वाईट वाटलं !'

'अन्, मी तरी खुशीनें कुठं आलों ?' अशोकनें लीनेकडे आनंदी नजरेनें पहात म्हटलें.

'आज तुमच्याशीं खूरखूप बोलायचं आहे मला.' तिनें हंसत हंसत जिवणीची गोड चाळवाचाळव करीत म्हटलें.

'मग आज माझं भाग्य उदयाला आलं म्हणायचं.' अशोक तिच्या पोषाकाचें व त्यांतून उठून दिसणाऱ्या तिच्या अवयवांचें निरीक्षण करीत म्हणाला.

'कांहीं तरीच.' तिनें म्हटलें आणि ती लाजली. तिच्या मुद्रेवर या वेळीं गोड भावनेच्या छटा चमकून गेल्या.

'त्या दिवशीं तुम्ही असंच म्हणत होतां. पण कांहींच बोललां नाहीं.' अशोक कांहींशा रोषपूर्ण स्वरांत म्हणाला.

त्याच्या शब्दांतील खोंच तिच्या लक्ष्यांत आली आणि स्वतःला सांवरून घेण्याच्या इराद्यानें तिनें म्हटलें :

'त्या दिवशीं चुकलें मी, अशोक. तुमची करमणूक व्हावी म्हणून मीं नृत्यवादन केलं. संध्याकाळीं तुम्हांला समुद्रकिनाऱ्यावरून येऊन

तुमच्याशीं एकांतांत खूपखूप बोलावं असा माझा बेत होता, तो फसला. तुम्ही निघून आलांत. अन् म्हणूनच आज मुद्दाम बोलण्यासाठींच मी इथं आलें आहें." लीना उत्तरली.

लीनेनें या वेळीं गुलाबी रंगाची सोनेरी किनार असलेली साडी परिधान केली होती. तिच्या छटा तिच्या गौरांगाला फारच खुलून दिसत होत्या. तिच्या नेत्रकटाक्षांनीं आज निराळीच प्रभा धारण केली होती. तिच्या चेहऱ्याच्या रसरशीत कांतीनें तें वातावरण उजळून निघत आहे, तिच्या दंत मौक्तिकांचें तेज तिच्या मुद्रेला हास्याचा उजळा देत आहे, इतकेंच नव्हे तर तिच्या सान्निध्यांत येणाऱ्या कोणत्याहि माणसाला खुलवीत आहे, असें अशोकला वाटलें व मंत्रमुग्धाप्रमाणें तो तिच्याकडे बघत राहिला. आपली ही मनःस्थिति लीनेच्या लक्ष्यांत येत आहे असें कळतांच त्यानें चटकन उत्तर केलें :

' मग केव्हां बोलूं तें आधींच ठरवून टाकूं. नाहींतर इतर गोष्टींत वेळ जायचा अन् बोलण तिथंच रहायचं. '

' थोड्या वेळानें आपण फिरायला जाऊं. ' ती म्हणाली.

' मग आमच्याकडे रहतां का आज ? ' त्यानें अधीर होऊन विचारलें.

' तें मी मग सांगेन. ' लीनेनें संदिग्ध भाषेंत उत्तर केलें.

' मग रहाच तुम्ही आज आमच्याकडे. आपण फिरून येईपर्यंत अंधार पडेल. मग तुम्हांला मोटार मिळणार नाहीं. '

' माझी एक मैत्रीण आहे या गांवांत. तिच्याकडे मी उतरणार आहें. मी तिला तशी सूचनाहि करून आलें आहे.'

लीनेचें उत्तर ऐकून अशोकच्या आनंदावर विरजण पडल्यासारखें झालें. तो म्हणाला, 'जशी' तुमची मर्जी. पण त्याला मात्र मनांतून असेंच वाटत होतें कीं लीना आजची रात्र आपल्याकडेच राहाणार. तिच्या मुद्रेवरचा निर्धारच त्याला जणूं काय असें सांगत होता.

तो बैठकीवरून उठला. त्याबरोबर त्या चिमुकल्या जनावरांचीहि यांगापांग झाली. त्यानें पोषाक केला आणि निघण्याच्या तयारीनें त्यानें लीनेला म्हटलें, 'मग चलतांना फिरायला ?'

त्याच्या मागोमाग जातांना लीनेच्या मनांत असा प्रश्न उद्भवला कीं आपण खूपखूप बोलणार म्हणजे काय बोलणार ? वडिलांशीं झालेल्या वादासंबंधीं अशोकला सांगणार ? भिकारड्या बाईचें जें हृदयद्रावक दृश्य आपण काल पाहिलें त्याचें वर्णन अशोकपाशीं करणार ? नाहीं. यापेक्षां कांहीं तरी अधिक त्यांना आपल्याला सांगावयाचें आहे व त्यांचें ऐकून घ्यावयाचें आहे. त्यांच्या जीवनाचा अर्थ आपल्याला समजून घ्यावयाचा आहे. अन् आपलें जीवन त्यांच्याशीं व्यक्त करावयाचें आहे.

लीनेकरतां जेवणाचे सुंदर पदार्थ तयार करायला काकीला सांगून अशोक बाहेर आला. हिरेला त्यानें आज बरोबर घेतलें नाहीं. लीना आल्यामुळें आपल्याला भाऊ फिरायला नेणार नाहीं. ही शंका तिच्या मनांत येऊन ती हिरमुसली झाली. तिचा खिन्न चेहरा पाहून अशोकनें तिची समजूत घातली व लीनेला बरोबर घेऊन तो घराबाहेर पडला.

तीं नदीतीरावर पोंचलीं. तेव्हां सूर्य क्षितिजाच्यावर दोन हात होता. नदीचें पात्र वळणावळणानें वाहत होतें. त्यामुळें पुढचीं अज्ञात दृश्यें पाहण्याची तीव्र जिज्ञासा नवख्या प्रेक्षकाला लागून राहत होती.

नदीच्या दोन्ही तीरांवर पोफळींचीं कुळागरें व नारळीच्या बागा वसल्या होत्या. आणि त्यांच्यामध्यें कुळवाडी लोकांचीं लहानलहान घरें दिसत होतीं. नदीच्या पात्राच्या रुंदीएवढीच क्षितिजाची पट्टी दृष्टीच्या आटोक्यांत येई.

अशोकनें तडीला असलेल्या होड्यांपैकीं एक चिमुकली छानदार होडी पसंत केली आणि वल्ह्याचा दांडा हातांत घेऊन त्यानें लीनेला मधल्या फळीवर बसविलें. नावेंत शिरतांना तिचा उजवा दंड त्यानें पकडला; त्या वेळीं

त्या स्पर्शानें त्याच्या मनांत असीम आनंदाचे अनंत तरंग उमटले आणि पुढच्या नौकाविहाराच्या कल्पनेनें त्याचा उल्हास द्विगुणित झाला.

नावेच्या सुकाणूवर तो बसला आणि त्यानें हातांतील वल्हें हलविलें. पाण्याचा सळसळाट झाला आणि नाव डुलत तरंगत एकाद्या नागिणी-प्रमाणें त्या प्रशांत जलपृष्ठावरून धांवूं लागली.

लीनेच्या चित्तवृत्ती उल्हसित झाल्या. तिची काव्यात्म वृत्ति जागृत झाली. नृत्यवादनाशीं समरस होणारी लीना निसर्गाच्या या गोड सहवासांत तत्काळ रमली.

अशोकचें लक्ष तिच्याकडे लागलें. ती त्याला या वेळीं किती आकर्षक वाटली ! तिची गुलाबी साडी, तिच्या चेहऱ्यावरची गुलाबी झांक, तिच्या टपोऱ्या डोळ्यांतील गोडवेपणा व हास्याची छटा, तिच्या बारीक, नाजूक ओंठांची खुमासदार व रुचिक ठेवण, जिव्हणीचा उजवा कोंपरा किंचित् वर सरकवितांना चेहऱ्यावर जीं हास्याचीं वर्तुळें उठत त्यांची नाजुक क्रीडा आणि तिच्या तीव्र, भेदक व्यक्तित्वाचें, तिच्या एकंदर अवयवांच्या मिलाफां-तून होणारें सुरुचिर दर्शन, हें सगळें लक्ष्यांत आल्यानंतर त्याला कितीतरी समाधान वाटलें आणि आपण किती भाग्यवान आहोंत अशी गोड कल्पना त्याच्या मनांत उद्भवली.

'मग त्या दिवशीं तुमचं नृत्य केव्हां संपलं ?' अशोकनें प्रश्न केला.

'माझं वागणं तुम्हांला विचित्र वाटलं असेल, नाहीं का ?'

'मुळींच नाहीं. मला नृत्यवादन करतां येत नसलं तरी त्याचं महत्त्व मला कळतं. तुमच्यासारख्या सुविद्य तरुणीनें नृत्यांत भाग घेतला तर तें साहजिकच नाहीं का ? मी देखील तुमच्यासारखाच कलावान आहे.'

'तुमच्या कलेचा आस्वाद घेण्यासाठीं म्हणून मी मराठी शिकलें, तुमच्या कथांचा मीं अभ्यास केला आहे, अशोक !' त्याच्याकडे कौतुकाच्या नजरेनें पहात लीना म्हणाली.

अशोकचा आनंद गगनांत मावेना. तो म्हणाला, 'माझ्या हातांत वल्हं नसतं तर मीं स्वताची पाठ थोपटली असती.'

'मी आहे ना थोपटायला ? चालेल ना मीं थोपटली तर' आणि इतकें म्हणून लीनेनें उठण्याचा फार्स देखील केला.

'कृपा करा, तेवढें मात्र करूं नका.' त्यानें चेहऱ्यावर भीतीचा आविर्भाव दाखवीत म्हटलें.

'तुम्हांला पोहतां येतें ना ? मग कां भितां ? '

'पण तुमची गत काय ? ' अशोकनें प्रश्न केला.

'तुम्ही मला वांचवूं शकतां. वांचवणारा जवळ असला तर बुडण्याचा अनुभव घेण्यांत मजा नाहीं का ? '

'तुम्ही आतां काव्य करूं लागलां, लीनाबाई. माझी तुमच्याबद्दल अशी कल्पना नव्हती. '

'तुमच्या बाबतींत देखील माझं असंच घडलं आहे.' लीनेनें म्हटलें.

'माझ्याबद्दल तुम्ही जी कल्पना केली होती, ती बदलण्यासारखं काय घडलं तें तर सांगाना.' अशोकनें तिला विनंती केली.

'तुमचीं मांजरं.' लीनेनें सांगितलें.

'अस्सं ? ' आणि तो मोकळेपणानें हंसला. त्याच्या निर्भर हास्याच्या त्या लाटा त्या शांत वातावरणांतील तीरावरच्या झाडींत प्रतिबिंबित झाल्या.

' केवढ्या मोठ्यानं हंसलांत तुम्ही ?' तिनें विचारलें.

' कुणाला भितां तुम्ही ? '

"काल वडिलांपाशीं मी खूप भांडलें. मग आणखी भीति कुणाची ?'

'पेरैरांशीं भांडलां ?' अशोकनें आश्चर्य व्यक्त करून विचारलें.

' हो. माझ्या मतांसाठीं भांडलें. '

' मतांसाठीं वडिलांशीं भांडण्याइतकें धैर्य आहे का तुमच्यापाशीं ? '

'तुम्हांला काय वाटतं कीं मी दुबळी आहे ? '

'तसं नाहीं, लीनाबाई. वैभवांत तुम्ही वाढलांत. वडिलांचा मान तुम्हांला राखलाच पाहिजे.'

'वैभवाची मला पवा नाहीं, अशोक. माझीं मतं वैभवापेक्षां मला अधिक प्रिय आहेत' ती त्वेषानें म्हणाली.

'मग तुमची आमची मैत्री व्हायला कांहीं हरकत नाहीं.' अशोकनें म्हटलें. त्याच्या स्वरांत या वेळीं विलक्षण मार्दव शिरलें.

दोघांनींहि एकमेकांकडे पाहिलें. दोघांच्याहि मुद्रेवर व नजरेंत एकच भाव चमकून गेला.

चंद्राची कोर आकाशांत तरळूं लागली. वल्ह्याच्या आघातानें पाण्यांत हिऱ्यामाणकांची उधळ निर्माण होत होती आणि जवाहिरांचा हा खच तुडवीत नाव पुढें धांवत होती. तीरावरच्या झाडांच्या राया आतां क्षितिजावर छानदारपणानें उठून दिसत होत्या. माडांच्या कवाळ्यांत बसून सूर काढीत असलेल्या ख्रिश्चन भंडाऱ्यांचीं कोंकणी प्रेमगीतें वातावरणांत घुमत होतीं. आणि त्यांच्यांतून व्यक्त होणारी आर्त प्रेमभावना त्या काव्यमय पार्श्वभूमीवर खुलून दिसत होती आणि प्रणयी जोडप्यांच्या हृदयांत स्वप्नांचें जग निर्माण करीत होती.

कोंकणी गाणें माडावरील भंडारी आळवूं लागला:

खुशालेचा दिस आज वोतोंता आमचो
जिंकला देखून आयच्यान मोग एकामेकाचो
एकवोट जालोच या दोनुय काळजांचो
कोणाच्यानुय सेपारार कोर नोजो

तीरावरच्या वनस्पतींचा उन्मादक सुवास आसपास दरवळूं लागला. वल्ह्याचा डबक–डुबुक असा आवाज त्या शांततेंत आतां किती तरी मोठा दिसूं लागला. व्याधाची चांदणी अवर्णनीय शोभेनें आकाशांत चमकूं लागली.

लीनेच्या हृदयांत चांदणें फुललें. तिच्या भावनांना माधुर्याचा बहर आला.

‘ अशोक, परस्परांचा आश्रय घेतल्याशिवाय आपल्याला कांहींच करता येणार नाहीं. जगाशीं झगडायचं आहे आपल्याला. ’

‘लीना, दुबळ्या गोमंतकाची मुलगी असून वीराप्रमाणें तुम्ही बोलतां. तूं आमची Jean D'Aro आहेस. ’

लीना लाजली. तिनें चटकन मान खालीं घातली. अशोकच्या उद्गारांत तिला अनुलक्षून जें एकेरी संबोधन पहिल्यांदाच आलें होतें, तें ऐकून तिच्या मनाला गुदगुल्या झाल्या. इतकी धीट, इतकी सुशिक्षित, इतकी बुद्धि-प्रधान लीना. पण ती आतां लाजली. तिच्यांतली स्त्रीच विजयी ठरली.

अशोकला एक विलक्षण मोह पडला. तो नावेंत नसता तर त्यानें आपली इच्छा कदाचित् पुरी केली असती. पण त्या नावेंत चुंबन घेऊन त्याला जीवन गमावणें नको होतें.

‘या वेळीं इथं पोहणं मजेदार असेल नाहीं का ?’ लीनेनें म्हटलें.

‘तुला तर पोहायला येत नाहीं. मग ...?’

‘पोहण्याच्या कलेंत मी तरबेज आहे, अशोक. इथून धक्क्यापर्यंत मी लीलेनें जाऊं शकेन. पोहण्याचं मला वेडच आहे म्हणाना.’

‘अस्सं ? मग पुढच्या खेपेला आपण इथं पोहायला येऊं.’

‘अवश्य.’ ती म्हणाली.

नाव आतां तीराला लागली. दोघेंहि जमिनीवर उतरलीं.

घरीं पोंचेपर्यंत तीं स्तब्ध होतीं. एकादा शब्द त्यांच्या तोंडांतून निघालां असेल तेवढाच. आपल्याच तंद्रींत तीं गुंग होतीं.

# १०

ज्या नौकाविहाराकडे अशोक एवढ्या आशेनें पहात होता तो पार पडला होता. लीना त्याच्याशीं फारच खेळीमेळीनें वागली होती. त्यानें देखील आपली प्रेमभावना व्यक्त करण्याचा प्रयत्न केला होता. परंतु तेवढ्यानें त्याच्या प्रबल मनोवृत्तींचें समाधान झालें नव्हतें. आपण ऐन वेळीं माघार कां घेतली तें त्याचें त्यालाच कळेना. तिचे दोन्ही दंड पकडून तिच्या मुखाचें आपण उत्कट चुंबन घ्यावें अशी ओढ नौकाविहाराच्या वेळीं त्याला लागली होती. परंतु नकळतच त्याच्या चेतलेल्या वृत्ती अकस्मात् दबल्या होत्या. प्रेमाच्या ज्या स्वप्नमय मानसिक अवस्थेत आपण दोघें आहोंत तेथून खालीं उतरण्याजोगी कोणतीच कृति आपल्या हातून घडली तर लीनेच्या सुसंस्कृत वृत्तीला तें कदाचित् रुचणार नाहीं, अशी शंका त्याच्या मनांत येऊन गेली होती. जणुं काय लीना ही एक देवता आहे. तिचें पूजन आपण केलें पाहिजे. पण आपल्या पंचप्राणांचें समाधान करण्यासाठीं आपण तिला आलिंगन दिलें तर तिचें सौंदर्य भ्रष्ट होईल. तिच्या देहाचें लावण्य विरून जाईल.

अशा विचारांच्या गोंधळांत त्याचें मन सांपडलें !

जेवण आटोपल्यानंतर लीना व अशोक बाहेर व्हरांड्यांत येऊन बसलीं. चांदणें आतां अधिकच शुभ्र पडलें होतें. समोरच्या ओढ्यांतला जलप्रवाह

त्या प्रकाशांत चमचमत होता. पलिकडच्या बांधावरील माडांची रांग स्तब्ध उभी होती. आणि त्यापुढच्या झाडींत लपलेल्या घरांत दिवे लुकलुकत होते. मधूनच एकाद्या कुत्र्याचें भुंकणें कानावर येई किंवा घराच्या ओसरीवर एकादा म्हातारा पोथी वाचीत होता, त्याचे अस्पष्ट हेल ऐकूं येत. रातराणीच्या मादक सुगंधानें वातावरण भरून गेलें होतें.

आतांपर्यंत दोघेंहि स्तब्ध होतीं. त्या स्तब्धतेचें कारण आत्मतृप्ति हें होतें कीं अतृप्ति हें होतें, याचा विचार दोघेंहि आपापल्यापरीनें करीत होतीं. कांहीं वेळानें अशोक म्हणाला, 'लीना, तुला खूपखूप बोलायचं होतं ना? अजून तर तूं कांहींच बोलली नाहींस ?'

'मघाशीं नावेंत आपण कितीतरी बोललों.' लीना म्हणाली.

'तें खूपखूप होतें का ?' खूपखूप या शब्दावर जोर देत अशोक म्हणाला.

लीनेला त्या सगळ्या संवादाची आठवण झाली आणि ज्या नाजूक प्रश्नासंबंधीं कळत नकळत आपण अशोकशीं बोलून गेलों, त्यामुळें आपलें हृदय कितीतरी हलकें झालें आहे असें तिला वाटलें. पण आपल्या हृदयाची कांहीं तृप्ति झाली नाहीं ही रुखरुख तिच्या मनाला लागून राहिली.

'अशोक, जीवनाचे कांहीं प्रश्न एकमेकांत इतके गुंतलेले असतात कीं त्यांपैकीं आपल्या जिव्हाळ्याचे कोणते तें ठरवतांच येत नाहीं.'

'ज्या प्रश्नाची आपल्याला तळमळ लागलेली असते, ते सगळेच प्रश्न आपल्या जिव्हाळ्याचे नाहींत का ? मग तें सार्वजनिक स्वरूपाचे असोत किंवा व्यक्तिगत असोत. आणि म्हणूनच भावनांचे नाजूक प्रश्न देखील व्यक्तिविकासाच्या दृष्टीनें अतिशय महत्त्वाचे असतात.' अशोक म्हणाला.

'ही भाषा तात्त्विक झाली, अशोक.'

'मग तुला कोणती भाषा हवी ?' लीनेनें मान खालीं घातली.

दिव्याचा प्रकाश नसल्यामुळें तिच्या चेहऱ्यावरील नाजूक भाव अशोकला दिसले नाहींत.

नावेंत तिनें काढलेले उद्गार आणि आतांची तिची सूचक भाषा यांचा मेळ घातला तर तिच्या भावना स्पष्ट होतात असें अशोकला वाटलें. परंतु तिच्या त्या अभिप्रायावर विसंबून आपल्याला कांहींच करतां येत नाहीं, हा विचार त्याला दुःसह झाला.

अव्यक्त प्रेमाच्या या स्थितींत त्याचें मन घोटाळत होतें. या अस्पष्टतेंतच दोघांनाहि समाधान वाटलें होतें व रुखरुख वाढत होती. स्पष्ट केलें तर नष्ट होईल अशी भीति जणूं काय त्यांना मागें ओढीत होती. निराकार आहे तें साकार, शब्दरूप केलें तर त्यांतील काव्य जाईल, अलौकिकत्व जाईल, त्याला पार्थिवतेची अवकळा प्राप्त होईल, असेंच जणूं काय प्रत्येकाला वाटत होतें. मनाचा अवकाश या प्रेमाच्या कल्पनेनें भरून टाकावा आणि या धुंदींत एकएक दिवस व्यतीत करावा असेंच प्रेमिकांना वाटत असेल काय ? रातराणीचा सुगंध बाहेरच दरवळत होता असें नव्हे. त्याहिपेक्षां तरल व मादक सुगंध त्या दोघांच्या मनोआकाशांत भरून राहिला होता.

या स्थितींत कितीतरी वेळ निघून गेला. या स्तब्धतेचा भंग करण्यासाठीं अशोकनें म्हटलें, ‘ एवढा कसला विचार करतेस, लीना ? ’

‘ माझ्या भवितव्याचा. ’ लीनेनें सुस्कारा टाकीत म्हटलें.

‘ भवितव्याचा विचार करून काय व्हायचं आहे ? ’

‘ तुम्ही म्हणतां तसंहि असेल. पण विचार करणं आपल्याला चुकत नाहीं. ’

‘ पण इतक्या गंभीरपणानं विचार करण्यासारखं काय घडलं आहे तुझ्या आयुष्यांत ? ’

‘ अशोक, आज ना उद्यां मला वडिलांशीं उघड उघड झगडावं लागणार आहे.’ तिनें निश्चयी स्वरांत सांगितलें.

‘ आयुष्य हा एक झगडाच आहे. ’

‘ हें तत्त्वज्ञान ठीक आहे. पण वडिलांशीं भांडून प्रसंगीं घराचा त्याग करणं किती कठीण आहे, याची तुम्हांला कल्पना नसेल ? ’ लीना म्हणाली.

‘ पण तुझी तयारी तर केवढी मोठी होती. मग आतां खचलीस कीं.’ अशोकनें थट्टेच्या स्वरांत विचारलें.

‘ अशोक, ध्येयाच्या अभिनिवेशांत बोलणं सोपं असतं. पण कुणाच्या आधारावर मी एवढ्या दिव्याला तयार होऊं, याचा विचार मी करूं लागतें तेव्हां मला कांहींच सुचत नाहीं ! ’

‘ तुझ्यासारख्या सुस्वरूप, सुशिक्षित तरुणीला मित्रांचा तुटवडा पडूं नये, अशी माझी कल्पना आहे. ’ अशोक म्हणाला.

‘ तुम्ही मित्र कुणाला म्हणतां ? ’

‘आल्बेर्त तुझा मित्र नाहीं का ? असे आणखीहि मित्र तुला असतील. ’

या उद्गारांतील खोंच लीनेला लगेच जाणवली. अशोकनें आपल्या-संबंधीं अशी कल्पना करावी हें तिला रुचलें नाहीं.

आपलें मन, बुद्धि व भावना यांच्याशीं समरस होऊन आपल्या त्यागानें उल्हसित होणारे मित्र विरळाच नाहींत का ? ’ लीनेच्या या प्रश्नाची आर्तता अशोकच्या हृदयाला भिडल्याशिवाय राहिली नाहीं.

त्यानें मोठ्या उत्साहानें म्हटलें, ‘ असला मित्र तुला लाभला तर त्याच्यासाठीं तूं काय त्याग करशील ? ’

‘ माझं वैभव त्याला पाहिजे का , अशोक ? तें माझ्या हातीं कुठं आहे ? ’ तिच्या प्रश्नांत असहायतेचा स्वर उमटला.

‘ पण दुसरं वैभव... ’ अशोकनें शांत आवाजांत म्हटलें.

ती भावनाविवश झाली. खुर्चीवरून ती एकदम उठली आणि दोन पावलें पुढें टाकून तिनें आर्त स्वरांत म्हटलें, 'माझं हृदय, माझे प्राण मी त्याला देईन, अशोक.'

आणि हे उद्गार तिनें एवढ्या आवेगानें उच्चारले कीं तिचें हृदय जोरानें धडधडूं लागलें.

ती खुर्चीवर बसली.

अशोक ताड्कन् उठला आणि लीनेच्या शेजारीं जाऊन त्यानें प्रेमळ स्वरांत म्हटलें, 'खरंच का हें, लीना ?'

'हो....खरंच.' ती पुटपुटली.

त्यानें भावनावेगानें तिचा हात हातांत धरून तो प्रेमभरानें दाबीत म्हटलें, 'लीना,...माझ्या लीना,...'

ती उठली. आणि दोन पावलें टाकून तिनें म्हटलें, 'अशोक !... मी तुमचा निरोप घेतें...'

अशोक दचकला. त्यानें म्हटलें, 'तूं चाललीस आतां ?'

'हो. माझी मैत्रीण माझी वाट पहात राहील. मला गेलंच पाहिजे.'

इतकें बोलून ती निघालीच.

आपलीं ध्येयें सफल करून आपल्या व्यक्तित्वाचा संपूर्ण विकास घडून आणणारी अद्‌भुत घटना आज घडत आहे असेंच दोघांनाहि वाटलें.

# ११

दुसऱ्या दिवशीं लीना अशोकला न भेटतांच निघून गेली.

या प्रकारामुळें त्याचें मन शंकाकुल झालें. भावनेच्या भरांत लीना आपल्याशीं जें कांहीं बोलून गेली, त्याचा तिला नंतर पश्चात्ताप झाला काय ? तिच्या स्नेहाचा आपण दुरुपयोग केला असें तिला वाटलें नसेल ना ? अशा निरनिराळ्या शंका त्याला त्रस्त करूं लागल्या.

लीनेच्या व आपल्या भावी संबंधाविषयीं तो विचार करूं लागला. तेव्हां प्रणयाचें स्वप्नरंजन नष्ट होत असून परिस्थितीची भयाणताच आपल्या नजरेपुढें नाचत आहे, असें त्याला दिसून आलें. त्यांचा स्नेह विवाहनिरपेक्ष असेतोंपर्यंत सारें ठीक होतें. पण विवाहाच्या बंधनानें तो स्नेह चिरकाल टिकविण्याचा प्रश्न त्याच्या मनांत उद्‌भूत झाला तेव्हां आपला मार्ग सुकर नाहीं, किती तरी संकटें तेथें आडवीं येतील, अशा विवंचनेनें तो हैराण झाला. कारण लीना ख्रिस्ती होती आणि तो हिंदु होता. तिचा बाप श्रीमंत होता, आणि तो स्वतः गरीब होता. पेरैरा सरकारचे स्तुतिपाठक होते आणि पारतंत्र्याचे पुरस्कर्ते होते. उलट तो सरकारचा शत्रु होता व स्वातंत्र्याचा उपासक होता. अशी विषमतेचीं कितीतरी स्थळें त्याला दिसून आलीं व तो मनांत चरकला.

गांवीं जाण्यासाठीं लीना मोटारींत बसली, तेव्हांच तिला दिसून आलें

कीं आपण अशोकशीं खूपखूप बोलणार या आशेनें त्याच्यापाशीं गेलों होतों खरे; परंतु आपल्या मनांतील एका प्रबल भावनेशिवाय आपण दुसऱ्या गोष्टीचा नुसता उल्लेख देखील केला नाहीं. लोककार्याची, समाजसेवेची जी तळमळ आपणास लागून राहिली आहे असें आपण समजत होतों, ती खरोखर एक दिखाऊ भावना होती. आपल्या प्रेमभावनेप्रमाणें ती उत्कट व व्यापक नव्हती, असेंच नाहीं का ?

अशोकच्या सहवासांत आपण अर्धा दिवस घालवला. पण लोकांच्या दुःस्थितीसंबंधीं, गोमंतकाच्या खऱ्याखुऱ्या दर्शनासंबंधीं आपण कांहींच बोललों नाहीं. आपल्या भावी कार्यक्रमाचा आपण विचारहि केला नाहीं. अशोकनें हे प्रश्न टाळले. त्याची तळमळ दिखाऊच समजावयाची काय ?

या विचारचक्रानें तिच्या मनाची विचित्र अवस्था झाली. आतांपर्यंत आपल्या जीवनांत सुप्त असलेला एक प्रवाह केवढ्या प्रचंड गतीनें वर येत आहे आणि पुढें सरकत आहे याची तिला पहिल्यांदा आजच जाणीव झाली. हा प्रवाह आपल्या जीवितहेतूला पोषक होईल का मारक होईल ? या प्रश्नाची जाचणी तिच्या मनांत सुरू झाली.

मोटार तिच्या गांवीं पोंचली. तेव्हां तिला वडिलांची आठवण झाली. ते आपल्याला अशोकच्या भेटीबद्दल विचारतील आणि त्यांचें समाधान आपल्याला करावें लागेल.

हा विचार तिच्या मनांत आला. अशोकशीं परिचय झाल्यापासून ती हळूहळू वडिलांपासून दुरावत होती हें तिला माहीत होतें. लवकरच आपल्या आयुष्यांत एक क्षण असा आल्याशिवाय राहणार नाहीं कीं ज्या वेळीं वडिलांच्या प्रेमाला, लौकिकाला, वैभवाला रामराम ठोकून आपल्याला दुसरें आयुष्य पत्करावें लागणार, अशी खूणगांठ तिनें मनाशीं घातली होती.

पेरैरांना लीनेचा स्वभाव चांगला माहीत होता. ती आग्रही आहे

आणि आपल्या तत्त्वासाठीं कुणाचीच कदर बाळगणारी नाहीं, हें त्यांना पूर्णपणें ठाऊक होतें. त्यांच्या इच्छेविरुद्ध ती आपल्या आतेबरोबर मुंबई-ला गेली होती, आणि तेथेंच तिचें बहुतेक इंग्रजी शिक्षण झालें होतें. अधून मधून ती त्यांना पत्रें लिहीत असे, त्यांत तिच्या मनावर तेथील वाचनाचे व परिस्थितीचे जे संस्कार घडले होते त्यांचें दर्शन पेरैरांना होत असे. आणि तिच्या भविष्यकालासंबंधीं त्यांच्या मनांत दारुण निराशा उत्पन्न होई. ती सुटीच्या दिवसांत घरीं येई त्या वेळीं तिच्याशीं वेग-वेगळ्या विषयांवर त्यांचे वादविवाद होत. त्यावरून तिच्या आवडीनिवडी किती विचित्र आहेत हें त्यांना कळून चुकलें होतें आणि तिचें व्यक्तित्व दिवसेंदिवस तीव्र होत आहे याची चुणूक त्यांना मिळत होती. इतकेंच नव्हे तर तिच्या मतप्रणालीचा याच दिशेनें विकास होत गेला तर ती आपल्या स्वास्थ्याला, नांवलौकिकाला घातक होईल या कल्पनेनें ते अस्वस्थ होत असत.

लीना अशोकची भेट घेण्यासाठीं त्याच्या गांवीं गेली आहे हें त्यांना तिच्या भावाकडून कळलें तेव्हां त्यांना पहिला मोठा धक्का बसला. तिला यासबंधीं कांहींच विचारूं नये असेंच त्यांना सुरुवातीला वाटलें. ती अत्याग्रही व स्वाभिमानी असल्यामुळें ती आपल्या बंधनांना मान देणार नाहीं हें त्यांना पक्कें ठाऊक होतें. त्यांचा पक्ष सत्याच्या दृष्टीनें लंगडा असल्यामुळें त्यांचें नैतिक वजनहि तिच्यावर पडणें कठीण होतें. हें सगळें खरें असलें तरी तिच्या स्वच्छंदी वर्तनाकडे कानाडोळा केला तर मग ती जास्तच उद्धट होईल आणि आपली मुळींच पर्वा करणार नाहीं ही भीतीहि त्यांना अस्वस्थ करूं लागली आणि एवढ्याचसाठीं त्यांनीं लीनेच्या डोळ्यांत अंजन घालण्याचा निश्चय केला.

चहाच्या वेळीं पेरैरांनीं तिला प्रश्न केला, ‘ केव्हां आलीस ? ’

‘ आतांच. ’ तिनें उत्तर केलें.

' कुठं होतीस ? ' शांतपणाचा आविर्भाव मुद्रेवर आणून त्यांनीं विचारलें.

' लुईझेकडे. ' लीनेनें तुटक उत्तर दिलें.

' जायच्यापूर्वीं तू मला कळवलं नाहींस. '

' निघतांना तुमची भेट झाली नाहीं म्हणून मी कार्लुसकडे तसा निरोप ठेवला होता. '

' अशोक भेटले ना ? ' पेरैरांनीं बोंचक स्वरांत विचारलें.

' हो. ' तिनें शांतपणानें उत्तर केलें.

' फार वाईट केलंस ! ' निषेधाच्या भाषेंत ते बोलले.

' असं कां म्हणतां तुम्ही ? '

' त्याला तूं चांगली ओळखत नाहींस. '

' ओळखतें. अन् चांगली ओळखतें. '

' हा तुझा भ्रम आहे. मी तुला त्याची ओळख करून देतों. म्हणजे मग तुला वाटेल कीं त्याच्यासारख्या माणसाशीं तुझ्यासारख्या मुलीनें स्नेहसंबंध ठेवणें धोक्याचें आहे. '

लीना गप्प राहिली.

' पहिली गोष्ट म्हणजे तो हिंदु आहे. हिंदूंना सरकारदरबारांत किंमत नाहीं. रिपब्लिक झाल्यापासून हिंदु माणसांत शिरले आहेत. त्यापूर्वीं आम्ही त्यांना ' झेंतीयुश ' (अडाणी ) म्हणत असूं. अजून देखील आमच्यांतील म्हातारे त्यांना याच नांवानें संबोधतात. '

' अस्सं ? ' लीना मान हलवून म्हणाली. पपांना आधीं बोलूं द्यावें व मग त्यांना उत्तर द्यावें असें तिनें मनाशीं ठरविलें.

'लीना, आम्ही ख्रिश्चन आहोंत. आमचं घराणं फार जुनं अन् कुलीन आहे. तुझा स्नेह अशोकशीं जुळला तर ती गोष्ट आम्हांला दूषणास्पद होईल. '

आणि थोडा वेळ थांबून व विचारांत पडल्यासारखी मुद्रा करून त्यांनीं प्रत्येक शब्दावर जोर देऊन सावकाश म्हटलें, ‘ शिवाय, अशोक सरकारी नोकर नाहीं. श्रीमंत नाहीं....’

‘ उलट तो सरकारविरोधी आहे, क्रांतिकारक आहे, हें तुम्हीं नाहीं सांगितलं ?’

‘हो. तूं म्हणतेस तें देखील खरं आहे. तो क्रांतिकारक आहे अशी नुसती शंका जरी सरकारला आली तरी त्याला आफ्रिकेंत हद्दपारीची शिक्षा मिळाल्याशिवाय खचित राहणार नाहीं. अशा उपटसुंभ तरुणाशीं तुझं सख्य आहे असं लोकांना कळलं तर तें सगळ्यांनाच बाधक होईल. तुझी मतं माझ्या मतांशीं जुळत नाहींत हें मला माहीत आहे. पण त्या बाबतींत मी औदार्यानें वागायला तयार आहें.’

‘मग मीं काय करावं असं तुम्हांला वाटतं ?’ लीनेनें विचारलें.

‘अशोकशीं कोणताच संबंध तूं यापुढें ठेवतां उपयोगी नाहीं. आल्बेर्ते-सारखा सुविद्य, सुशील तरुण आमच्याकडे येत असतांना अशोकच्या सहवासाची तुला गरज भासावी, हें आमचं दुर्दैवच नाहीं का ?’

थोडा वेळ शांतता पसरली. आपल्या उपदेशाचा परिणाम मुलीच्या मनावर काय झाला आहे हें कळण्यासाठीं पेरैरा अधीर झाले.

‘तुम्हांला आणखी कांहीं सांगायचें आहे का ?’ लीनेनें प्रश्न केला.

‘नाहीं.’

‘मग आतां तुम्हांला माझं म्हणणं सांगायला हरकत नाहीं.’

‘हो. अवश्य सांग.’

‘ अशोक हिंदु आहेत. पण मी देखील मनानं व संस्कृतीनं हिंदु होऊं पहात आहें. आमचे पूर्वज हिंदुच होते. अन् तुमचं–माझं रक्त हिंदूचं आहे. फिरंग्याचं नाहीं. अन् म्हणूनच अशोकशीं स्नेह ठेवण्यांत आम्हांला कोणताच कमीपणा नाहीं. अशोक सरकारी नोकर नाहींत हें खरं

आहे. पण याच कारणासाठीं ते इतरांपेक्षां मला श्रेष्ठ वाटतात. आमच्या दुबळ्या स्वत्वशून्य सरकारी नोकरापेक्षां अशोक अधिक किंमतीचे नाहींत असं तुम्हाला वाटतं. सरकारच्या मर्जीची पर्वा आपण कां करावी ? लोकांच्या दुःस्थितीला कारणीभूत झालेल्या सरकारची मनधरणी तुम्ही पाहिजे तर करा. मी करणार नाहीं. ' लीनेनें आपलें म्हणणें सडेतोड शब्दांत आपल्या वडिलांपुढें मांडलें.

पेरैरांच्या मुद्रेवर संताप, तिरस्कार, इत्यादि विकारांची, गर्दी झाली. एवढ्या आत्यंतिकतेनें लीना आपलें मत व्यक्त करील अशी त्यांना कल्पना नव्हती. तिचा निर्धार पाहून ते मनांतल्या मनांत चरकले. त्यांनीं भीति घातली:

' मग थोड्याच दिवसांत आपल्या वर्तनाचा तुला पश्चात्ताप होईल. '

' पश्चात्ताप होण्यासारखं माझ्या हातून कांहींच घडणार नाहीं. '

' होय ना ? मग अशोकची यापुढें भेट घेऊं नकोस. '

' तें शक्य नाहीं. ' लीनेनें निर्धारानें म्हटलें. या वेळीं तिचा चेहरा लालबुंद झाला.

' याचा परिणाम वाईट होईल. '

' कांहीं हरकत नाहीं. ' एवढें उत्तर देऊन ती संतापानें आपल्या खोलींत आली. तिला वडिलांच्या विचारसरणीचा तिटकारा आला. वर्तमानपत्रकार, कौन्सिलर, समाजपुढारी, इत्यादि नात्यांनीं त्यांनीं जें विध्वंसक कार्य केलें आहे, तें भयाण स्वरूपांत तिच्या नजरेसमोर उभें राहिलें आणि या कार्यावर कठोर प्रहार करण्यासाठीं आपल्याला लवकरच सिद्ध व्हावें लागेल, असा तिनें आपल्या मनाचा निश्चय केला. हें ठरवतांना पुढील संकटांची तिला जाणीव झाली नाहीं असें नाहीं. वडिलांच्या वैभवावर लाथ मारून आपल्याला गृहत्याग करावा लागेल व तसें

झालें तर स्वतंत्र रीतीनें आपल्याला उपजीविका करावी लागेल हा विचार मघांप्रमाणेंच फिरून एकदां तिच्या मनांत आला व तिच्या वृत्तीची चलबिचल झाली.

## १२

दुसऱ्याच दिवशीं अशोकच्या कानावर अशी बातमी आली कीं शुद्धिकृत गावड्यांच्या कांहीं पुढाऱ्यांना सरकारनें कैद केलें आहे.

जुलमाविरुद्ध प्रतिकार करण्याची त्याची स्वाभाविक वृत्ति जागृत झाली. फिरंगी सरकार धर्माच्या व्यवहारांत तटस्थ असल्याचा वेळीं अवेळीं डांगोरा पिटण्यांत येत असतांना नागरिकांच्या धार्मिक स्वातंत्र्यावर आघात करणारें हें सरकारचें कृत्य पाहून त्याला चीड आली. आणि या प्रश्नासंबंधीं अधिक माहिती मिळवून त्याच्यावर वर्तमानपत्रांतून कडक लेख लिहिण्याच्या हेतूनें तो गावड्यांच्या गांवीं आला. आज तीन चारशें वर्षेंपर्यंत परधर्मांत कुचंबत राहिलेले गावडे अकस्मात् हिंदु झाल्याचें वर्तमान एक दिवस जगाला कळत होतें. सहा हजार गावड्यांनीं हिंदुधर्मांत परत यावें हें एक सामाजिक दिव्य होतें. कारण सरकारचें पक्षपाती धोरण, ख्रिस्ती धर्म व ख्रिस्ती समाज यांचा संघटित विरोध, हिंदूंचें स्वाभाविक औदासिन्य या सगळ्या गोष्टींना न जुमानतां हे अडाणी गरीब गावडे हिंदु होत होते. हा प्रकार गोमंतकाच्या इतिहासांत अपूर्व होता. त्यांना हिंदु म्हणून जगावयाचें होतें. इतर सगळीं सुखें त्यांच्या दृष्टीनें गौण होतीं. आपल्या रानटी अवस्थेंतहि त्यांनीं हिंदुधर्मावरील आपली निष्ठा कायम राखली होती. आणि आपल्या उद्धाराच्या क्षणाची ते वाट पहात होते.

सगळ्या बाह्य बंधनांनीं आतांपर्यंत ते ख्रिस्ती धर्माशीं बद्ध होते. त्यांचीं नांवें ख्रिस्ती होतीं. त्यांचे धर्मसंस्कार ख्रिस्ती होते. ते चर्चमध्यें जात होते. पण हें सगळें ते आपद्धर्म म्हणून करीत होते. त्यांच्या व्यवहाराच्या राखेंत जो निखारा धगधगत होता तो धर्मश्रद्धेचा होता. ही श्रद्धा वेडी असेल पण सरळ, स्वाभाविक, नैसर्गिक होती. तींत दांभिकतेचा लेश नव्हता. स्वार्थबुद्धीचा अंश नव्हता. याबाबतींत सुधारलेल्या ख्रिस्ती समाजापासून ते कितीतरी भिन्न होते. या समाजाचें ढोंग अतिरेकाला गेलें होतें. धर्म, राष्ट्रीयत्व, इत्यादि सगळ्या भावना हे लोक आपल्या स्वार्थाच्या अनुरोधानें निश्चित करीत होते. जातिवंत फिरंग्यापेक्षांहि हे स्वतांला कडवे धर्माभिमानी समजत. गोवें शहराला ' पूर्वेकडील रोम ' म्हणत आणि रोमला आपली धर्मभूमि मानीत. पोर्तुगीज लोक हे आपले पूर्वज आहेत असा टेंभा मिरवीत आणि हा सगळा देखावा ते कां करीत, तर त्याचे हितसंबंध त्यांना अबाधित राखावयाचे होते. हेच लोक गावड्यांचे खरेखुरे शत्रु होते आणि यांच्या कारस्थानामुळेंच ते बिचारे साधेसुधे गावडे शतकानुशतकें ख्रिस्ती धर्मांत खितपत पडले होते.

त्या एकाच खेड्यांत त्यांची हजार दीड हजार वस्ती होती. त्यांनीं निश्चय केला, प्रतिज्ञा केली आणि यथोचित धार्मिक विधीनंतर ते शुद्ध झाले. सरकारी अधिकाऱ्यांपर्यंत कागाळी गेली. आणि चौकशीच्या निमित्तानें त्या लोकांच्या पुढाऱ्यांना कैदेंत डांबून ठेवण्यांत आलें.

अशोकनें एका म्हाताऱ्या गावड्याची गांठ घेतली आणि त्यानें त्याच्याकडे संभाषणाला सुरुवात केली.

' आपल्या पुढाऱ्यांना न सोडलं तर आम्ही सर्वजण तुरुंगांत जाणार.' तो म्हातारा निश्चयी स्वरांत म्हणाला. आमच्यापैकीं एकाला जरी त्रास देण्यांत आला तरी तो सगळ्यांना आहे असं आम्ही समजणार. आम्ही सगळे मिळून त्याचा प्रतिकार करणार. '

त्याचा निश्चय ऐकून अशोकला आश्चर्य वाटलें. या अडाणी माणसाच्या वाणींत जें थोर तत्त्वज्ञान त्याला ऐकायला मिळत होतें त्याचा फिरंगी राजवटींत पांडित्याचीं बिरुदें मिरवणाऱ्या बोलक्या ढलप्यांत अभाव होता. जुलमाचा तिरस्कार व प्रतिकार संघटित रीतीनें, सामुदायिक रीतीनें केला पाहिजे ही प्रेरणा मानवतेची-स्वातंत्र्याची होती. ती सनातन होती. म्हणूनच ती वंदनीय होती.

सुशिक्षित समाज हतवीर्य झाला होता. सगळ्या अस्तित्वाचा चुराडा झाला तरी हुं चूं न करणारा होता. शेंकडों लहानमोठे कायदे आले, गेले; पण तो निश्चल राहिला. जणूं काय पाषाण ! पण ही निश्चलता जीवन्मृत्यूची होती. गावड्यांचा प्रतिकार या वीर्यशालित्वाचा, जीवनांतील विजयाचा द्योतक होता.

तो म्हातारा आवेशानें बोलत होता. 'क्षण क्षण मोजित आम्ही दिवस कंठीत होतों. आम्ही चर्चमध्यें जाऊन घरीं परत येत असूं तेव्हां देव्हाऱ्यांतल्या रामलक्ष्मणाच्या मूर्तीला आम्ही नमस्कार करीत असूं. गणेशाची पूजा करीत असूं. वटपौर्णिमेच्या दिवशीं भिंतीवर रंगवलेलीं वडाच्या झाडाचीं चित्रें तुम्हांला आमच्याकडे जेथें तेथें दिसतील.'

तो थोडा वेळ थांबला. आणि त्यानें नंतर सुरुवात केली, 'यापुढं असली लपवाछपवी करण्याचं आपल्याला कारण नाहीं. आतां मी राम झालों आहे आणि माझी बायको सीता झाली आहे. माझीं मुलं आतां 'गोविंद', 'गोपाळ', 'विठाबाई' झालीं आहेत. हीं नांवें उच्चारतांना जन्मोजन्मीं मनांत सांठवून ठेवलेला आनंद एकाच वेळीं अनुभवल्याचा आम्हाला भास होत आहे. आतां आमचा ज्ञानोबा आणि तुकाराम यांच्या ओव्या व गोड अभंग आम्ही मोकळ्या मनानं गातों अन् भजन करतों. अन्न कशासाठीं खायचं ? जगण्यासाठीं. जगण कशासाठीं ? सुखासाठीं, स्वातंत्र्यासाठीं. नाहीं का ? हें स्वातंत्र्य आम्हांला मिळालं ! आम्ही सुखी झालों !

त्यांचें स्वातंत्र्य, त्यांचें सुख त्यांना मिळालें होतें. पण आमचें सुख परागंदा झालें होतें. आमचें स्वातंत्र्य गहाण पडलें होतें.

तो गावडा पुढें म्हणाला, ' आतां आम्हांला भीति घालण्यांत आली आहे, बळजबरीनें आम्हांला परत ख्रिश्चन करण्यांत येणार ! आमचीं घरं-दारं जाळून टाकण्यांत येणार ! आम्हांला हद्दपार करण्यांत येणार ! ! पण आम्ही कशाला भिऊं ? आम्ही सगळे एक आहोंत आणि स्वतंत्र आहोंत. ' त्यानें स्वातंत्र्याचा जयजयकार केला.

केवढा आत्मविश्वास ! पांच हजार माणसें एकत्र होतात. एकाच विचारानें, एकाच ध्येयानें वागतात, आणि केवढी प्रचंड शक्ति या गरिबांच्या मनांत दडलेली असते !

त्याच्या या विजयी वृत्तीला नमस्कार करून अशोक घरीं आला. त्यानें गावड्यांच्या स्थितीवर एक जळजळीत लेख लिहिला. पण सरकारनें त्याला प्रकाश दिसूं दिला नाहीं.

हें त्याच्या समाजाचें लेखनस्वातंत्र्य होतें.

आणि तरीहि सगळीं वृत्तपत्रें सरकारच्या औदार्याची स्तुतिच करीत होतीं. या स्तुतिस्तोत्रांत अशोकच्याच तोंडून बदसूर निघत होता.

# १३

पेरैरांशीं लीनेचें जें भांडण झालें त्यामुळें तिचा कालचा सगळा दिवस अस्वस्थतेंत गेला. त्यांचीं मतें एरवीं कोणतींहि असलीं तरी ते तिचे वडील होते आणि म्हणून ते तिला प्रिय होते. त्यांच्या विचारसरणीमुळें आणि वर्तनामुळें ते तिच्यापासून हळुहळू दूर सरकत होते. त्यामुळें तिच्या मनांत त्यांच्याबद्दल तिरस्काराची भावना उत्पन्न झाली होती, व ती वाढत होती, हें तिला स्पष्ट दिसत होतें. त्यांच्यामधील अपरिहार्य कलह टळावा असेंच तिला मनापासून वाटत होतें.

नेहमींप्रमाणें आजहि तिच्याकडे आल्बेर्त आला. सगळ्या सुशिक्षित ख्रिश्चन समाजांत जे दोष तिला दिसत होते ते आल्बेर्तमध्यें समाविष्ट झाले होते. म्हणून ती त्याच्यावर नाराज असली तरी त्याच्या इतर गुणांवर ती खूष होती आणि त्यामुळेंच तो तिला प्रिय होता. त्याच्या भाषणांत नेहमीं विलासी जीवनाच्या गोष्टी असावयाच्या. समाजांतील दैन्याला तेथें थारा नव्हता. लीनेचें मन गंभीर विषयांत व्यग्र झालेलें असलें म्हणजे करमणूक या दृष्टीनें तिला त्याचें आगमन स्वागतार्ह वाटे.

आजहि तिनें त्याला आपल्या खोलींत बसवून घेतलें आणि त्याची गोड बडबड ती ऐकूं लागली.

तो तिला म्हणाला, 'लीना, हल्लीं तूं मोठमोठ्या गोष्टींसंबंधीं विचार करतेस, तें बरें नाहीं.'

'विचार करणं न करणं आपल्या हातीं नाहीं, आल्बेर्त.'

'नाहीं कसं? गोमंतकाचं दैन्य पाहून तूं हल्लीं दुःखी होतेस. तें दैन्य पाहण्याऐवजीं तूं त्याची आनंदी बाजू पाहिलीस तर माझ्या-प्रमाणें तूं देखील आनंदी राहणार नाहींस का ?'

'असला आनंद मला नको आहे. सगळा समाज दुःखी असतांना मीं आनंदी राहण्याचा प्रयत्न कां करावा ?' लीनेनें प्रश्न केला.

'आपल्याच सुखासाठीं.' आल्बेर्तनें उत्तर केलें.

'पण हें सुख तरी आपल्याला लाभतें का ? मनुष्य हा स्वतंत्रतेचा भुकेला आहे. मानवतेचे सगळे नैसर्गिक हक्क संपुष्टांत आले असतांना आपण सुखी आहोंत अशा भ्रमांत आपणाला राहतां येईल का ?'

'लीना, माझ्या आयुष्याला असल्या कांट्याकुट्यांची कधीं बाधा होत नाहीं. मग तूंच तेवढी हा उपसर्ग कां करून घेतेस ? परकी सत्तेमुळें माझ्या सुखांत कोणतेंच वैगुण्य आल्याचं मला दिसत नाहीं. येथील प्रत्येक सुशिक्षित तुला हेंच सांगेल.'

'याचं कारण असं कीं आपली विचारशक्ति मेलेली आहे. आपली भावना बधिर झालेली आहे. आपण कर्मेंद्रियांचं जिणं जगतों.' लीना उद्वेगानें म्हणाली.

'पोर्तुगीज सरकार किती चांगलं आहे ! आपल्या चारशें वर्षांच्या कारकीर्दींत त्यानें आम्हांला किती औदार्यानं वागविलं आहे !' आल्बेर्त पोर्तुगिजांचे पोवाडे गाऊं लागला.

'आमचा इतिहास तुला माहीत नाहीं वाटतं. आजचा खिस्ती समाज ही जुलमी फिरंगी राजवटीची दिव्य पताकाच आहे. फिरंग्यांनीं आम्हांला

आपल्याप्रमाणेंच दुबळे व निष्क्रिय करून सोडलें आहे. या दुबळेपणापेक्षां त्यांनीं येथें केलेलें क्रौर्य पत्करलें.'

'कोणता दुबळेपणा पोर्तुगिजांनीं दाखवला तें तर सांगशील ?' आल्बेर्तनें प्रश्न केला.

'पाश्चात्त्य सुधारणेचा उपयोग करून गोमंतकाला सुखसमृद्ध करण्याचं कार्य पोर्तुगिजांनीं केलं नाहीं. पोर्तुगीज साम्राज्यशाहीचं येथील कार्य म्हणजे बळजबरीचीं धर्मांतरं. समाजाच्या कोणत्याच शक्तींचा विकास घडवून आणला नाहीं. गोमंतकाच्या निसर्गशक्तीचा त्यांनीं फायदा घेतला नाहीं. यामुळें यांत्रिक युगापासून आपला प्रांत कितीतरी दूर आहे. '

'या त्याच्या मागसलेपणांतच त्याची शांति आहे. '

'ही शांति नाहीं. स्मशानशांति आहे. गोमंतक बुद्धीनं अतिशय तीव्र असूनहि त्याच्या बुद्धीला इथं वाव नाहीं. त्याची कर्तृत्वशक्ति जन्मण्या-पूर्वींच नष्ट होते. याचसाठीं गोमंतकाबाहेर गेल्याशिवाय गोमंतकीयांना आपल्या उज्ज्वल भवितव्याचा ठाव घेतां येत नाहीं. ' लीना बोलत होती व आल्बेर्त निर्विकार मनानें ऐकत होता. त्यामुळें कितीतरी सांगण्यासारखें असूनहि तिनें जीभ आवरती घेतली. गायन, वादन, सिनेमा, इत्यादि गोष्टींची चर्चा चालू असती तर आपलें दिखाऊ ज्ञान मिरवून त्यानें तिचें रंजन केलें असतें. पण असल्या गंभीर विषयाचा विचार करायला तो मुळींच तयार नव्हता. शेवटीं त्यानें कंटाळून म्हटलें, ' या तुमच्या भानगडी मला कांहीं कळत नाहींत. हें तुझं तत्त्वज्ञान अशोकलाच चांगलं समजेल.'

' म्हणूनच मी त्यांचा सहवास शोधतें. अन् तेवढ्यासाठीं पपा आणि तूं माझ्यावर रागावतां ! ' लीना म्हणाली.

'मला एक कल्पना सुचली आहे. सांगूं का तुला?' आल्बेर्तनें उल्हसित होऊन विचारलें.

'हो, हो. सांग लवकर.'

'एक पिकनिक करायचा आमचा विचार आहे. तूं आलं पाहि-जेस.' तो म्हणाला.

'अवश्य येईन; पण केव्हां ?'

'उद्यांच.'

'पण कुठं ?'

'जांबावलीला जाऊं. तिथं पाण्याचा तलाव व कुळागर आहे. एक दिवस तिथं मजेंत जाईल आपला.'

'मग तयारीला लागा तुम्ही. अशोक असते तर रंग आला असता.' हें वाक्य उच्चारतांना तिला अशोकची आठवण झाली.

'क्षमा कर. अशोक आला तर तूं नेहमींच्या या देशभक्तीच्या गोष्टी त्याच्याशीं बोलत बसशील. मग पिकनिकचं व्याख्यान होईल. अशोकला इथं बोलावून तूं आम्हांला छळूं नकोस.'

' बरं आहे. ' तिनें स्मित करीत म्हटलें.

दुसऱ्या दिवशीं पहाटेला लीना, आल्बेर्त व कार्लुस हीं तिघेंही वनभोजन करायला निघालीं. केरीपर्यंत पायीं चालत जाण्याचें त्यांनीं ठरवलें होतें.

थंडी पडली होती. झाडाच्या पानांवरून दंवबिंदु गळत होते. पांखरांची गोड किलबिल सुरू झाली होती.

गप्पागोष्टी करीत तीं डोंगर उतरूं लागलीं. तेथून दिसणारा खालचा देखावा अतिशय रम्य होता. घनदाट पर्णराजींचा हिरवा समुद्र खालीं पसरला होता. तें सगळें खोरें वनस्पतींनीं भरून गेलें होतें. आणि त्याच्या मधोमध विस्तृत तलाव पसरला होता. चारी बाजूंनीं जमिनीचे उंचवटे होते. एकादें सुंदर निसर्गदृश्य सुंदर चौकटींत शोभून

दिसावें त्याचप्रमाणें समोरील निसर्ग त्या सुंदर टेकडीच्या चौकटींत शोभून दिसत होता.

लीनेला असल्या सहलीची व वनभोजनाची आवड होती. तिच्या एकांतप्रिय वृत्तीला निसर्गाच्या साहचर्यांत भावनांची भरती येत असे.

तीं खालीं पोंचलीं तेव्हां दहा वाजले होते. पण त्या कुळागराच्या शांततेनें काळाची गति कुंठित झाल्याचा भास होई. पोफळींचें छत्र इतकें दाट होतें कीं, सूर्यकिरण क्वचितच जमिनीचें दर्शन घेऊं शकत. तलावाचा पृष्ठभाग मात्र उन्हानें चमकत होता. पण तें ऊन देखील पर्णराजीं-तून खालीं उतरल्यामुळेंच कीं काय, कोवळें असल्याची गोड प्रतीति येई. सर्कशीच्या तंबूंत ग्यालरीची बैठक तयार केलेली असते त्याप्रमाणें जमिनीच्या अरुंद पण लांबच लांब पट्ट्या जिन्याच्या पायऱ्यांप्रमाणें वरपासून खालपर्यंत उतरत आल्या होत्या आणि त्यांत लावलेल्या केळी, पोफळी, नागवेली, इत्यादि नाजूक झाडांच्या अंगांतून जो गारवा निघत असे व जो सुवास दरवळत असे, त्यामुळें त्या वातावरणांत शांति व समाधान यांनीं कायमची वस्ती केली आहे असें वाटत असे. दर पट्टींतून पाण्याचे सुंदर पाट खेळवले होते. ते वाहत असतांना शांतिसमाधानाचीं गीतेंच जणूं काय गुणगुणत होते. अधूनमधून ओवळी, सोनचाफा व नागचाफा इत्यादि वृक्ष फुलांनीं डवरले होते आणि त्यांच्या उग्र सुवासानें आसपासचें वातावरण उन्मादक झालें होतें. जमिनीच्या पोटांतून ज्यांनीं हें भांडार उकरून वर काढलें तीं माणसें आसपास कष्ट करतांना दिसत होतीं.

त्या भूमीचें हें सौभाग्य होतें.

निसर्गाचें हें वैभव पहात पहात सगळेजण खालीं उतरले व तलावा-च्या कांठाशीं येऊन पोंचले. आल्बेर्तच्या चित्तवृत्ती उचंबळून आल्या होत्या. वातावरणांतील उन्माद व काव्यमयता यांमुळें फिरंगी संस्कृतीचा

सैतान त्याच्या अंगांत संचरूं लागला. वृत्तीची बेहोषता उत्पन्न झाल्याशिवाय कोणत्याहि प्रसंगांतील मजा अनुभवतां येत नाहीं हा त्याचा अनुभव होता. लग्न, नाच, भोजन, इत्यादि समारंभांत अंगांतील विकारांना कृत्रिम उपायांनीं चेतवून मग उन्मादक आनंदाचा आस्वाद घेण्याची पाश्चात्यांची पद्धति ख्रिश्चनांनीं आत्मसात् केली होती. तिचें प्रत्यंतर आजहि दिसून आलें. कारण आल्बेर्तनें बरोबर आणलेल्या मद्याच्या बाटल्या उघडल्या व पोर्तुगालची ती उंची, सुंदर दारू प्यायला सुरवात केली. या कार्यक्रमांत लीनेनें भाग घेतला नाहीं. जेवणाच्या वेळीं ती नेहमीं नियमितपणें थोडें मद्य घेई. आणि आजहि तें घ्यायला वस्तुतः कोणतीच हरकत नव्हती. परंतु अशा या प्रसंगीं तिच्या विवेकानेंच तिच्या स्वाभाविक आवडींना लगाम घातला. अशोकाशीं तिचा जो स्नेह घडून आला होता, त्यामुळें अवघ्या थोड्या कालावधींत तिच्या वृत्तींत बराच मोठा बदल घडून आला होता. तिच्यावर लहानपणापासून वैभवाचे संस्कार घडले होते, आणि तिच्या पूर्वजांनीं ख्रिस्ती धर्म स्वीकारल्यापासून अधिकार, संपत्ति, विलास, यांच्या पायीं तिच्या घराण्यानें साध्या राहणीला मूठमाती दिली होती. या परंपरेचा ठसा अर्थातच तिच्या मानसिक प्रकृतीवर उठल्याशिवाय राहणें शक्यच नव्हतें. त्यामुळें जीवनांतील भोगांकडे तिची स्वभावतःच असलेली ओढ तिला केव्हां केव्हां अतिशय जाणवत असे आणि अशा वेळीं तिच्या वृत्तीची ही दुर्बलता आणि ग्रंथ व परिस्थिति यांच्या अभ्यासानें तिच्या मनाचा झालेला निश्चय या दोहोंमध्यें कलह माजून राहत असे. अशोकच्या व्यक्तित्वाच्या प्रभावानें विलासी जीवनाचा मोह बाजूला सारण्याचा ती प्रयत्न करी आणि आतां देखील तिनें मद्य न घेण्याचा आग्रह धरला, तो अशोकच्या सहवासानें तिच्या जीवनक्रमाला मिळालेल्या नवीन दीक्षेमुळेंच धरला.

तो विस्तीर्ण स्फटिकवत् तलाव आपल्या चमकणाऱ्या पाण्यानें जणूं काय त्या त्रिकूटाला आपल्याकडे बोलावीत होता. तलावाच्या दुसऱ्या तीरावर जें कुळागर पसरलें होतें तें अगदीं सपाट जमिनीवर होतें. त्यामुळें त्याची शोभा वेगळीच दिसत होती. असंख्य खांबांच्या आधारावर उभ्या असलेल्या या भव्य प्रासादाच्या अंतर्भागांत काय चाललें असेल हें जाणण्याची चुटपूट बाहेरील प्रवाशाला लागल्यावांचून राहत नसे. जनलज्जेची कोणतीच क्षिति मनांत न बाळगतां गावड्या तरुणी अपुरें वस्त्र नेसून पाटांतलें पाणी ' कल्ल्यां ' च्या साहाय्यानें पोफळीच्या मुळांवर शिंपडीत, त्या वेळीं वस्त्रांचें कोणतेंच बंधन न मानणारें त्यांचे उन्नत उरोज त्या हालचालींबरोबर वरखालीं होत, त्यांचा कटिप्रदेश व नितंब यांना उन्मादक गति मिळे. मद्याचा आस्वाद घेतांना आल्बेर्तची नजर या चेतक दृश्यावर स्थिर झाली तेव्हां त्याला मद्यप्राशनांत अधिकच गोडी प्रतीत झाली. आणि जलक्रीडेच्या निकट आनंदानें त्याचें मन हुरळून गेलें. आल्बेर्त व कार्लुश यांनीं स्नानाचा दुसरा पोशाक चढविला, तरीहि लीना स्वस्थच बसली होती हें पाहून आल्बेर्तनें तिला म्हटलें,

'तूं आम्हाला सोबत नाहींस करीत? '

'मी आज स्नान करणार नाहीं ! ' तिनें उत्तर केलें. तिचा उदासवाणा स्वर त्या दोघांनाही जाणवला.

'मग पिकनिकला कशाला आलीस ? इतका छानदार तलाव पुढं पसरलेला असतांना पोहण्याची मजा अनुभवल्याशिवाय तूं घरीं परत जाणार ! ' अल्बेर्तनें प्रश्न केला.

लीना समोरच्या चंचल पाण्याकडे पहात गप्प राहिली. क्षणाक्षणाला उठून लगेच विरून जाणाऱ्या जललहरींप्रमाणें तिच्या मनांतहि विचार-भावनांच्या कितीतरी लहरी उठल्या.

'लीना, तूं किती सुंदर पोहतेस ! आमच्यापेक्षां या कलेंत तूं वाकबगार आहेस. नृत्यवादनांत मोठ्या उत्साहानं तूं भाग घेतेस. मग जलक्रीडेंत तूं अशी माघार घेतेस हें तुला बरं वाटतं ?' त्यानें पुढें म्हटलें.

त्याचा चेहरा आतां भावनांनीं जणूं काय फुलला होता. त्याचे मोहक डोळे आतां विकारी आनंदानें चमकत होते. त्याच्या गालांवर लाली चढली होती आणि एक प्रकारचा सूक्ष्म कंप त्याच्या गात्रांत संचरला होता. स्नानाच्या तंग व पातळ पोषाखांत त्याचा उंच व गोंडस देह फारच घाटदार व रेखीव दिसत होता.

लीनेच्या अंगीं नेहमीं वास करणाऱ्या कलाचतुर यौवनाला आव्हान करण्यासाठीं त्यानें व्हायलीन हातांत धरलें आणि आकाशाकडे आपली धुंद नजर लावून आपल्या रम्य आवाजांत त्यानें गीत म्हणायला सुरवात केली:

सुखा, मुज्या गोपान यो आंज्या
तुजाविण हें काळीज रोडता
आँतोस्कोन मुजें हें सुंदेता
गोपान दोरूंक वोरनुक तुका

लीनेला वाटलें, आपण येथें यायला नको होतें. अशोकच्या स्नेहांत अंतराय उत्पन्न करण्यासारखी कोणतीच गोष्ट आपण करायला नको होती...

पण तूं दुबळी आहेस का ?– तिच्या मनानें तिला प्रश्न केला. —सगळ्या कलांचा आस्वाद घेतांना तूं खंबीर असतेस. कलेच्या परिणामाचा विकारी अंश बाजूला सारून तूं तिचा आस्वाद घेऊं शकतेस. मग आतां जलक्रीडेला भिऊन मागं राहतेस हा तुझा दुबळेपणा नाहीं काय ?

या विचारांबरोबर लीना निश्चयानें उठली आणि बाजूला जाऊन

तिनें झटपट आपला पोशाख बदंलेला.

आल्बेर्तचा आवाज वाद्याच्या साथीनें आसपासच्या कुळागरांत दुमदुमत होता. व त्याचे प्रतिध्वनी एकसारखे उठत होते ते तर फारच मजेदार होतें.

लीना तलावाच्या दिशेनें जाऊं लागली. आल्बेर्तनें तिला प्रश्न केला, ' त्या बाजूनें कुठें जातेस, लीना ? '

' स्नान करायला. ' ती उत्तरली.

' पोहायला ही जागा सुरेख आहे. आपण सगळे इथंच स्नान करूं.'

' नाहीं, आल्बेर्त. तुम्ही दोघेहि इथं अंघोळ करा. मला पोहायला थोडा एकांत हवा. म्हणून तलावाच्या टोंकाला जाऊन मी लगेच येतें. '

आणि इतकें बोलून ती तेथून झटकलीच.

आल्बेर्तची निराशा झाली. तो तलावांत उतरला. त्याच्या मित्रानेंहि पाण्यांत उडी टाकली. त्याबरोबर असंख्य जलबिंदू वातावरणांत उडून प्रकाशांत चमकले, आणि वर्तुलाकार लाटांचा नाद सुरू झाला.

कार्लुशला चांगलें पोहतां येत नव्हतें. कंबरभर पाण्यांत हात मारीत, बुड्या घेत, तो सपासप पोहत पुढें जाणाऱ्या आल्बेर्तकडे कौतुकानें पहात राहिला.

आल्बेर्त पाण्यांत सफाईनें तरंगत होता. या कलेंत तो पटाईत असल्यामुळें वेगवेगळ्या प्रकारांनीं त्याचें क्रीडाकौशल्य दिसून येत होतें. ही त्याची क्रीडा चालली असतांना त्याचें मन मात्र वेगळ्याच साम्राज्यांत तरंगत होतें. लीना आमल्याबरोबर पोहायला आली असती तर आपण काय काय केलें असतें यासंबंधीं निरनिराळ्या कल्पना त्याच्या मनांत तरंगूं लागल्या.

तो याप्रमाणें पोहत पोहत तलावाच्या दुसऱ्या तीरावर गेला. तेथून त्यानें आसपास नजर फेकली. समोरचें कुळागार त्याला आतां कितीतरी

आश्चर्यकारक दिसलें. ती वसाहत करणाऱ्या अडाणी लोकांचें कौशल्य अप्रतिम होतें. टेकडीच्या शिखरापासून तलावाच्या कांठापर्यंत नानाविध वनस्पतींची लागवड किती पद्धतशीर व रेखीव रीतीनें करण्यांत आली होती.

कांहीं वेळानें त्याची दृष्टि तलावाच्या डाव्या बाजूकडे वळली व तो चमकला. तेथें लीना एकांतांत स्नान करीत असलेली त्याला दिसली. त्याबरोबर अधिक विचार न करतां त्यानें त्या दिशेनें पोहायला सुरुवात केली.

हा प्रकार लीनेच्या ध्यानांत आला नाहीं. आपण अगदीं निवांत व सुरक्षित जागीं असून आपल्याला येथें आल्बेर्तचा उपसर्ग होणार नाहीं अशी तिची समजूत होती.

तिनें पाण्यांत प्रवेश केला त्या वेळीं तिच्या मनांत अशोकसंबंधीं विचार येऊन गेला. त्याच्या सोबतीची उणीव तिला जाणवली. आणि लवकरच आपण त्याला बरोबर घेऊन येथें येणार आणि त्याच्यासमवेत जलक्रीडेचा भरपूर आस्वाद घेणार असा तिनें आपल्या मनाशीं बेत केला. ती देखील पोहण्यांत कुशल होती. आपलें कौशल्य अजमावून पाहण्याचा नाद प्रत्येक कलावानाला असतोच. या विस्तृत तलावांत पोहून तिला आपल्या कौशल्याचा अजमास घ्यावयाचा होता.

तिनें पाण्यांत हात पाय मारले व लवकरच ती बऱ्याच अंतरावर येऊन पाण्यांत उघारी तरंगत राहिली.

या पद्धतीनें पोहण्यांत तिला नेहमीं वेगळीच मजा वाटत असे. हात पाय न हालवतां, मानेला विशिष्ट झोंक देऊन व शरीर एका पातळीवर आणून ती तास अर्धा तास पाण्यांत तरंगत राही. आणि नीलाकाशाकडे पाहात मनाच्या शून्य तंद्रींत रमून जाई.

अशा स्थितींत ती आतां पडली होती. कोणत्याच गोष्टीचें तिला भान नव्हतें. खालीं पाणी आणि वर आकाशाचा अनंत अवकाश एवढेंच तिला जाणवत होतें. महातत्त्वांच्या मांडीवर आपलें शरीर टेकून ती विवस्त्र

अवस्थेंत पडली होती. तिच्या मस्तकांत कोणतेंच विचार चालत नव्हते. तिच्या इंद्रियांपुढें कोणताच वेध नव्हता. तिची नजर अनंतांत विलीन झाली होती. खालून एकादी स्प्रिंग लावून ठेवल्याप्रमाणें या निश्चल अवस्थेंतहि तिची काया कंप पावत होती. इंद्रियांची जाणीव हळूहळू विरत आहे; विकारी मनाचे सगळे भाव वितळत आहेत; देहाचें ज्ञान गळत आहे; अशा अवस्थेचा ती प्राणांचीं इंद्रियें करून आस्वाद घेत होती. इतकी समाधि, वृत्तीचें इतकें उच्चत्व तिला क्वचितूच अनुभवतां आलें होतें. नेहमीं पोहतांना तिला चंचल वृत्तींचा अनुभव येई. पाण्याच्या स्पर्शानें तिचें मन व तिचा देह विलक्षण चंचलतेनें स्फुरूं लागत. आज सगळीच एकतानता होती.

आणि ती अशा स्थितींत असतांना आल्बेर्त, तळमळत, उचंबळत, जलपृष्ठाच्या रेषेवर उठून दिसणाऱ्या तिच्या वक्षस्थळांच्या वर्तुलांकडे आपली भोगी नजर स्थिर करीत पुढें सरकत होता.

तो तिच्यापासून चार हातांच्या अंतरावर आला तरी लीना आपल्या तंद्रींतच तरंगत होती.

तो आतां तिच्यावर झडप घालणार, इतक्यांत पाण्याच्या सळसळाटानें दचकून तिचें लक्ष त्याच्याकडे गेलें आणि तोंडांतून चीत्कार काढून ती पाण्याच्या पोटांत अदृश्य झाली.

आणि त्याच क्षणीं अशोक तलावाच्या तीराला येऊन पोंचला. आणि लीनेला अशा विवस्त्र स्थितींत आल्बेर्तच्या अगदीं शेजारीं पाहून त्याला धक्का बसला.

एकहि क्षण तेथें न थांबतां तो तेथून मागें परतला.

## १४

आल्बेर्त विकारवश झाला होता. त्यानेंहि पाण्यांत बुडी मारली व लानेचा शोध चालविला. त्या स्वच्छ पाण्यांत तिचा शुभ्र रेखीव देह झरा-झर स्वैरपणें जात होता तो त्याला स्पष्ट दिसत होता. त्या वेळीं ती एकाद्या जलदेवतेप्रमाणें शोभत होती. ती भयचकित झाली होती. आणि तिच्या वृत्तींत बेफामपणा शिरला होता.

आल्बेर्त अतिप्रसंग करणार हें तिला कळून चुकलें होतें. त्याला टाळण्या-साठींच तिनें ही सुरक्षित जागा पसंत केली होती, हें त्यालाहि चांगलें माहित होतें. असें असूनहि तो उद्धटपणानें, अनाहूतपणानें तिच्या इच्छेची पर्वा न करतां तिचा पाठलाग करीत होता. हा प्रकार तिला असह्य झाला.

आल्बेर्तला त्या विकारवश स्थितींत आकस्मिक बल व कौशल्य जणूं प्राप्त झालीं होतीं. त्यानें लवकरच तिला गांठली. पण क्षणांत त्याच्या हाताच्या पकडीतून तिचा पाय सर्रकन सुटे, तर क्षणांत तिच्या देहाभोंवतीं दोन्ही हातांचा विळखा घालून तो आवळण्यापूर्वींच ती त्यांतून निसटून जाई.

याप्रमाणें थोडा वेळ त्यांच्यामध्यें पाठांशिवणीचा खेळ जणूं काय चालूं होता. शेवटीं वातावरणाइतक्याच स्वच्छ व विरल अशा त्या जलोदरांत

त्यानें तिला मिठी मारली. कांहीं क्षण धडपड झाली. त्याच्या हाताचा त्वेषानें चावा घेऊन लीनेनें तलावाचा पृष्ठभाग गांठला. आणि चार हात मारून ती कांठाशीं आली.

आल्बेर्तहि तिच्या मागोमाग वर आला. त्याची मुद्रा काळवंडून गेली होती. चाव्याच्या तीव्र वेदनेनें त्याचें शरीर कांपत होतें. या अकल्पित प्रकारानें त्याला धक्का बसला होता व त्याची धुंदी उतरली होती.

त्यानें तिच्या मागोमाग कांठावर चढत आर्जवी स्वरांत तिला म्हटलें, 'लीना, मला क्षमा कर.'

त्याच्याकडे मान न वळवतां ती पुढें चालूं लागली. परंतु तिच्या मुद्रेवरचा आविर्भाव, तिच्या चालण्याचा आवेश, हें सारें पाहून त्याला असेंच वाटलें कीं, लीना रोमरोमांतून आपला धिःक्कार करीत आहे.

आल्बेर्त तेथूनच परतला. तिच्या मागोमाग जाण्याचें धैर्य त्याला झालें नाहीं.

लीना तीराप्रमाणें धांवतच रस्त्यावर आली आणि मोटारनें घरीं परतली. घडलेल्या प्रकारानें ती इतकी गोंधळून गेली होती कीं, मनाच्या असहाय्य अवस्थेंत तिनें आपलें अंग पलंगावर टाकून दिलें व उशींत तोंड खुपसून एकाद्या बालिकेप्रमाणें ती स्फुंदस्फुंदून रडूं लागली.

थोड्या वेळानें तिचा नोकर आंत आला आणि त्यानें अशोकची चिट्ठी तिच्या हातीं दिली.

तिनें ती झटकन् उघडली आणि कांपऱ्या अक्षरांत अशोकनें लिहिलेल्या त्या चार ओळी वाचून ती पलंगावर पुन्हा आडवी झाली आणि तिनें जोराचा हुंदका दिला.

अशोकनें चिठ्ठींत लिहिलें होतें, 'किती आशेनें मी तुझ्याकडे आलों होतों! पण आल्बेर्तबरोबर तुझी जलक्रीडा चालली असतांना मला जें कांहीं दिसलें तें खरें असेल तर आमची योजना मातीमोल झाल्यासारखीच

नाहीं का ? तुझ्यामाझ्या सहवासांत जें कांहीं घडलें तें स्वप्न होतें. आल्बेर्तच्या सहवासांत जें मीं पाहिलें तें सत्य होतें. असेंच नाहीं काय ? '

लीनेनें हा मजकूर फिरून दोनतीनदां वाचला. किती कठोर मजकूर ! शब्द कठोर नव्हते. पण त्यांतील अर्थ तिच्या सर्व आशा-आकांक्षांचा चुराडा करणारा होता. तिच्या जीवनांतील भावि सुखाचें नाजूक सूत्र जणूं तुटून गेलें होतें. तिच्या सार्वजनिक आयुष्यांतील ध्येयसृष्टि अकस्मात् जळून खाक झाली होती. अशोकच्या आधाराशिवाय तिला कोणतेच मनोरथ पूर्ण करतां येत नव्हते. गोमंतकाचें दर्शन घेऊन झाल्यानंतर त्याच्या नवनिर्मितीचें जें महान् कार्य तिच्या मनांत घोळत होतें, तें अशोकच्या सान्निध्याशिवाय एकाद्या पांढऱ्या ढगाप्रमाणें वाऱ्यावर विरून जात होतें. ती किती दुर्दैवी होती ?

या दारुण विचारानें लीना तळमळत होती. आयुष्यांतील प्रेमाच्या, कर्तृत्वाच्या गोड वसंतऋतूला प्रारंभ होतो न होतो तोंच वर्षाऋतूचें भयाण तांडव सुरू झालें होतें.

आणि यांत तिच्या दृष्टीनें अशोकचा यत्किंचितहि दोष नव्हता. तो मनुष्य होता. त्यांतल्यात्यांत तो पुरुष होता. तो ध्येयवादी होता. प्रामाणिक व सरळ होता. आपल्या वर्तनांत त्याला दुटप्पीपणा दिसून आला. आणि तोच त्याला सहन झाला नाहीं, यांत त्याचा काय अन्याय ! आपले विचार, आपल्या भावना, आपण त्याच्यापाशीं व्यक्त केल्यानंतर आपल्या हातून जो प्रकार घडला तो आपल्या पहिल्या वर्तनाशीं किती विसंगत आहे ! आल्बेर्तबरोबर आपण जलक्रीडा केली असेंच अशोकला वाटलें. आपण त्याचा धिक्कार केला, त्याला कठोर शिक्षा दिली, हें कांहीं अशोकला कळलें नाहीं. त्याच्या दृष्टीनें इतर विलासी, चंचल ख्रिश्चन तरुणी आणि तत्त्वज्ञानाचे पट्टे कुशलतेनें फिरविणारी लीना, यांच्यांत कोणता फरक होता ? त्या तरुणी निदान प्रामाणिक असतात. कारण समाजसेवे-

संबंधीं त्या स्वप्नांत सुद्धां विचार करीत नाहींत. त्यांचें मन व कृति सुसंगत तरी आहे. आणि आपण ?... विचारानें आपण अशोकपाशीं जात असतांना रक्तानें आपण आपल्या आदर्शापासून किती दूर सरकत होतों ?...

या परिवर्तनाची तिनें चिकित्सा सुरू केली तेव्हां तिला दिसून आलें कीं आपल्या इच्छेच्या कक्षेबाहेर असें कांहीं तरी आपल्यांत घडत आहे.

मनाच्या अशा भ्रमणांतच मध्यरात्रीपर्यंत तिचा डोळा लागला नाहीं.

# १५

आपल्या पापाचें जणुं काय प्रायश्चित्त घेण्यासाठीं लीना दुसऱ्या दिवशीं पहाटेला उठली आणि आपले प्रातर्विधी झटपट उरकून घेऊन ती बाहेर पडली. ती दहा पावलें चालली असेल नसेल, तोंच तिला समोर जें दृश्य दिसलें तें पाहून तिच्या अंगावर शहारे आले.

चाळीस पंचेचाळीस वर्षांच्या वयाच्या एका गरीब जखमी बाईला तेथें आणण्यांत आलें होतें. तिला झालेल्या जखमांतून रक्तस्राव होत होता. तिचे केस विस्कटलेले असून धुळीनें भरलेले होते. तिच्या सांगाती एक म्हातारा होता. लीना दृष्टीस पडतांच त्यानें तिला मुजरा करून तिच्या जवळ येत म्हटलें, ' सांतूनं हिला मारहाण केली आज. '

त्या बाईची स्थिति पाहून लीनेला कळवळून आलें. हा प्रकार काय असेल हें तिनें कल्पनेनेंच ताडलें. अधिक चवकशी न करतां लीना घाई-घाईनें घरांत परतली. तिनें औषधाची बाटली व पट्ट्या आणून तिच्या जखमा धुवायला लावल्या व त्यावर औषध लावून स्वतःच्या हातानें बांधून टाकल्या. मग तिला पेजपाणी द्यायला लावलें आणि बऱ्याच वेळानंतर ती त्याच्याबरोबर पुन्हां बाहेर पडली.

वाटेंत म्हाताऱ्यानें तिला घडलेली हकीकत सांगितली. सांतूनें दारूच्या धुंदींत बायकोशीं भांडण करून सुऱ्यानें तिला जखमा केल्या होत्या.

शेजारी मध्यें पडले नसते तर त्यानें तिला ठारहि केली असती. शेजाऱ्च्या म्हाताऱ्यानें न्यायनिवाडा करण्यासाठीं पेरैरांच्याकडे तिला आणलें होतें. तिचें घर त्यांच्या भाटांत होतें.

मैल दीड मैल वाट चालून गेल्यानंतर ती एका खेड्यांत पोंचली. त्या खेड्यांतील बहुतेक जमीन पेरैरांच्या मालकीची होती. तींतच शें-सव्वाशें घरें होतीं. तीं अगदीं लहान व चंद्रमौळी होतीं. बांबूच्या भिंती, झावळ्याचें छप्पर, अशी त्यांची रचना होती. चांगलें घर क्वचित्‌च दिसत होतें.

अशा एका झोंपड्यांत त्या म्हाताऱ्यानें लीनेला नेलें. येसू नवऱ्याच्या भीतीनें कांपतच बाहेर उभी राहिली. घराच्या एका कोंपऱ्यांत चार पांच वर्षांचें एक मूल आजारी स्थितींत पडलें होतें.

लीनेनें घरांतल्या दृश्यावरून चटकन्‌ नजर फिरवली. एका खोलींत सांतू—घराचा मालक—कण्हत कुंथत, उघड्या ज़मिनीवर अस्ताव्यस्त पडला होता. दारूची निशा अजून उतरली नव्हती. त्याच्या तोंडांतून शिव्यागाळीचा वर्षाव होत होता.

हा प्रकार कमीअधिक प्रमाणांत त्या सगळ्या कुटुंबांतून चालू होता. घरच्या माणसांत या ना त्या निमित्तानें भांडण व्हायचें. मग मारहाण, शिवीगाळ, बोंबाबोंब, इत्यादि विधि उरकल्यानंतर भयाण शांतता प्रस्थापित होई.

लीनेला असा प्रश्न पडला कीं या प्रकरणांत शिक्षा कोणाला करायची ?

ती अशा विचारांत असतांनाच म्हाताऱ्यानें म्हटलें, ' धनीण, तुम्ही इथं क्वचितच येतां म्हणून तुम्हांला इथली माहिती नाहीं. या गांवांतल्या दीडशें घरांपैकीं सव्वाशें घरें दारूबाज आहेत. पुरुष, बायका, मुलें, सगळीं दारू पितात. ...'

लीनेला तें ऐकून दुःखाचा व आश्चर्याचा धक्का बसला.

म्हातारा पुढें म्हणाला, ' पोटाला न मिळालं तरी चालेल; पण दारू घेतलीच पाहिजे. बहुतेक लोक रेंदेर किंवा खारवी आहेत. माडांची सूर काढून तिच्यापासून दारू गाळण्याचं काम रेंदेर करतात आणि हे खारवी लोक समुद्रांत जाऊन मासळी मारतात. हे लोक चांगलं कमावतात; पण सगळं लगेच गमावून बसतात. तुमच्या या एका भाटांत चारपांचशें माडांचीं झाडें सुरीला दिलेलीं आहेत. तेथें सत्तर-ऐशीं माणसं हें काम सारखें दिवसरात्र करतात. पंचवीस-तीस दारूच्या भट्टया चालतात. एवढी दारू या वस्तींतच फस्त होते ! यावरून तुम्ही कल्पना करा. '

लीनेनें म्हाताऱ्याचें निरीक्षण केलें. त्याची शरीरयष्टि मजबूत होती. इतक्या म्हातारपणांतहि त्याच्या अंगीं विलक्षण हुशारी व जोम हीं दिसून येत होतीं. दारूच्या व्यसनाला तो बळी पडला नव्हता हें स्पष्ट दिसत होतें. तो गावत्यांपैकींच होता. आपला हा वाडा दारूच्या राक्षसापासून मुक्त व्हावा, म्हणून त्यानें आतांपर्यंत खूप खटपट केली होती. लोकांचीं भांडणें मिटविणें, शाळेची व्यवस्था पाहणें, गांवांत रोगराई शिरली तर बरोबर फिरून लोकांना रोगाची माहिती करून देणें व औषधोपचार सांगणें, इत्यादि कामें फावल्या वेळांत करण्याची त्याला संवय झाली होती.

पण, दारूचें उच्चाटन करण्याच्या प्रयत्नांत मात्र त्याला यश मिळालें नव्हतें. कारण पेरैरा, पोलीस, सरकार, हे सगळे दारूच्या पक्षाचे होते. यामुळें त्यानें कोणतीहि खटपट केली तरी ती निष्फळ होई.

सरकारनें एकदां सुरीच्या माडांवरील पट्टी वाढवली. त्यामुळें रेंदेर लोक बिथरले. या असंतोषाचा फायदा घेऊन सांवळ्यानें—त्या म्हाताऱ्यानें—वाड्या-वरच्या साऱ्या रेंदेरांकडून माड सोडण्याचें व दारू न गाळण्याचें अभिवचन घेतलें. पण खुद्द पेरैरा आपली मिळकत बुडते म्हणून पोलिसला सामील झाले. त्याचा परिणाम असा झाला कीं पोलिसांनीं संपवाल्यांना संप मोडायला बळीनें भाग पाडलें व सोडलेले माड पुन्हां करायला व दारू

गाळायला लावलें. यावेळेपासून त्यानें अशी खूणगांठ बांधली कीं आपल्या-सारखा गरीब अडाणी मनुष्य पेरैरासारख्या भाटकारांच्या सहाय्याशिवाय दारूच्या बाबतींत कोणतेंच कार्य करूं शकत नाहीं.

सांवळयाच्या तोंडून दारूबाजीची ही साद्यंत हकीकत लीनेला कळली तेव्हां गोमंतकांत बहुतेक लोक दारुडे कां बनले आहेत, या गोष्टीचा तिला उलगडा झाला. गरीब, श्रीमंत, सुशिक्षित, अशिक्षित, सगळे खिश्चन दारू पीत आहेत. इतकेंच नव्हे तर या व्यसनांत सुधारणेचें बीज आहे असेंहि ते मानीत आहेत. गोमंतक ही कल्पवृक्षांनीं समृद्ध अशी भूमि आहे. पण ती आज पुण्यभूमि राहिलेली नसून ती पापभूमि झालेली आहे. कारण, ज्या नारळींतून अमृत काढावयाचें त्या नारळींतून आज दररोज हजारों बाटल्या दारूसारखें विष निघत आहे. आणि त्याचा उपयोग लोक अन्नाप्रमाणें मोठ्या आवडीनें करीत आहेत. अशा रीतीनें जनता दिवसेंदिवस खंगत चालली आहे. तिला सुधारण्याचा उपाय आपल्या हातीं आहे काय ?

या प्रश्नाबरोबर तिचा जीव हैराण झाला. कारण आपल्यासारख्या माणसाची तिला असहाय्यता दिसून आली. गोमंतकाला हैराण करणारे रोग असे कितीतरी असतील, त्यांची आपल्याला वार्ताहि नाहीं...

पपांना सांगून निदान आपल्या भाटांत तरी दारूचें उच्चाटन करण्याचा प्रयत्न आपणाला करतां येईल काय ? असा आशेचा किरण तिच्या मनांत चमकला. पण वडिलांचा इतिहास तिच्या या अपेक्षेशीं विसंगत होता. त्यामुळें तिचें मन शंकाकुल झालें. तरीहि पपांचें मन वळविण्याचा प्रयत्न करण्याचें तिनें ठरविलें.

लीना व आल्बेर्त यांना स्वैर जलक्रीडा करतांना अशोकनें क्षणभरच पाहिलें. तो प्रसंग त्याला उद्वेगजनक वाटला. तिच्यासंबंधीं त्यानें ज्या गोड कल्पनांचें पोषण केलें होतें, त्यांचा एकाद्या स्वप्नसृष्टीप्रमाणें एकदम निरास

झाला. लीना सुंदर आहे; पण विलासी नाहीं. वैभवसंपन्न आहे; पण भोगासक्त नाहीं. पाश्चात्त्य संस्कृतीचें श्रेष्ठत्व तिनें आत्मसात् केलें आहे; पण त्या संस्कृतींतील उच्छृंखलपणा व उन्माद तिच्या वृत्तींत दिसून येत नाहींत. तिला ध्येयवादी जीवनाची ओढ लागलेली असून लोकसेवे-साठीं ती आसावलेली आहे, इत्यादि तिच्यासंबंधीं अनुकूल ग्रह अशोकनें करून घेतले होते, ते वरील प्रसंगामुळें नष्ट होतांच त्याला अतिशय दुःख झालेंच. परंतु आपल्या आयुष्यांतील एक गोड, नाजूक धागा तिच्या जीवनधाग्याशीं मिलाफ पावत होता, तो तिनें क्रूरपणानें तोडून टाकला असें वाटून तो अधिकच हैराण झाला. या निराशेच्या भरांतच तो त्या निसर्गसुंदर खोऱ्यांतून तिरिमिरीनें तसाच परतला.

रस्त्यावर येऊन मोटारींत बसतांना त्याचा उद्देश घरीं जाण्याचा होता. परंतु वाटेंत त्याला जें एक निसर्गदृश्य दिसलें त्यामुळें त्याचा बेत बदलला.

त्यानें चंद्रेश्वर पर्वतासंबंधीं पुष्कळ ऐकलें होतें. त्या बाजूनें प्रवास करतांना त्यानें पर्वतशिखरावर विराजमान झालेलें तें देऊळ दुरून पाहिलें होतें. आणि त्या देवळाभोंवतालची सुंदर नारळी व इतर वृक्षराजी पाहून त्याला त्या पर्वताचें दर्शन घेण्याची इच्छा कितीतरी वेळां झाली होती. परंतु तसा योग केव्हांच जुळून आला नव्हता. आतां मात्र त्यानें ठरवलें कीं आपल्या मनाला विरंगुळा पाडण्यासाठीं पर्वताच्या त्या उच्च व पवित्र वातावरणांत एक दिवस विहार करून यावें.

तो मोटारींतून उतरला आणि शेतांतून गेलेल्या एका मळलेल्या वाटेनें तो चालूं लागला.

आसपासच्या शेतांत पाणी खेळवलें होतें आणि तेथें नुकतेंच वांयगणाचें पीक लावलें होतें. तें बोटभर वाढलें होतें. त्याचा सौम्य पोपटी रंग पाण्याच्या चकचकीत सपाटीला खुलून दिसत होता. वाऱ्याची झुळुक

सुटली म्हणजे ती या कोंवळ्या गवतावर लाटा उठवून नाचतच जाई.

अशोक पर्वताच्या पायथ्याशीं पोंचला. तेव्हां जवळच त्याला एक लहानशी देवळी दिसून आली. तेथें नमस्कार करून त्यानें पर्वताच्या पायऱ्या चढायला सुरुवात केली.

पायऱ्या असंख्य होत्या. त्या चढत असतांना त्याचा जीव कासावीस होई. म्हणून त्यानें वाटेंत तीन चार ठिकाणीं विश्रांति घेतली. व दोन तासांच्या मार्गक्रमणानंतर तो पर्वतावरील लोकवस्तींत येऊन पोंचला.

बाहेर अकरा वाजले होते. पण तेथें अगदीं सकाळ दिसत होती. दोहोंबाजूंनीं उभ्या असलेल्या झाडींनें बाहेरच्या भव्य देखाव्यावर पडदा टाकला होता. आणि आकाशाचा परिघ अगदीं मर्यादित केला होता.

ती लहानशी वसती मात्र रम्य दिसत होती. उतरंडीवर सगळीं घरें होतीं. तीं इतकीं लहान व सुबक होतीं, कीं तीं जणूं काय एकाद्या कारागिरानें कार्डबोर्डचींच केलीं आहेत असें पाहणाऱ्याला वाटावें.

मध्यें एक पाषाणी कुंड होतें. तें स्वच्छ पाण्यानें भरलें होतें. नजीकच एक छोटा तलाव होता. त्याला लागूनच शाळेची चिमुकली इमारत होती. या सगळ्या दृश्यांत एक प्रकारचा रेखीवपणा होता. केळीनारळींच्या समृद्धीमुळें या स्थानाला पावित्र्याबरोबर शांति आणि सौंदर्य हीं प्राप्त झालीं होतीं.

अशोकनें कुंडाच्या कांठीं बराच वेळ विश्रांति घेतली. त्यांतलें पाणी प्राशन करून तो ताजातवाना झाला आणि मोठ्या उत्साहानें तो पर्वतशिखर चढूं लागला.

शेवटची पायरी चढून त्यानें दरवाजाच्या आंतील प्राकारांत प्रवेश केला. तेव्हां त्याच्या नजरेसमोर जो देखावा अकस्मात् उभा राहिला तो अक्षरशः अवर्णनीय होता.

शिखरावरील लहानशा सपाटीवर एक देऊळ होतें. हेंच चंद्रेश्वराचें

देऊळ. तें लहान व जुनें होतें. पण पर्वताच्या पायथ्याशीं उभें राहून वर नजर फेंकली म्हणजे तें देऊळ व पुढचा स्तंभ भव्य असल्याचा भास होई.

चंद्रेश्वराचें दर्शन घ्यावें, तें खालच्या सर्वव्यापी देखावा पाहण्यासाठीं, असें अशोकला वाटलें. आतांपर्यंत त्यानें जीं शेंकडों निसर्गदृश्यें पाहिलीं होतीं व आपल्या कथाकादंबऱ्यांतून चित्रित करण्याचा प्रयत्न केला होता, त्या सगळ्या दृश्यांची भव्योदात्त मांडणी पुढच्या देखाव्यांत सामावली होती, हें तर खरेंच; परंतु त्यानें केव्हांहि कल्पिलें नव्हतें असें वैभव तेथें मुक्तहस्तानें परमेश्वरानें उधळलें होतें.

दैवी भांडाराच्या या तेजस्वी पसाऱ्यांत कोणती वस्तु मोलाची नाहीं? असा अशोकला प्रश्न पडला. उजव्या बाजूला त्यानें नजर वळवली तेव्हां ती कोठें स्थिर करावी तें समजेना, इतका तो भांबावून गेला. लहान बालकाच्या पुढें शें-शंभर रंगीबेरंगी खेळणीं एकाच वेळीं टाकलीं म्हणजे त्याची जी आश्चर्ययुक्त गोंधळाची स्थिति होते, त्या स्थितींत तो आतां पडला.

त्यानें क्षितिजाकडे पाहिलें. तें सागराच्या विस्तीर्ण गोलाकार सपाटीला भिडलें होतें. तेथें कललेल्या सूर्याचें प्रतिबिंब लांबच लांब पट्टयाच्या रूपानें जलपृष्ठावर पसरलें होतें. तें इतकें विविध व तेजस्वी होतें कीं त्यांत चमकणाऱ्या अगणित रंगांचा प्रभाव माणसाच्या दृष्टीला सहन करवत नव्हता. शेंकडों मैल परिघाच्या प्रदेशांत नाना नद्या, वळणावळणांनीं, उभ्या आडव्या दाहीदिशांनीं, जणूं काय झोंपल्या होत्या आणि उन्हांत चमकणाऱ्या असंख्य जिवाणूंप्रमाणें भासत होत्या. त्यांच्यामध्यें नारळीच्या विस्तीर्ण राया पसरल्या होत्या. त्यांचे झुबके कोणत्या तरी कारागिरानें जमिनीवर मांडून ठेवल्याप्रमाणें वाटत होते. इतर प्रदेश वांयगणांनीं व्यापून टाकला होता आणि त्यांचे अगणित चौकोन त्यांतील पाण्याच्या थरामुळें व गोजिरवाण्या शेतांमुळें चमकतांना दिसत होते. या नद्या, या नारळी, शेतें, यांच्यामधून लहान मोठे असंख्य डोंगर

पहुडले होते. त्यांचे पृष्ठभाग इतके जीवंत दिसत होते कीं जणूं काय अजस्र हरीणें आपल्या भूमातेच्या अंकावर लडिवाळपणानें झोंपीं गेलीं आहेत. आणि त्यांच्या उबदार, लवाळ पाठी श्वासोच्छ्वासानें जणूं काय वर खालीं होत आहेत.

देवळाच्या डाव्या बाजूला येऊन अशोकनें खालीं दृष्टिक्षेप केला. तेथेंहि तोच उदात्त देखावा. पण किती वेगळा ! त्याला आतां असें वाटूं लागलें कीं जें आपण घटकेपूर्वी पाहिलें तें आतां विसरलों. अर्ध्या तासाच्या प्रयत्नानंतर जें आपण मस्तकांत सांठवून घेतलें होतें आणि ज्याचें स्पष्ट चित्र कोरलें होतें, तें आतां धूसर झालें. या नवीन देखाव्याच्या विविधतेमुळें पुसट झालें. आपण खालीं उतरूं लागणार तेव्हां या दोन्ही चित्रांपैकीं कोणतेंच आपल्या मनावर कायम राहणार नाहीं, इतकीं तीं दोन्हीं अद्‌भुत आहेत. त्यांचे परिणाम मात्र कधींच पुसले जाणार नाहींत.

या बाजूला डोंगराच्या रांगा एकीमागून एक अशा उंचावत गेल्या होत्या आणि मौज अशी कीं त्या सगळ्या डोंगरांवर वृक्षराजी गर्द माजली होती. कमी अधिक अंतरामुळें त्या वनराजीचे रंग विविध दिसत होते. त्यांच्या विविध छटांचें नामकरण करणें अशक्य होतें. जवळचे डोंगर एकाद्या वस्त्रावर लोकरीनें काढलेल्या कशिद्याप्रमाणें वाटत. व शेवटच्या ओळीचे पर्वत क्षितिजाच्या धूसर रंगांत विलीन झाले होते. तरीहि त्यांची सीमारेषा अस्पष्टपणें दिसत होतीच.

पृथ्वीच्या अंशमात्र भागाचा हा व्यापकपणा आणि त्यांतील निसर्गाचें हें उदात्त व सुरम्य दर्शन यांचा अशोकच्या मनावर इतका परिणाम झाला कीं आपल्या आयुष्यांत क्रांति घडवून आणणारी एक घटना आज घडत आहे असें त्याला वाटलें. जीवितांतील लहान लहान प्रसंगांकडे मोठ्या गंभीर दृष्टीनें पाहण्याची जी माणसांची वृत्ति असते ती किती हीन व

पोरकट आहे, याची त्याला पहिल्यांदा जाणीव झाली. आणि या नव्या प्रकाशांत त्याला लीनेचें शेवटचें वर्तन, आपण त्याला दिलेलें महत्त्व या गोष्टी किती तरी क्षुल्लक वाटल्या. आपलें आयुष्य हें पुढच्या देखाव्या-प्रमाणें व्यापक व गूढरम्य आहे; लीनेच्या अप्रिय कृत्यानें हताश होऊन जीवनाकडे पाहण्याची दृष्टि का आपण बदलणार? आपल्या जीवनांतील प्रणयाचा प्रवाह प्रबळ असला, तर तो आपली वाट काढीत पुढें जाणार व आपल्या सर्व शक्तींना तो पूरक व पोषक असाच तो ठरणार. क्षुल्लक गोष्टी-साठीं कशाला आपण रडत बसायचें ?...

उत्साहाचा नवा झरा त्याच्या हृदयांत वाहूं लागला. आणि मनाच्या प्रसन्नतेंत त्याला आपल्या भावि योजना, सुखस्वप्नें, ध्येयें, त्याला किती तरी आशादायक दिसूं लागलीं.

जवळजवळ दोन तास त्यानें या दर्शनांत घालवले. शेवटीं सूर्यबिंब तांबडसर, केशरी झालें. त्याच्या सहस्ररंगी छटा पश्चिम प्रदेशावर ऐसपैस उठून तेथें आश्चर्यकारक आकृतींचीं शोभादायक दृश्यें तयार झालीं. तेव्हां अशोकनें आपलें मन आवरलें. व ज्या कपारीवर तो बसला होता तेथून तो खालीं उतरला.

पण अकस्मात् त्याची नजर एका तरुण स्त्रीच्या आकृतीवर पडली आणि तो या प्रसंगांतील चमत्कृतीमुळें, रम्यतेमुळें, चमकून जागच्या जागीं स्तब्ध झाला.

# १६

आठदहा हातांच्या अंतरावर ती तरुणी बसली होती. आणि तिच्या मांडीवर एक शुभ्र छानदार गुबगुबीत कुत्रें बसलें होतें.

अशोक केवढ्या पावित्र्यानें समोरच्या निसर्गदृश्याची आपल्या मनांत सांठवण करून ठेवूं पहात होता! त्या तरुणीवर नजर पडतांच त्याला असें वाटलें कीं सृष्टीचें जें भव्य दर्शन आपल्याला नुकतेंच घडलेलें आहे त्याला गौणत्व आणणारें हें अन्य सौंदर्य.

तिनें त्याच्याकडे तिरप्या नजरेनें पाहिलें. आणि कुत्र्याला खांद्यावर घेऊन हातानें थोपटीत आणि लगेच अशोककडे मान वळवून पण आपली नजर आकाशाकडे लागली असल्याचा भास निर्माण करून ती अहेतुकपणें हंसली.

ती मुलगी कोणीहि असली तरी एक गोष्ट स्पष्ट होती. ती अप्रातिम आकर्षक होती. अवयवांचा रेखीवपणा तिच्यापाशीं नव्हता. त्यामुळें तिला सुंदर म्हणतां आलें असतें कीं नाहीं याची शंका आहे. पण तिच्या चेहऱ्यावरील प्रत्येक अवयवांत जें व्यंग होतें तें नाहींसें झालें असतें तर ती इतकी आकर्षक दिसली नसती असें अशोकला वाटलें. कांहीं माणसांचीं व्यंगेंच आकर्षक असतात. तसेंच तिचें होतें. तिच्या मोठाल्या डोळ्यां-खालचीं हाडें उंच दिसत होतीं. पण त्यामुळेंच तिच्या गालांना सुढाळ-

पणा प्राप्त झाला होता व तिची हनुवटी गोड रीतीनें वळली होती. जिवणीचे दोन्ही कोपरे प्रमाणबद्ध नव्हते. उजवा कोपरा डाव्याच्या मानानें किंचित् खालीं होता. पण तिच्या ओंठावर जी गोड जादू होती ती क्षणाक्षणाला तिच्या स्मितांतून व्यक्त होत असे. आणि तिच्या शब्दांतून ती इतरांच्या हृदयांना प्रतीत होत असे. तिच्या अवयवांतील या मोहिनीपेक्षांहि अधिक आकर्षक असें कांहीं तिच्यापाशीं होतें. तें आकर्षण म्हणजे तिच्या हालचालींतील, हावभावांतील तरलपणा, नाजुकपणा, स्वाभाविकपणा. या वैशिष्ट्यांमुळें ती इतकी चंचल दिसे कीं पहाणाऱ्याची इच्छा असली नसली, तरी त्याचें मन तिच्यावर स्थिर झाल्याशिवाय राहत नसे.

आपल्या कुत्र्यावर नुसता हात फिरवतांना, त्याचें तोंड कुरवाळतांना आणि त्याला चुंबन देण्याचा आव आणतांना तिच्या चेहऱ्यावर जे विविध सूक्ष्म भाव पसरले आणि तिच्या अवयवांचें जें नाजूक कंपन झालें त्याचा परिणाम एवढा झाला कीं तो निर्हेतुकपणानें केवळ कलात्म उत्सुकतेनें तिच्याकडे पहातच राहिला.

तिच्या हातांतून कुत्रा निसटला. हें पाहून तिनें त्याला बोलावण्याची ऐट केली. ती फिरून हंसली.

कुत्र्यानें अशोककडे धांव घेतली. त्यानें आपले हात पसरून कुत्र्याचें स्वागत केलें. मोठ्या आनंदानें मुरडत मुरडत तो त्याच्यापाशीं गेला. अशोकनें पिशवींतून पाव काढून त्याच्यापुढें टाकला. तो तोंडांत पकडून त्यानें धनिणीकडे पाहिलें.

'आमचा कुत्रा चावत नाहीं ...' तिनें अशोककडे तिरप्या नजरेनें पहात, कारण नसतांना, म्हटलें.

'तें तर दिसतंच आहे. फार सुंदर आहे!... ' अशोकनें कुत्र्याची स्तुति केली.

'तुम्हांला कुत्र्यांचा नाद आहे वाटतं ?' तिनें संभाषण पुढें चालू ठेवण्याच्या हेतूनें म्हटलें.

'हो. अन् मांजरांचाहि' त्यानें मिस्किल हास्य करीत उत्तर केलें.

एरवीं गंभीर दिसणारा त्याचा चेहरा आतां बालिश भावांनीं खुलला. तरुण स्त्रीच्या सहवासांत तो आला म्हणजे त्याचें स्वाभाविक गांभीर्य नष्ट होई आणि तो अगदीं खेळकर व आनंदी होई. एक प्रकारच्या आंतरिक ओढीनेंच तो स्त्रियांकडे आकर्षित होई. आणि या आकर्षणामुळेंच त्याचा सहवास त्यांना प्रिय होई.

'मग तुमची आमची जात एक म्हणायची.' तिनें संभाषणाला खेळकर वळण देत म्हटलें.

'ही गोष्ट आनंदाची आहे. पण आमच्या व्यवहारांतल्या जाती वेग-वेगळ्या असतात ना ? त्यांचं जुळलं पाहिजे !'

'व्यवहारांतला जातिभेद तुम्ही मानतां !'

'माझ्या एकट्याच्या इच्छेवर का व्यवहार अवलंबून आहे ? मी स्वतः विश्वबंधुत्वाचा पुरस्कर्ता आहें. सगळे मानव आपले बंधु आहेत, हें माझें तत्त्व आहे.'

'अन् स्त्रिया आपल्या भगिनी आहेत. असंच ना ?' तिनें प्रश्न केला.

'व्यासपीठावर उभे राहून वक्ते असेंच बोलतात.' अशोक म्हणाला.

'अन् तुम्ही नाहीं बोलत ?'

'मी वक्ता कुठं आहें ?'

'नुसते लेखकच वाटतं ?' तिनें पृच्छा केली.

अशोक थक्कच झाला. न विचारतां, न सांगतां ही अज्ञात तरुणी आपल्या पेशासंबंधीं माहिती सांगूं शकते याचें त्याला पहिल्याप्रथम आश्चर्य वाटलें.

‘ तुमचा धंदा जादूचा वाटतं ? ’ अशोकनें हसत हसत चेष्टेच्या स्वरांत विचारलें.

‘ तुम्ही बरोबर कसं ताडलंत ? ’ ती देखील चेष्टा करायला कमी नव्हती.

‘ तुमच्या डोळयांवरून. ’ अशोकनें सस्मित उत्तर केलें.

‘ माझ्या डोळयांवरून तुम्हांला आणखी काय काय कळलं तें सांगा पाहूं. ’ प्रत्येक शब्दाच्या उच्चाराबरोबर तिच्या चेहऱ्याचे, हाताचे, मानेचे जे हावभाव होत, ते इतके गोड व स्वाभाविक होते कीं अशोक क्षणभर त्यांचेंच निरीक्षण करीत राही.

‘ आमच्यासारख्यांशीं ओळख करण्याचं साधन म्हणून तुम्हीं हें कुत्रं बाळगलं आहे, हें खरं ना ? ’ अशोकचा स्वर आतां सलगीचा झाला. कुणालाहि असें वाटावें कीं त्या दोघांची जुनी दोस्ती आहे.

‘ छान प्रश्न केलात. पण आधीं मला एक सांगाल ? तुम्ही घरीं मांजरं बाळगलीं आहेत, त्यांचा उपयोग तुम्हांला असाच होत असेल ना ? ’

दोघेंहि मनापासून हंसलीं. कुत्रा पाव खाण्यांत गर्क झाला होता.

थोडा वेळ निस्तब्धतेंत गेला. सूर्यकिरण आतां लुप्त झाले होते. वारा जोरानें वाहत होता. समोरचीं दृश्यें अंधारांत हळूहळू बुडत होतीं.

‘ चला, आपण आतां खालीं जाऊं. ’ तिनें अशोकला विनंति केली अन् ती उठली.

तिच्या देहाकडे आपादमस्तक पहात अशोकनें विचारलें, ‘ एखाद्या भटजीचं घर जवळपास असेल का ? तिथंच मला उतरलं पाहिजे.’

‘ पाहिलंत, तुम्ही व्यवहारांत जातपात कशी मानतां तें ? ’ तिनें टोमणा मारला.

अशोकनें उठतां उठतां म्हटलें, ‘ चला, मी येतों तुमच्याबरोबर.’

अशोकला एक नवीन अनुभव घ्यायचा होता. ही आपली नवीन ओळख कुठल्या थराला जाते तें त्याला पहायचें होतें.

दोघेंहि वाड्यावर आलीं. ती एका टुमदार बंगल्यांत शिरली आणि अशोकला आंत येण्याचा आग्रह करीत म्हणली, ' आमचं घर भटजीचं नाहीं... '

' थोडा वेळ बसायला कांहीं हरकत नाहीं. ' इतकें म्हणून तो तिच्या मागोमाग आंत गेला.

अशोक तिच्या मार्दवानें भारला गेला. ती बोलत होती तेव्हां तिच्या तोंडांतून शब्द येत नव्हते, तर मार्दवच जणूं स्रवत होतें असें त्याला वाटलें. तिच्या डोळ्यांतील हंसरी चमक आणि हृदयाच्या सौजन्यांतून आलेलें व तिच्या दंतपंक्तींतून बाहेर सुटतांना विलक्षण आकर्षणाचें वस्त्र लेऊन चमकणारें तिचें हास्य या दोन गोष्टींमुळेंच तो तिच्यावर इतक्या थोड्या अवधींत लुब्ध झाला होता. आणि म्हणूनच तिच्या सहवासांत चार घटका घालवाव्या असें त्याला वाटत होतें.

' आपले कपडे उतरा आधीं. ' तिनें म्हटलें.

' आधीं बसतों. पुढचं नंतर पाहातां येईल. '

तो बसला. ती लगबगीनें आंत गेली. आणि तिनें आपल्या आईला चहा तयार करायला सांगितला.

कुत्रा त्याच्याशीं लाडीगोडी करूं लागला.

' तुम्ही इथंच राहातां ? ' अशोकनें विचारलें. त्याला ज्याविषयीं शंका आली होती त्या बाबतींत त्याला अधिक माहिती हवी होती.

' इथं राहून आम्ही चंद्रेश्वराची सेवा करतों. ' तिच्या उत्तरानें अशोकच्या शंकेचें निरसन झालें.

' अन् लोकांचीहि. नाहीं का ? '

' देव आणि लोक निराळे नाहींतच मुळीं. '

हें तत्त्वज्ञान कुठं शिकलांत ?'

तुमच्यासारख्याच्या सहवासांत.' ती हजरजबाबी होती.

चहा आला. तिनें अशोकपुढें कप केला.

देवाची सेवा करणाऱ्या स्त्रियांवर लोकांची सेवा करण्याचें बंधन एका काळीं समाजानें घातलें होतें. तें बंधन परंपरेनें अजून चुकून राहिलें आहे. इत्यादि विचार अशोकच्या मनांत येऊं लागले.

'तुम्ही कथा-कादंबऱ्या लिहितां ? समाजसुधारणा करतां ?...' तिचा स्वर अकस्मात् गंभीर झाला.

'हं.' अशोकनें एवढेंच उत्तर केलें.

'तुम्हांला वेश्यांवर गोष्टी लिहिण्याचा फार नाद आहे. नाहीं का ?'

अशोक स्तब्ध राहिला.

ती बोलूं लागली, 'वेश्यांबद्दल कळवळा उत्पन्न करण्यासारखं लेखन तुम्हीं पुष्कळ केलं आहे, हें मला माहित आहे.'

ती थोडा वेळ थांबली. नंतर तिनें म्हटलें, 'पण दयाबुद्धीनं आमचा प्रश्न सुटेल असं तुम्हांला वाटतं ? वाचकांच्या हृदयाला पाझर फोडल्यानं कांहीं प्राप्ति होईल असं तुमचं मत आहे ?' तिनें प्रश्नांचा मारा सुरू केला.

'वेश्याव्यवसाय हें समाजाचें लांछन आहे. अन् तरीहि तें टिकविण्याची तुम्ही धडपड करतां.'

'असं कसं म्हणतां तुम्ही ?'

'आमचा प्रश्न आर्थिक आहे. नैतिक नाहीं. आमच्यांतील पुरुषवर्गाच्या चरितार्थाची सोय झाली तर वेश्याव्यवसाय राहणार नाहीं हें तुम्ही निश्चित समजा.' इतकं बोलून तिनें संभाषणाचा विषय पालटला.

अशोकच्या मनांत मात्र हा प्रश्न व्यापक व गंभीर स्वरूपांत उभा राहिला. गोमंतकांतील बराच मोठा स्त्रीवर्ग व्यक्तिस्वातंत्र्याला मुकेलेला आहे असें त्याला वाटलें व तो चिंताक्रांत झाला.

'तुम्ही आतां काळजी केल्यानं आमचा प्रश्न सुटेल असं नाहीं. तुम्ही आतां मघांच्याप्रमाणं आनंदी व्हा पाहूं.' तिनें आपल्या स्वाभाविक सहजतेनें व खेळकरपणानें म्हटलें.

पण अशोकचा आनंद भंग पावला होता. वेश्यावर्गाचा सामुदायिक उद्धार हा गोमंतकाच्या जिव्हाळ्याच्या अनेक प्रश्नांपैकीं एक प्रश्न आहे अशी खूणगांठ त्यानें मनाशीं बांधली.

अशोकला त्या तरुणीच्या मनोवृत्तीचें आश्चर्य वाटलें. किती गोड भाषेंत तिनें हास्यविनोद केला होता ! पण तिच्या हृदयांत मात्र एक शल्य वसत होतें तें तिनें बोलून दाखवलें होतें. ती सर्वस्वीं सुखी नव्हती. सुखाच्या आवरणाखालीं दुःख धगधगत होतें. तें इतरांना दिसत नव्हतें. तिच्या दैनंदिन आयुष्यक्रमांत तिलाच त्याची जाणीव नव्हती. त्याची उजळणी तिनें केली असती तर तिला पोटाला मरावें लागलें असतें.

अशोकला वाटलें, समाजाच्या नीतिमत्तेच्या कल्पना किती फोल व पोकळ आहेत! आयुष्याचें तत्त्वज्ञान कालिकेला—त्या तरुणीला—चांगलें समजलें आहे.

ती जन्माला आली. तिच्यावर हें जीवन लादलें गेलें. त्याचा तिनें स्वीकार केला. त्यांतच तिनें आनंद मानला. हा मानीव आनंद तिच्या मनांतून, अवयवांतून, नाचत आहे. पण तिचें जीवन ध्येयपूर्ततेसाठीं आसावलेलें आहे.

रात्र झाली. कलिकेच्या आग्रहाला मान दिला तर तिच्या सौंदर्याला आपण बळी पडूं ही त्याला भीति वाटली. ही भीति दुबळेपणाची आहे हें त्याला कळत होतें; पण जें ध्येयाचें आयुष्य आपण पत्करीत आहों त्याच्याशीं विसंगत होईल असें वर्तन न करण्याची त्याची धडपड असे. या धडपडींतून तो नेहमींच यशस्वी होई असें नाहीं. त्याच्या मनाचा एकदां निश्चय झाला म्हणजे कोणताच मोह त्याला अडवूं शकत नसे.

अशोकनें दुसरीकडे उतरण्याचा आपला हेतू कलिकेला सांगितला तेव्हां तिला फार वाईट वाटलें. दोन तासांच्या अवधींत तिनें त्याला आकर्षित केलें होतें व त्यानें तिला जिंकलें होतें.

अशोकचा निश्चय कळतांच तिचा चेहरा उदासीन झाला. एकाद्या गोड बालिकेनें रुसवा करावा, आणि त्यांतच तिच्या डोळ्यांत अश्रू चमकावे म्हणजे वडीलधाऱ्या माणसांना जसें वाटतें तसें अशोकला वाटलें. त्यानें आवेगानें तिला जवळ ओढली. तिचे दंड प्रेमभरानें दाबले व मान खालीं घालून कांहीं वेळ तो अशा स्थितींत स्तब्ध राहिला.

आणि मग मनाची सगळी ओढ मोठ्या निर्धारानें दाबून त्यानें कालिकेचा निरोप घेतला.

## १७

याच दिवसांत अन्नाच्या तुटवडयामुळें गोमंतकीय जनतेंत हाहाःकार उडाला होता. मोठमोठ्या व्यापाऱ्यांच्या व वर्तमानपत्रकारांच्या मागणीकडे दुर्लक्ष्य करून ब्रिटिश हिंदुस्थानांतून तांदुळाचा भरपूर पुरवठा करण्याची व्यवस्था सरकारनें केली नव्हती. इतकेंच नव्हे तर सरकारी परवानगी-शिवाय आयात करण्याची व्यापाऱ्यांना बंदी केली होती. ब्रह्मदेश जपानच्या हातांत गेल्याबरोबर हिंदुस्थानलाच तांदळाची टंचाई भासूं लागली. आणि ब्रिटिश सरकारनें येथें होणारी तांदळाची निर्यात बंद केली. याचा परिणाम असा झाला कीं गरीब-श्रीमंतांवर उपासमारीचा प्रसंग आला.

लोक मिळेल तें अन्न खाऊन गुजराण करूं लागले. पण तांदळाच्या अन्नाला सरावलेल्या लोकांना इतर आकस्मिक आहारामुळें निरनिराळे विकार होऊं लागले. आणि लोकांत अस्वस्थता व असंतोष माजला. सरकारनें आपल्या नेहमींच्या धोरणाप्रमाणें तिकडे दुर्लक्ष्य केलें. ब्रिटिश सरकारनें आपल्या हद्दींतून दर माणशीं तीस शेर बाहेर सोडण्याची व्यवस्था केली. तिचा फायदा घेऊन तांदळाची खरेदी करायला दर दिवशीं हजारों लोक बाहेर जाऊं लागले. अशाच वेळीं अशोकपुढें अन्नाचा प्रश्न दत्त म्हणून उभा राहिला.

पर्वतावरून तो घरीं आला तेव्हां त्याच्या दोघां चुलतभावांनीं पैशांची मागणी करून त्याला लिहिलेलीं पत्रें मिळालीं. एक चुलतभाऊ मडगांवला मॅट्रिक शिकत होता. व दुसरा पणजीला राहून लिसेवचा कोर्स पुरा करीत होता. दोघांनाहि फी व इतर खर्च मिळून दीडशें रुपये पाठविल्याशिवाय गत्यंतर नव्हतें.

संस्थेंतून तो मागेंच निघाला होता. नियमित उत्पन्नाची बाब अशा रीतीनें बंद झाली होती. लेखनावर त्याला कांहीं प्राप्ति होत असे; परंतु हें उत्पन्न एवढें नसे कीं त्याच्या संसाराचा सगळा खर्च त्यांतून निभावून जावा.

गेले दोन तीन महिने त्याची अशी ओढाताण चालली होती. तरीहि तो निराश झाला नव्हता. पण त्याच्या आर्थिक अडचणी वाढतच होत्या. त्याचा ध्येयवाद दांडगा होता. तो आपल्या लेखनांत रंगून जात असे. हें सगळें खरें असलें तरी व्यवहाराचे चटके त्याला बसूं लागले होते आणि आपल्या स्वप्नरंजनांत तो कितीहि रमला आणि लौकिक साधनांना त्यानें कितीहि क्षुल्लक लेखलें तरी संसाराचा प्रश्न त्याच्या नजरेपुढें अतिशय तीव्र स्वरूपांत उभा ठाकल्याशिवाय राहिला नाहीं. त्या वेळीं त्याला असें दिसून आलें कीं आपल्या वडिलांच्या विचारसरणींत जें सत्य होतें तें फार मोलाचें होतें. तें आकलन करायला आपण असमर्थ ठरलों. जगाकडे पहा-यची आपली दृष्टि सर्वस्वीं चुकीची होती. जगाचे बहुतेक व्यवहार आर्थिक हितसंबंधावर आधारलेले आहेत. ते केवळ नैतिक मूल्यांवर आधारलेले नाहींत. ढोंग, असूया, असत्य, स्वार्थ, यांचा तिरस्कार करून ज्यानें त्यागी जीवन पत्करलें त्यानें राक्षसी व्यवहाराला बळी पडलेंच पाहिजे, ही प्रतीति त्याला हळूहळू येत होती. आणि आतां तर ती एवढी तीव्र होती कीं तो हतबुद्धच झाला.

भावांना मदत पाठविल्याशिवाय गत्यंतर नव्हतें. चरितार्थाचा प्रश्न तर अतिशय नाजूक झाला होता. तांदूळ अतिशय महाग झाला होता.

त्याचप्रमाणें तो दुर्मिळहि झाला होता. तो हद्दीबाहेर जाऊन आणण्याची व्यवस्था न केली तर उपाशी मरण्याची पाळी येईल हें निश्चित होतें. त्याच्या काकीनें ज्या वेळीं ही भीति त्याच्या कानांवर घातली त्या वेळीं तो विचारांत पडला. कांहीं झालें तरी तीनचारशें रुपये त्याला हस्तगत करणें प्राप्त होतें.

त्याच्या स्वाभिमानाला त्या वेळीं पहिला धक्का बसला. सगळ्या मोहांचा प्रतिकार करून त्यानें आपली वृत्ति निर्भय बनवली होती. उंच मान करून व छाती ताठ करून जगापुढें फिरण्याइतका त्यानें आत्मविश्वास निर्माण केला होता. तत्त्वनिष्ठेच्या प्रखरतेमुळें आपल्या मित्रमंडळींच्या मनांत त्यानें आपल्याबद्दल आदर उत्पन्न केला होता.

पण आतां त्याला असें दिसून आलें कीं प्रबल व्यवहारापुढें आपणाला दीन व्हावें लागत आहे. लोकांपाशीं आपल्याला पैशाची याचना करावी लागत आहे. आपल्या मोठेपणाचा पाया ठिसूळ नाहीं ना ? असाहि त्याला प्रश्न पडला. नोकरीचा, वैभवाचा, मोह आपण जिंकला; व्यक्तिनिष्ठ गुणांचा आपण विकास केला. उदात्त तत्त्वांच्या वातावरणांत आपण व्यक्तित्वाचें वर्धन केलें. हें आपण सगळें केलें खरें; परंतु जगण्यासाठीं आपल्याला भीक मागण्याची लाचारी पत्करावी लागणार. अशा स्थितींत आपल्याला सगळें आयुष्य कंठावें लागलें तर आपली तत्त्वनिष्ठा अशीच टिकेल का ? लोकांच्या दृष्टीनें आपली भूमिका सदोष शंकास्पद राहाणार नाहीं का ? आणि हळूहळू दैन्याच्या व याचनेच्या मार्गानें जातां जातां आपल्या उज्ज्वल ध्येयवादाचा कपाळमोक्ष शेवटीं अंधारांत होणार नाहीं का ?

आतां काय करायचें ? हाच प्रश्न त्याला सतावूं लागला. सरकारी नोकरी पत्करायची का ? जें वडिलांनीं सांगितलें पण ज्याचा पंधरा वर्षांपूर्वी आपण बेदरकारपणें धिक्कार केला, तेंच आतां करायचें काय ? हजारों सरकारी नोकर जें दास्याचें जीवन कंठीत असतात तेंच जीवन शेवटीं

पराजित होऊन आपण स्वीकारायचें काय ? आयुष्यांतील उच्च मूल्यें लाथाडायचीं ? सरकारी सत्तेच्या गुणानुवादाला आपण आपल्या स्वराची साथ द्यायची ? जी जुलूमजबरदस्ती चारी बाजूंनीं चाललेली आपण पाहतों ती निर्वेध करण्यासाठीं आपण आपल्या व्यक्तित्वाचा होम करायचा ? आपलें भवितव्य घडवण्याची प्रतिज्ञा करून आपण आयुष्याला वीराप्रमाणें सुरुवात केली. त्या प्रतिज्ञेचा भंग करून आपण पोटासाठीं सगळ्या आशाआकांक्षा विकृत करायच्या, दडपून टाकायच्या, हें आपल्याला शक्य नाहीं. नोकरीचें जिणें पत्करलें तर आपल्याला कांहींच करतां येणार नाहीं.

त्याला वडिलांच्या उपदेशाची आठवण झाली. नोकरीशिवाय आपल्या कर्तृत्वाला येथें वाव नाहीं. मध्यमवर्गीयांना सरकारी नोकरी हेंच मानाचें, सत्तेचें, एकमेव साधन झालें आहे हेंच खरें. सरकारी नोकरीचा तिटकारा होता म्हणून आपण संस्थेची नोकरी पत्करली. आपल्या त्यागाला किंमत देणारीं माणसें कुठें आहेत ?

शेवटीं त्यानें ठरवलें कीं आजची गरज भागवण्यासाठीं आपल्या एकाद्या मित्राकडे हात पसरावा. हें काम करणें त्याच्या जिवावर आलें. पण त्यानें असा विचार केला कीं जीवन हा एक झगडा आहे हें जर खरें, तर आपल्याला त्रास सोसावे लागतील ते आपण आनंदानें सोसायला नकोत का ? लटका स्वाभिमान आपण गुंडाळून ठेवला पाहिजे. ध्येयवाद, तत्त्वनिष्ठा, यांविषयीं दृष्टि अधिक व्यापक व मूलगामी केली पाहिजे. आपला ध्येयवाद विचारांच्या क्षेत्रांत जोंवर वावरला तोंवर आपण तो कसोटीनें टिकवला. परंतु व्यवहाराच्या घडामोडींत शिरून देखील आपण तो टिकवला पाहिजे. हालअपेष्टा काढूनहि आपल्या तत्त्वांना आपण चिकटून राहिलों, तरच आपल्या हातून समाजकार्य होण्याची आशा आहे. आपण रुळलेल्या मार्गांनीं सत्ता व वैभव मिळविलें तरी तें आपल्या स्वभावाला रुचणार नाहीं. ठराविक चाकोरी वाईट

म्हणून आपल्याला नवा मार्ग चोखाळावयाचा आहे. मग त्यासाठीं कोणत्याहि दिव्याला तयार व्हायला नको का ? आपल्या ध्येयासाठीं आपणाला जिवंत रहायचें आहे. मग हें जीवन कष्टाचें, मानहानीचें होईल म्हणून रडत कां बसायचें ?

सदाशिव हा त्याचा जीवश्च मित्र होता. निदान तो तसें समजत होता. यापूर्वी अशोकनें त्याच्याकडे कसलीच याचना केली नव्हती. तो आपल्याला नकार देणार नाहीं अशी त्याची खात्री होती.

अशोक त्याच्या घरीं गेला. नेहमींप्रमाणें त्यांच्या गप्पागोष्टी सुरू झाल्या. जगांतील घडामोडी, साहित्यचर्चा, समाजकारण, इत्यादि नाना विषयांवर नेहमींप्रमाणें त्यांचीं बोलणीं झालीं.

पण अशोकचें लक्ष्य संभाषणाकडे नव्हतें. त्याच्या भाषणांत नेहमींचा मोकळेपणा नव्हता. त्याच्या वृत्तींत आज अकस्मात् भित्रेपणा, आकुंचितपणा शिरला होता. काय मागायचें, कोणत्या शब्दांत मागायचें, हें मनांत निश्चित करतांना देखील त्याच्या मनाचा गोंधळ उडाला होता. गुन्हेगाराची मनोवृत्ति कशी असेल, याची आतां त्याला जाणीव झाली. शब्द तोंडाशीं येत आणि मागें परतत. तो स्वतःला निर्भय समजत असे. आज त्याला कळून आलें कीं आपली निर्भयता ही तत्त्वांच्या क्षेत्रांतली आहे. व्यवहारांतल्या क्षेत्रांत आपण तितकेच भित्रे आहोंत. दारिद्र्यांत राहून शांतीनें, सचोटीनें, नेकीनें, संसाराचें गाडें पुढें ओढणारीं क्षुल्लक माणसेंच खरीं निर्भय आहेत. आपण त्यांना तसें समजत नाहीं हा आपला दोष आहे. त्यांची लायकी आपल्यापेक्षां कांहींच कमी नाहीं...

परंतु, असा विचार कुठवर करीत बसणार ? शेवटीं त्यानें मनाचा निश्चय केला व ओशाळल्यागत मुद्रा करून हळूच म्हटलें:

' सदाशिव, तूं आज माझं एक काम केलं पाहिजेस. '

सदाशिवाची कल्पना अशी कीं काम दुसरें कसलें तरी असेल. म्हणून त्यानें मोठ्या तत्परतेनें म्हटलें, ‘ अवश्य. सांग पाहूं तुझं कोणतं काम तें. ’

अशोक घुटमळला, चाचरला, आणि चार मिनिटें सदाशिवाच्या तोंडाकडे, परत जमिनीकडे व आळीपाळीनें दोहोंकडे पहात त्यानें म्हटलें, ‘ मला आज पांचशें रुपयांची गरज आहे. ’

सदाशिवाची मुद्रा आश्चर्यचकित झाली. त्याच्या दृष्टीनें ही मागणी अनपेक्षित होती.

थोडा वेळ तो विचारांत पडला. आणि मग त्यानें उत्तर केलें:

‘ तुला नकार देणं माझ्या जिवावर येतं; पण निरुपाय आहे. पांचशें सोड, पण पांच रुपये देखील आज माझ्याकडे नाहींत. ’

अशोकला अधिक बोलतां येईना. त्याला पक्कें माहित होतें कीं सदाशिव श्रीमंत आहे. पांचशें नव्हें, पांच हजार रुपये, इच्छा असली तर तो मिळवून देऊं शकेल......

सदाशिवाला आपली मैत्री करमणुकीसाठीं हवी आहे, आपला कंटाळा घालवण्यासाठीं त्याला आपली सोबत हवी आहे, आपल्यासारखा सार्वजनिक कार्यकर्ता, प्रभावी लेखक आपला मित्र आहे हें लोकांना भासवण्यासाठीं त्याला आपला स्नेह पाहिजे आहे, पैशांच्या व्यवहारासाठीं त्याचे स्नेही वेगळे आहेत. ते आपल्यासारखे भिकारी नाहींत....

अशोक जड अंतःकरणानें घरीं परतला. जगाचें खरें स्वरूप त्याला नुकतेंच कुठें दिसून येऊं लागलें होतें.

त्यानें घरांत पाय ठेवला.

चुलतभावांना उद्यां रजिस्टरनें पैसे पाठवले पाहिजेत. तांदळांचा पुरवठा करण्यासाठीं पैसे पाहिजेत...

तो खोलींत आला. मेजावर एक रजिस्टर पत्र होतें. तें त्यानें उचललें. लखोट्यावर ठळक अक्षरांत लिहिलेला ५०० रुपयांचा आंकडा त्यानें वाचला आणि त्याला आश्चर्याचा धक्का बसला.

# १८

पाकिटांत शंभर शंभर रुपयांच्या पांच नोटा होत्या. सोबत पत्र नव्हतें. पण रक्कम वडिलांकडूनच आली होती यांत शंका नव्हती.

तात्यांच्या स्वभावाची एकच बाजू त्याच्या विशेष परिचयाची होती. त्याच्या आयुष्याबद्दल ते पूर्ण औदासिन्य दाखवीत असत, एवढेंच त्याला माहीत होतें. आणि म्हणूनच त्याला ही आकस्मिक मदत पाहून जितकें आश्चर्य वाटलें तितकाच आनंद, त्यांना आपल्याबद्दल केवढी कळकळ वाटते हें पाहून झाला.

आपण संस्थेंत काम करून पोटाला कांहीं मिळवीत होतों, तोंवर त्यांनीं आपली चवकशी केली नाहीं. परंतु आपण संस्थेंतून बाहेर पडलों असें त्यांना कळलें तेव्हां त्यांनीं आपला निश्चय बाजूला सारून, ही मदत पाठवली.

त्यांच्या वर्तनांत एक प्रकारचें सूत्र आहे असें आपल्याला शेवटच्या खेपेलाच वाटलें होतें. आपण समजत होतों त्याप्रमाणें ते भावनाशून्य नाहींत. ज्या औदार्यानें त्यांनीं आपल्याला लहानपणीं कर्तृत्वाचें स्वातंत्र्य दिलें तेंच औदार्य त्यांच्या बाह्य औदासिन्याच्या मुळाशीं होतें. या औदासिन्याचा अर्थ आपण विपरीत करून घेतला. त्यांच्या बाबतींत आपल्या हातून अन्याय घडला...

संकटाच्या वेळीं आपल्याला गुपचुप आधार देणारी एक व्यक्ति जगांत आहे हा विचार त्याला फारच उत्साहवर्धक वाटला. या आनंदाच्या भरांत त्यानें दोन्ही भावांना ताबडतोब पैसे पाठवले. आणि तांदुळ आणण्यासाठीं त्यानें ब्रिटिश हद्द गांठण्याचा निश्चय केला.

त्याचें मन आतां कितीतरी मोकळें झालें. त्यानें हिरेला हांक मारली. तिनें तत्परतेनें 'ओ' दिली व धांवतच खोलींत आली.

आज कितीतरी दिवसांपासून एक नवीन गोष्ट तिच्या अनुभवास आली होती. पूर्वीं तिच्याशीं अशोक खेळीमेळीनें, प्रेमानें बोलत असे. तिला फिरायला घेऊन जाई. तिच्याशीं खेळत बसे. तिला चमत्कृतिपूर्ण कहाण्या सांगत बसे. हें सारें आतां त्यानें सोडलें होतें. तो तिची विचारपूस करी; पण त्यांत जिव्हाळा, कळकळ नव्हती, असें तिला दिसून आलें होतें. कुत्र्यामांजरांचीदेखील त्यानें या दिवसांत चौकशी केली नव्हती.

हल्लीं तो नेहमींच प्रवास करतांना दिसे. तो घरीं येई तो मोठ्या गडबडीनेंच. त्याचें लक्ष्य जणूं काय संसारावरून उठून बाहेर कुठेंतरी लागलें होतें.

हा सगळा प्रकार हिरेला जाणवत होता. आणि मनांतून ती कष्टी होत होती. म्हणूनच भावानें हांक मारल्याबरोबर ती मोठ्या उत्सुकतेनें आतां त्याच्यापाशीं आली होती.

तिच्या मागोमाग कुत्र्यामांजरांची फौज शिरली.

अशोकनें हिरेला मांडीवर बसविलें. आणि तो तिच्याशीं गोड गोड गोष्टी करूं लागला. चंद्रेश्वर पर्वतावर त्यानें जी नुकतीच सफर केली होती त्यासंबंधींहि तो तिला सांगूं लागला.

'मग मला तूं नेशील ना पर्वतावर ? ' तिनें लडिवाळपणानें विचारलें.

'चैत्र महिन्यांत तिथं मोठी जत्रा भरते त्या जत्रेला आपण जाऊं. त्यानें तिचें समाधान केलें.

'खरंच ? ' तिनें आनंदानें प्रश्न केला.

'हो. अगदीं खरं. आणि यांनाहि नेऊं आपण.' कुत्र्यामांजरांकडे नजर वळवून त्यानें म्हटलें.

हिरा हंसली. अशोकहि हंसला.

हिरेनें कुत्र्यामांजरांच्या कागाळ्या त्याच्या कानांवर घालायला सुरुवात केली. तिचा हा नेहमींचा क्रम होता. त्या जनावरांच्या गोष्टी त्यानें शांतपणानें ऐकून घ्याव्या, मग ज्याच्या त्याच्या गुन्ह्याप्रमाणें त्यांना शिक्षा सुनवाव्या आणि हिरेनें त्या अमलांत आणाव्या हा त्यांचा नित्यक्रम असे. या कार्यक्रमांत तास दीडतास सहज निघून जाई. परंतु हा वेळ निष्फळ गेला असें अशोकला केव्हांच वाटलें नाहीं. कारण गेले कांहीं दिवस सोडले तर या जनावरांच्या सहवासांत मुक्त अंतःकरणानें कांहीं काळ घालवणें ही त्याची एक मानसिक गरज झाली होती. त्याच्या भोवतालचा हा जमाव म्हणजे नैतिक शिक्षणाची एक शाळाच असून लहान मुलांचा स्वभाव घडविण्यास त्यासारखें उत्कृष्ट दुसरें साधन नाहीं असें त्याला वाटत असे. जनावरांशीं समरस होणें, त्यांचीं सुखदुःखें जाणण्याची पात्रता अंगीं आणणें ही एक माणुसकीची कसोटीच आहे असें त्याचें मत झालें होतें. माणसांच्या भावनांना इतकें तरलत्व आलें म्हणजे तो अजातशत्रु ठरला असें मानायला काय हरकत आहे ?

आज त्याला त्याच्या मुक्या मित्रमंडळींत ' जॉली ' दिसली नाहीं. त्यानें तिची चौकशी केली तेव्हां ती आजारी आहे असें हिरेनें सांगितलें. तो तडक जनावरांच्या खोलींत धांवला.

जॉली जमिनीवर अस्ताव्यस्त पडली होती. अशोकची चाहूल लागतांच तिनें उठण्याची धडपड केली, पण तिच्या करुण नजरेवरून अन् तिच्या शिथिल गात्रांवरून त्याला दिसून आलें कीं ती कोणत्यातरी व्यथेनें हैराण झाली आहे. कांहीं दिवसांमागें शेजारचा एक सुंदर कुत्रा अशाच कसल्याशा

आजारानें वारला होता, हें त्याला माहित होतें. ही एक प्रकारची सांथ असली पाहिजे ही शंका येऊन तो अस्वस्थ झाला.

जनावरांच्या त्याच्या परिवारांत जॉली जुनी होती. तिला एक तप लोटलें होतें. ती मोठी शहाणी व सहनशील होती. तिचा त्याला विशेष लळा लागला होता. ती इतकी आजारी असेल असें कुणालाच वाटत नव्हतें. कारण दुपारच्या वेळीं ती पंक्तींत फिरली होती. तिनें भात मासळी खाल्ली होती. अकस्मात् दोन तासांपूर्वी ती खोलींत जाऊन पडली होती.

अशोकनें तिला उचलून आपल्या मांडीवर घेतलें. मान वर करून तिनें त्याच्याकडे केविलवाण्या नजरेनें पाहिलें. शेपटीची चाळवाचाळव केली. आपलें सर्वांग कृतज्ञतेनें फुलविलें. पण थोड्याच वेळानें तिनें मान खालीं घातली. तिनें दाखवलेली हुशारी उसनी होती.

अशोकला संवयीनें व अनुभवानें कुत्र्यामांजरांच्या वेगवेगळ्या आजारांचें थोडें ज्ञान होतें. त्यामुळें त्यांच्या कोणत्या अवयवांत पीडा उत्पन्न झाली आहे तें त्याला चटकन कळून येई. त्यानें जॉलीचें पोट दाबून पाहिलें तेव्हां त्याला स्पष्ट दिसून आलें कीं तें किंचित् फुगलें असून त्यांत क्षणाक्षणाला कोणता तरी आवाज निघत आहे.

जॉली एकदोनदां बाहेर जाऊन आल्याचें त्याला कळलें. तो त्या जागीं जाऊन आला. तिला ढाळ झाले होते. हा आजार भयंकर होता. तावडतोब योग्य उपचार झाले नाहींत तर ती दगावणार यांत शंका नव्हती.

त्यानें घरगुती औषध तयार करून तें हळूहळू तिच्या तोंडांत घातलें. तिनें कोणतीच कुरकुर न करतां तें पोटांत घेतलें. नंतर त्यानें तिच्या पोटाला शेक दिला. तिला गरम वस्त्रांत गुंडाळली आणि तिला घेऊन तो आपल्या खोलींत आला.

कांहीं वेळानें ती उठली व बाहेर जायला शोधूं लागली. अशोक

तिच्याबरोबर गेला. ती इतकी अत्यवस्थ होती तरी ती विष्ठा बिछान्यावर करीत नव्हती. आपल्या नेहमींच्या जागेवर जाऊन तिनें बहिर्विधि उरकला. तिला आणखी ढाळ झाले तशी ती अधिक हैराण झाली. तें पाहून अशोकचा जीव खालींवर झाला.

रात्र झाली. जेवणाच्या वेळीं दोन घांस तोंडांत टाकले आणि तो जॉलीपाशीं येऊन बसला. तिची तळमळ सुरू झाली. त्यानें डॉक्टरला बोलावून आणलें. तिला चांगलें तपासून घेतलें. त्या आजारावर रामबाण असें एक इंजेक्शन तिला देण्याचें डॉक्टरनें ठरवलें.

जॉलीनें कोणताच प्रतिकार न करतां औषध टोचून घेतलें. किरकोळ उपचार चालूच होते. घटके–घटकेला अशोक तिच्या प्रकृतींतील फेरफार पहात होता. तिच्या जीवनशक्तीशीं तो इतका समरस झाला होता कीं रोगाचे सूक्ष्म चढउतार सहजच कळून येत.

जॉलीची बिकट स्थिति पाहून इतर कुत्रीं मांजरें देखील भीतीनें फिरकत होतीं. सगळ्यांच्या मुद्रा कशा अगदीं दुःखी दिसत होत्या. जणूं काय त्यांना संकटाचें ज्ञान होतें. आज अशोकपाशीं कोणतेंच जनावर सलगी करायला येत नव्हतें. तरी खोलींत येऊन चाहूल कानोसा घेऊन प्रत्येक जण जात होतें. मांजरीचीं पिल्लें देखील भीतियुक्त उत्सुकतेनें खोलीच्या दाराशीं येत, थोडा वेळ तेथेंच घुटमळत आणि नंतर पळून जात.

आपली कुत्री कशी वांचेल याशिवाय दुसरा विचार त्या रात्रीं अशोकच्या मनाला शिवला नाहीं. मध्यरात्रीनंतर तिला झोप लागली. तिला हळूहळू गुण पडत गेला. पोट हलकें झालें. तिचा श्वासोच्छ्वास स्वाभाविक होऊं लागला.

केव्हां एकदांची पहाट होईल असें त्याला झालें. आपलें एकादें प्रिय माणूस संकटांतून तरलें असेंच त्याला वाटलें.

दिवस उजाडला. तो आनंदित झाला. जॉली बरी झाली होती.

हिरा म्हणाली, 'काल सकाळीं तुला त्या दिवशींची बाई शोधीत होती.'

' कोणती बाई ? लीना ? '

' हो. '

' अस्सं ? मग तूं ठेवून घ्यायचं नव्हतं का तिला ? ' अशोकच्या मुद्रेवर विषाद व आनंद यांच्या छटा झराझर येऊन गेल्या.

हिरा उत्तरली, ' मी तिला खूप रहायला सांगितलं; पण ती निघालीच.'

' मग हें कालच कां नाहीं. सांगितलंस तूं मला ? दोन चुका केल्यास तूं, हिरा ! '

गोरीमोरी होऊन तिनें मान खालीं घातली. एक चूक तिच्या ध्यानांत आली. पण दुसरा अपराध कोणता ?

अशोक म्हणाला, ' जॉलीच्या आजारासंबंधीं तूं लगेच मला सांगितलं नाहींस काल. '

त्याच्या स्वरांतील निषेध हिरेला फारच जाणवला. तिचे डोळे पाण्यानें भरून आले.

अशोकनें हें पाहून तिला जवळ ओढीत म्हटलें, 'यापुढें असं करायचं नाहीं, समजलीस ? '

इतकें म्हणून त्यानें तिच्या गालाचा मुका घेतला.

' कां आली असेल लीना आपल्याकडे ? ' हा प्रश्न त्याच्या मनांत उद्‌भूत झाला आणि जरी तो तिच्यावर अतिशय रुष्ट झाला होता तरी तिच्यासंबंधीं अनुकूल विचार त्यानें आपल्या मनांत येऊं दिले.

लीनेसंबंधीं कितीतरी गोड कल्पनांनीं त्याच्या मनांत गर्दी केली. त्यामुळें तो उल्हसित झाला.

# १९

दोन दिवस घरीं राहून तिसऱ्या दिवशीं अशोक प्रवासाच्या तयारीनें बाहेर पडला.

घाटमाथ्यावर जाण्यांत अशोकचे दोन हेतु होते. त्याला स्वतांच्या कुटुंबासाठीं तांदळाचा पुरवठा करावयाचा होता हें एक, शिवाय अन्नासाठीं जे लोक घाटाचा आश्रय करीत त्यांची स्थिति प्रत्यक्ष डोळ्यांनीं पाहून घेण्याची त्याला उत्कट इच्छा झाली होती. लोक पंचवीस-तीस शेर तांदुळ आणण्यासाठीं हालअपेष्टा काढून गोव्याच्या हद्दीबाहेर जातात हें त्याला माहीत होतें; परंतु हा प्रसंग स्वतः अनुभवण्याची संधी त्याला प्राप्त होत होती. सरकारनें लोकांच्या अन्नाची तरतूद न केल्यामुळें त्यांना देशोधडीला जावें लागतें ही गोष्ट सरकारला ज्याप्रमाणें लज्जास्पद होती त्याचप्रमाणें तिच्याविरुद्ध कोणताच संघटित प्रतिकार न करण्याची आमच्या जनतेची वृत्ति ही त्याहिपेक्षां लज्जास्पदच होती. अन्नाविण जगणें अशक्य म्हणून कितीतरी कुटुंबें वाडवडिलांची ही भूमि सोडून बाहेर स्थायिक होत होतीं. हजारों मजूर आपल्या माणसांसाठीं अन्नाची व्यवस्था करतां यावी म्हणून बाहेर रोजगार पाहूं लागले होते.

ज्यांना कांहींच करतां येत नव्हतें असे इसम आपलें हें दुर्दैव केव्हां संपणार अशा आशेनें दिवसाचे क्षण मोजीत तळमळत होते. खेड्या-

पाड्यांतील रहिवासी भकास, उदासवाणे दिसत होते. योग्य अन्नाच्या अभावीं त्यांच्या देहाचे सांगाडे बनले होते. सरकारच्या आश्वासनांवर, सर्वशक्तिमत्वावर जे विसंबून होते ते झुरून मरत होते.

पण या सगळ्या दुःस्थितींत सरकारची शांतता ढळली नव्हती. कारण जनतेसाठीं आपलें अस्तित्व आहे ही जाणीव त्याला नव्हती. आपलें धोरण लोकांस सुखावह होवो न होवो, तें आपण सोडावयाचें नाहीं अशाच प्रतिज्ञेनें तें वागत होतें. लोकांच्या अडचणी लक्ष्यांत घ्यावयाच्या नाहींत; इतकेंच नव्हे तर त्यांना त्या प्रकाशांत देखील आणूं द्यावयाच्या नाहींत अशा हट्टानें सत्ताधारी वागत होते.

या धोरणाविरुद्ध हालचाल कोणीं करायची ? समाजानें ? जनतेनें ? पण समाज कुठें होता ? जनता कुठें होती ? व्यक्तींचा समुदाय म्हणजे का समाज ? ती का जनता झाली ? समान ध्येयाची ज्यांना जाणीव नाहीं, समान हितसंबंधांनीं जे बद्ध नाहींत, समान कर्तृत्वानें जे स्फुरलेले नाहींत, अशा शेंकडों नव्हे हजारों, लाखों लोकांचा समुदाय असला तरी त्याला ऐक्य, शक्ति, संघटितपणा कुठून येणार ? आपले नैसर्गिक हक्क समूळ खणून काढणारा कायदा पसार केला, म्हणून का आपापल्या घरांत बसून रडणाऱ्या व्यक्ती एकत्र येऊन कांहींतरी संघटित कार्य करूं शकणार ? ज्या जनतेला आपल्या सामुदायिक अस्तित्वाची जाणीव नाहीं ती दुर्दैवी होऊं नये तर काय ?

सगळा बुद्धिमान् वर्ग सरकारी नोकरींत लोळत पडला आहे तो का समाजसंघटनेचें कार्य हातीं घेणार ? स्वार्थसाधु व स्वाभिमानशून्य जमीनदार वर्ग विरोधाचें कंकण हातांत बांधून पुढें का सरणार ? अशोक-सारखे बुद्धिमान् ध्येयवादी तरुण सगळ्या समाजांत किती आढळतील ? त्यांनीं सरकारविरोधी कार्य सुरू केलें तर त्यांना या ना त्या सबबीवर उघड किंवा प्रच्छन्न विरोध करणारीं माणसें जेथें तेथें उपस्थित होतात.

त्यांना असें वाटतें कीं ज्यांच्या हातीं सत्ता नाहीं, संपत्ति नाहीं, त्यांना लोकांना उपदेश करण्याचा अधिकार नाहीं. समाजकार्याला ते पात्र नाहींत!

नोकरशाहींत शिरणें हाच देशसेवेचा उत्तम मार्ग होय, असें सांगणारे पुढारी जेथें बुजबुजतात तेथें कोणीं चळवळ सुरू करावयाची ? नोकरशाहींत आपले लोक भरले म्हणजे सरकार आपलें झालें, हा बुद्धिभ्रष्टांचा युक्तिवाद ज्यांनीं एके वेळीं मोठ्या सोज्ज्वळपणानें केला आणि एवढ्या–साठीं ज्यांना पुढारीपणाची शालजोडी बहाल करण्यांत आली अशा पुढाऱ्यांच्या नेतृत्वाखालीं कोणत्या समाजाचा उद्धार होणार ?

अशोकची अशी विचारसरणी होती. म्हणूनच तो तळमळत होता. पण त्यानें सुरुवातीला ठरविल्याप्रमाणें त्याला आधीं सगळें पाहून घ्यावयाचें होतें. त्याच्या कार्याची वेळ अजून यावयाची होती. गोमंतकांत चाललेल्या गोंधळांत त्याला कोणतें तरी सूत्र शोधावयाचें होतें. आणि त्याच्या अनुरोधानें भावि कार्याची निश्चिती करावयाची होती. समाजाच्या बाह्यांगावर दिसणाऱ्या विकृतींचा अभ्यास करून त्यांचें मूळ कोठें आहे हें त्याला पहावयाचें होतें. हें काम धीरेधीरे करावयाचें होतें. त्यांत घाई उपयोगाची नव्हती.

अन्नासाठीं परागंदा होणाऱ्या लोकांची स्टेशनवर गर्दी होती. प्रत्येकाच्या खांद्यावर दोन तीन गोणपाट होते. आपण जणूं काय भाग्य आणण्या-साठीं चाललों आहों, अशाच अर्थाच्या सगळ्यांच्या मुद्रा दिसत होत्या. हे सगळे मजूर, कुळवाडी, किंवा मध्यमवर्गी जमीनदार होते. प्रत्येक-जण मोठ्या उत्सुकतेनें सोबत्याला विचारीत होता : 'आतां तांदुळ सोडतात ना बाहेरून ?' हा प्रश्न विचारतांना अनुकूल उत्तर ऐकायला ते अधिर झालेले दिसत होते.

ते अशा प्रकारच्या आंदोलित मनःस्थितींत असतांच दुसरे कांहीं प्रवासी बोलून जात : 'गेल्या दोन दिवसांपासून तांदळांचा एक गोटा

आंत सोडलेला नाहीं. कॅसल रॉकला शेंकडों लोक कुजत आहेत. '

हें वर्तमान कानावर पडलें कीं त्या दुर्दैवी लोकांचीं तोंडें चिमणी-एवढीं होत. ते सुस्कारूं लागत. कांहींच्या डोळ्यांत पाणी उभें राही. कांहींच्या मुद्रा हतबुद्ध दिसत. कारण त्या सगळ्यांनीं घरांतून बाहेर पडतांना आपल्या प्रिय मंडळीला आश्वासन देऊन ठेवलें असेल कीं दोन तीन दिवसांच्या अवधींत तांदुळ घेऊन आपण घरीं परतत आहोंत. या आशेवर विसंबून घरचीं माणसें अर्धपोटीं उपाशी आपल्या वाटेकडे डोळे लावून बसलीं असतील. त्यांची आतां केवढी निराशा होईल ! अशा विचारानें ते रडकुंडीला येत. अशा वेळीं स्वतःच्या मनाची फसवणूक करून त्यांत समाधान मानून घेणारे कांहीं असामी हळूच म्हणत : 'कदाचित् एव्हांना तांदुळ सुटले असतील. कांहीं झालें तरी आपण शेवटपर्यंत जाऊन यावें. '

हा सगळा प्रकार अशोकला गाडीच्या डब्यांत पाहतां आला. सर्व प्रकारच्या लोकांच्या तोंडून, त्याला जी एक गोष्ट सर्वसाधारणपणें ऐकूं आली ती म्हणजे पोर्तुगीज सरकारबद्दल त्यांच्या मनांत वसत असलेला तिटकारा. पूर्वजन्मींच्या पापांमुळेंच आपण या जन्मीं या दुर्भागी प्रांतांत जन्माला आलों, अशा प्रकारचे तळमळीचे उद्गार त्याला पावलोंपावलीं ऐकायला मिळत.

एकंदर सरकारी खात्यांच्या वेडगळ कारभारांतील वैगुण्यें दाखवून गोमंतकाच्या वेगवेगळ्या कोपऱ्यांतील ही मंडळी सरकारवर आपल्या संभाषणांतून आग पाखडीत.

साखर व राकेल यांची जी वांटणी चालली होती तिच्याविषयीं एका इसमानें म्हटलें :

' रांगांची ही पद्धत वाईट आहे असं अधिकाऱ्यांच्या कानावर घातलं तरी ते ऐकत नाहींत. अडाणी लोक दंडेली करून तेथें घुसतात आणि

मग खेंचाखेंचीला सुरुवात होते. व्यापारी व पोलिस अधिकारी यांचें संगनमत आधींच झालेलें असतें. जो माल वांटणीसाठीं व्यापाऱ्याकडे आलेला असतो त्याचा फार मोठा हिस्सा मधल्यामधें गडप होऊन चोर-बाजारांत जातो. आणि लहानसा भाग दणगट लोकांच्या पदरीं चारचार तास रस्त्यावर उन्हांत तळमळत राहिल्यानंतर पडत असतो.'

यावर दुसरा म्हणाला : ' या वांटणीमुळें खेड्यापाड्यांतील बायकामुलें अगदीं त्रस्त होऊन गेलीं आहेत. वाढलेल्या पोरी तर एका बाटलीच्या मोबदला आपली एक रात्र बहाल करतात. गांवोगांव हेच प्रकार चालले आहेत.'

या संभाषणांत एका पांढरपेशा तरुणानें भाग घेऊन म्हटलें, ' गेल्या दिवसांत मडगांवच्या मार्केटांत मीं एक मजेदार प्रकार पाहिला. एक नीग्रो सोल्जर मासळी विकत घेण्यासाठीं गेला होता. बाजार खूप महाग होता. तें पाहून तो उद्वेगानें म्हणाला : "**Aqui nao apanhar peixe por quatro tangas; mas apanhar raparga por quatro tangas.**" ( येथें चार आण्याला मासळी मिळत नाहीं. पण पोरगी मिळते. )

सगळे जण हंसले. अशोकच्या हृदयाला वेदना झाल्या. साखर,घासलेट यांच्या वांटणीसंबंधीं त्यानें चारपांच लेख लिहिले होते. पण ते सेन्सॉरनें कापून टाकले होते. जनतेचीं दुःखें वेशीवर टांगण्याची सोय नव्हती. तिचा कैवार घेणारी कोणतीच संघटित संस्था नव्हती.

गाडी दूधसागरापाशीं आली. दुधसागराचा देखावा पाहून नेहमीं त्याला किती आनंद होत असे ! पण आज त्या विचित्र मनःस्थितींत तो जलप्रपात त्याला तिरस्करणीय वाटला. या पापी गोमंतकाचें पादप्रक्षालन करण्यासाठीं त्याची जी धडपड चालली आहे ती पाहून त्याला दुःख झालें. कोणा महात्म्यानें आपल्या तपोबलावर हा पवित्र रोमहर्षक प्रवाह

स्वर्गातून या भूमीवर आणला असेल कुणाला माहीत. पण पापी माणसांना समृद्ध करण्यासाठीं हा प्रवाह निष्फळ वहातो आहे असेंच त्याला वाटलें.

दूधसागर मागें पडला. कांहीं वेळानें गाडी कॅसल रॉकला थांबली. तेथें दोन अडीच तासपर्यंत प्रवाश्यांची तपासणी करण्यांत येऊन त्यांच्या सहनशीलतेची चांगलीच परीक्षा घेण्यांत आली.

भकास चेहऱ्याचे कितीतरी गोमंतकीय फलाटावर पसरलेले होते. प्रत्येकाच्या शेजारीं तांदळाच्या एकदोन मोटल्या होत्या. आशा-निराशेच्या झगड्यांत ते दुर्दैवी प्राणी सांपडले होते. कस्टमनें पास देण्याची बंदी केली होती. त्यामुळें सगळा तांदुळ तेथेंच अडकून पडला होता. व त्याच-बरोबर शेंकडों स्त्रीपुरुष तेथें ताटकळत पडले होते. कस्टम अधिकाऱ्याचा अनुकूल निकाल आतां येईल, मग येईल, अशा आंदोलित मनःस्थितींत त्यांची कुचंबणा चालली होती.

इतक्यांत फलाटावरील जमावांत एकच गडबड उडालेली अशोकला दिसली. अस्ताव्यस्त पडलेले, बसलेले, झोंपलेले ते दीनवाणे लोक झपाझप उठले. त्यांनीं आपलें सामान आवरलें, आणि अधीर नजरेनें त्यांनीं आसपास पाहिलें. त्यांच्या चेहऱ्यावर आनंद चमकूं लागला. तांदुळ न्यायला परवानगी देण्यांत आली आहे अशी बातमी पसरली.

शेवटीं पांचसहा दिवस त्यांनीं जे उपासतापास काढले होते ते फळाला आले होते. एक महिनाभर ते आतां निश्चिंतपणें जेवणार होते. पोटासाठीं केवढी ही धडपड ! हर्षाची लाट सर्वत्र पसरली होती.

अशोकला हें पाहून आनंद झाला. त्याच्या इतर प्रवासी सोबत्यांची भीति आतां नष्ट झाली. तांदुळ निर्विघ्नपणें नेतां येतो एवढें सिद्ध झालें.

“ पण ही स्थिति दोन दिवसांनंतर कायम राहील याचा काय नेम ? ” हळूच कुणीतरी पुटपुटलें.

त्याबरोबर त्या अन्नार्थी लोकांचे आनंदानें चमकणारे चेहरे पुन्हां मलूल झाले. नशीबावर व परमेश्वरावर भरंवसा ठेवल्याखेरीज आतां त्यांना गत्यंतर नव्हतें.

गाडी लोंढ्याला थांबली. येथेंच ते सर्व लोक उतरले. जणूं काय लुटारूंची वावटळ सुटली आहे. आणि खरोखरीच ते निरपराधी असूनहि लुटारूच्या मनःस्थितींत होते. त्यांच्या दृष्टीनें अन्नासाठीं ते केवढें धाडस करीत होते ! रेल्वे अधिकारी इत्यादि त्यांच्याकडे ज्या नजरेनें पहात ती नजर जितकी क्रूर तितकीच अर्थसूचक होती. तें जणूं काय म्हणत, 'तुम्ही गुन्हेगार आहांत. तुम्ही चोरून तांदुळ आणतां. पण याद राखा, आमच्या टेहळणींतून तुम्ही सुटणार नाहीं.'

कांहीं लोक हल्याळ दिशेनें गेले. कांहीं लोंढ्यालाच तांदुळ खरेदी करण्यासाठीं बाजारांत गेले. अशोकला कुणीं सांगितलें, 'सुप्याला तांदुळ स्वस्त मिळतो. आपण सगळे तिथंच जाऊं.'

त्याच्या डब्यांतलि तीस चाळीस मंडळी सुप्याला जाण्यासाठीं बाहेर पडली.

दीड दोन तासांच्या कंटाळवाण्या प्रवासानंतर अशोक सुप्याला पोहचला. वाटेंत वॉर सर्व्हिसच्या मोटारींची ये जा सुरू होती. जेथें तेथें लष्करच्या छावण्या दिसत होत्या.

नदी ओलांडून मोटार सुप्याला आली. अशोकबरोबर आलेल्या त्याच्या प्रांतबंधूंनीं धान्याच्या दोन तीन दुकानांवर धाड घातली. ही त्यांची बुभुक्षित वृत्ति पाहून दुकानदारांनीं तांदळाचा भाव लगेच वाढवला. आधीं ते रुपयाला साडेतीन शेर विकत असत. आतां त्यांनीं या वेड्या गिऱ्हाइकांना दोन शेर विकायला सुरुवात केली. सगळ्यांनीं थोड्याच अवधींत आपलीं रिकामीं पोतीं भरलीं. जो तो स्वतःपुरतें पाही. ते सगळे सोबतीनें आले होते; पण सोबतीनें, संघटितपणानें काम करण्याची ज्यांना संवय नाहीं

त्यांना त्या थोड्या अवधींत सुधारणें अशोकला अशक्य होतें. अर्ध्याअधिक लोकांनीं लोंढ्याला जाणारी मोटार पकडली. मोटारवाल्याला दुप्पटीनें पैसे चारले. मोटारींत जागा नसल्यामुळें बरेचजण हूडवर बसले आणि अशा रीतीनें जीव धोक्यांत घालून त्यांनीं आपली वाट धरली.

अशोकला इतर सोबत्यांबरोबर तिथेंच रहावें लागलें. तो दुकान-दाराच्याकडे उतरला. त्यानें त्याला चांगली जागा दिली. अशोकनें दोन अडीचशें रुपयांचा तांदुळ खरेदी करून तो पिशव्यांत भरला. पण त्याची पुढें गत काय ? हा त्याला प्रश्न पडला.

दिवसांतून दोनतीन मोटारी त्या रस्त्यांतून लोंढ्याला जात; पण त्या सगळ्या प्रवाश्यांनीं भरून येत. त्यामुळें त्यानें घेतलेला तांदुळ लोंढ्या-पर्यंत न्यायला कुणीच तयार होईना.

एका दरिद्री खाणावळींत त्यानें जेवण घ्यावें व रात्रीच्या वेळीं दुकानाच्या ओसरीवर पडावें आणि दिवसा नदीच्या कांठावर फिरत किंवा गांवच्या रस्त्यांतून फेऱ्या मारीत कंटाळ्यानें वेळ घालवावा.

दुसऱ्या दिवशीं पावसाची झिमझिम सुरू झाली. रस्त्यांत चिखल झाला. नदीचें पाणी गढूळ झालें. वातावरणांत खिन्नतेची छाया पसरली.

गांवचा बाजार अगदींच लहान होता. फक्त चार पांच दुकानें. तेथें येणारे लोक देखील बहुतेक कुणबीच असत. त्यांच्या तोंडची कोंकणी भाषा ऐकून अशोकला समाधान वाटे.

तिसरा दिवस उजाडला. त्याची निराशा अधिकच वाढली. पाऊस तर जोरानें पडत होता. तांदळाची बरीच खरेदी त्यानें करून ठेवली होती. आणि वाहतुकीचें साधन नव्हतें. जेवणाखाण्याची व राहण्याची चांगली सोय नव्हती. अशा स्थितींत त्याची खिन्नता इतकी वाढली कीं आपल्याला इथें यायची कुठ्ची बुद्धि झाली असें त्याला वाटलें.

त्याच्या सोबत्यांची स्थिति तर अगदींच केविलवाणी झाली होती. ते सगळे रडकुंडीला आले होते. त्यांनीं आणलेला पैसा संपत आला होता. आणखी दोन दिवस तेथें राहण्याची पाळी आली तर अर्ध्या मोलानें तो तांदुळ विकून हात हलवीत घरीं परत जाण्याचा दुःखद प्रसंग त्यांच्यावर येणार होता.

शेवटीं चवथ्या दिवशीं वॉर सर्व्हिसचा एक ट्रक लोंढ्याला जात होता. तो त्यांनीं गांठला. शोफरची मनधरणी करून तांदुळ स्टेशनपर्यंत पोचविण्याची व्यवस्था करण्यांत आली. शोफर दुष्ट व स्वार्थसाधू होता. वाहतुकीचे दर त्यानें त्यांच्याकडून चौपट वसूल केले.

अशोकच्या सोबत्यांपैकीं एक म्हातारा होता. गेले तीनचार दिवस तो अर्धपोटींच होता. त्यानें आणलेले पैसे संपले होते. त्याची प्रकृति अगदीं ढांसळून गेली होती. पण विकत घेतलेले तांदुळ घरापर्यंत नेलेच पाहिजेत अशा निर्धारानें तो कृत्रिम अवसान आणून काम करीत होता.

त्याचें नांव सदू होतें. तो जातीनें चांभार होता. आपला धंदा सोडून तो पोटासाठीं इतक्या दूर आला होता.

मोटार लॉरींत तांदळाचीं पोतीं भरण्याची एकच गडबड उडाली. सदूनें आपलें पोतें माथ्यावर उचललें आणि तें आतां मोटारींत आदळणार तोंच पाय निसरून तो तोंडघशीं जमिनीवर पडला. अशोकनें इतरांच्या सहाय्यानें त्याला उचलून निचेष्ट स्थितींत मोटारींत घातलें.

पाऊस पडायला सुरुवात झाली. लॉरी उघडीच होती. प्रवासी व तांदळाचीं पोतीं सारखींच भिजत होतीं. एवढे कष्ट काढले पण ते निष्फळ होण्याची वेळ आली होती.

मोटार चालू झाली. सदू अजून हालचाल करीत नव्हता. त्याची ती गत पाहून अशोकला वाटलें कीं हा कांहीं वांचत नाहीं. त्याला या वेळीं ब्रह्मांड आठवलें. अन्नासाठीं या प्रकारची यातायात करणारे शेंकडों, नव्हे हजारों

लोक केवढी हाल अपेष्टा काढीत आहेत हें पाहून त्याचा जीव तळमळूं लागला.

सदूची योग्य ती व्यवस्था लावल्याशिवाय त्याला पुढें जाणें शक्यच नव्हतें. तो लोंढ्याला एक दिवस राहिला. सदू आतां उठूं बसूं लागला. अशोकनें त्याला पैशांची मदत केली आणि तेथेंच स्थायिक झालेल्या एका ओळखीच्या प्रांतबंधूच्या स्वाधीन करून तो कॅसल रॉकला येण्यासाठीं निघाला.

त्याला पावलों पावलीं अडचणी आल्या. तांदुळ गाडींत पडेपर्यंत त्याला इतकी दगदग झाली कीं त्याचा जीव मेटाकुटीला आला.

गेले चार पांच दिवस त्यानें आंघोळ देखील केली नव्हती. कित्येकदां जेवणाच्या वेळीं चहाच्या दुकानांतील भिकार जिन्नस खाऊन त्यानें वेळ निभावून घेतली होती. सुप्यापासून लोंढ्यापर्यंत पावसाचा मारा अंगावर घेत त्यानें प्रवास केला होता. त्यामुळें त्याचें सर्वांग जड झालें होतें व क्षणाक्षणाला त्याला हुडहुडी भरत होती.

शेवटीं गाडी कॅसल रॉकला थांबली. तांदळाचीं पोतीं, पिशव्या, बोचकीं भराभर फलाटावर पडूं लागलीं. पोलीसलोक गिधाडाप्रमाणें आसपास फिरूं लागले. त्याच्याआधीं दोनतीन दिवस सुप्याहून निघालेले व हल्ल्याळच्या बाजूनें गेलेले शेंकडों इसम फलाटावर गडबड गोंधळ करीत असलेले त्याला दिसले.

या सगळ्या गोंधळाची चौकशी केल्यावर त्याला असें कळून आलें कीं, एका व्यापाऱ्यानें कस्टम चुकवून माल नेण्याची खटपट केल्यामुळें त्याला पकडण्यांत आलें असून त्याचा माल जप्त करण्यांत आला आहे आणि म्हणूनच गेल्या दोन तीन दिवसांपासून साहेबानें तांदळाचे पास देण्याची बंदी केली आहे.

आपल्या लोकांची ही अगतिक, असहाय्य, लाचार स्थिति पाहून त्याला उद्वेग आला. ही सगळी दैना व्हायला आपलें दुबळें व मूर्ख सरकार कारणीभूत आहे असा जळजळीत विचार त्याच्या मनांत येऊन गेला. असल्या सरकारच्या छत्राखालीं आपण चारशें वर्षे शांतपणानें काढलीं आणि इतकाच काल यापुढें काढण्याची आपण जणूं काय प्रतिज्ञाच केली आहे.

त्यानें आपलीं दहा पंधरा पोतीं त्या आवाराच्या एका कोपऱ्यांत ठेवावयाला लावलीं व थोडा वेळ विचार करीत तो तेथेंच उभा राहिला.

एक पोलीस हवालदार त्याच्याकडे येऊन हळूच म्हणाला, ' काय राव ! हे तांदुळ कुठून आणलेत ? '

' सुप्याहून. ' त्यानें सत्य सांगितलें.

' चोरून आणलेत ना ? मग माल अटकेंत ठेवून पंचनामा करायला लावतों. ' कांहींशा उर्मट व धाकाच्या स्वरांत हवालदारानें म्हटलें आणि त्यानें एका शिपायाला खूण केली.

अशोकनें घडलेली हकिगत सांगितली. त्यानें तांदुळ चोरून आणण्याचा मुळींच प्रयत्न केला नव्हता. कायद्यानें त्याला ते आणतां येत नव्हते ही गोष्ट वेगळी. पण तो हवालदार ऐकेना. गोमंतकांत उडालेल्या हाहाःकाराचें त्यानें वर्णन केलें तरीहि तो स्थिर गंभीरच होता. शेवटीं त्यानें मिस्किल हास्य करीत म्हटलें, ' तुम्ही इथें नवीन दिसतां. '

आणि खरेंच अशोक तेथें नवीन होता. त्याला पोलीसलोकांशीं बोलावयाची भाषा अवगत नव्हती. म्हणून तो हवालदाराशीं एवढा वेळ घासाघीस करीत होता.

शेवटीं एक इसम त्याच्याजवळ आला आणि त्यानें हळूच म्हटलें, ' कसला वाद घेऊन बसलांत राव! एवढा तांदुळ इथं सोडून जावा लागेल. '

अशोकवर कठीण प्रसंग गुदरला. कारण एका जिल्ह्यांतला तांदुळ दुसऱ्या जिल्ह्यांत आणायला कायदेशीर बंदी होती हें त्याला माहीत

होतें. त्या अनोळखी इसमानें हवालदाराला डोळा मोडला व म्हटलें ‘ चला हो. हे तुमची संभावना करतील. ’

अशोकला नंतर कळून आलें कीं, हीच भाषा आपण सुरुवातीला वापरली असती तर या थेरड्यापाशीं येवढा वेळ हुज्जत घालीत बसण्याचें कांहीं कारण नव्हतें.

एक संकट टळलें; पण इतर अडचणी कांहीं थोड्याथोडक्या नव्हत्या. साहेबानें तांदळावरील बंदी कांहीं उठविली नव्हती. दर घटकेला वेगवेगळ्या बातम्या ऑफिसमधून येऊन तेथें थडकत. तीन-चारशें लोक हवालदील होऊन गेले होते. एवढ्या सायासांनीं त्यांनीं आणलेलें अन्नधन त्यांना आतां घरीं न्यायला मिळत नव्हतें. या विचारानें तो सारा समुदाय शोकाविव्हल होऊन गेला होता.

अशोक गोंधळून गेला होता. त्याच्या ओळखीचा एक इसम त्याच्याकडे येऊन काकुळतीच्या भावानें म्हणाला, ‘ बाबा, तुम्ही साहेबापाशीं जाऊन दोन शब्द त्यांना सांगा. ’ अशोकनें त्याची विनंति मान्य केली. आपल्या तांदळाची राखण करायची त्याला सूचना देऊन तो ऑफिसांत गेला.

तेथेंहि लोकांची दाटी झाली होती. साहेबाच्या अनुकूल हुकुमाची सगळेजण अधीरतेनें वाट पहात होते.

गर्दीतून मार्ग काढीत अशोक दारापर्यंत आला, आणि परवानगी घेऊन तो आंत शिरला.

साहेब ॲंग्लो–इंडियन होता. त्यानें अशोकचें सगळें म्हणणें ऐकून घेतलें. अशोकनें सांगितलें कीं, आज चार पांच दिवस लोक येथें कुजत आहेत. त्यांना आज तरी परवानगी द्या. अन्न नसल्यामुळें आपल्या लोकांवर मोठी आपत्ति ओढवली आहे. आपले शेजारी या नात्यानें त्यांनीं गोमंतकाला सहाय्य केलें पाहिजे. इत्यादि, इत्यादि...

अशोकच्या बोलण्याचा परिणाम साहेबाच्या मनावर फारच झाला. थोड्याच वेळानें त्यानें आपल्या नोकरांना हुकूम सोडला, 'या सगळ्यांना पास द्यायला लावा. आतांची गाडी त्यांना पकडतां आली पाहिजे.'

अशोकला फार आनंद झाला. साहेबाचे आभार मानून तो बाहेर पडला. बाहेरच्या जमावानें त्याचा जणूं काय जयजयकार केला. साहेबाच्या हुकुमाचें वर्तमान एकाच क्षणांत आसपास पसरलें. निराश झालेले लोक भराभर उठूं लागले. सगळीकडे एकच गडबड धांदल उडाली. आनंदाचे चित्कार, उत्साहाची आरडाओरड यांनीं क्षणभर वातावरण भरून गेलें.

तीं पंधरा सोळा पोतीं डब्यांत टाकीपर्यंत अशोकला जी यातायात करावी लागली तिचें वर्णन न केलेलें बरें. या प्रसंगीं तो अलोट धैर्यानें वागला म्हणूनच टिकला.

सांवर्डेच्या स्टेशनवर गाडी थांबली तेव्हां शेंकडों लोक भराभर आपापले बोजे घेऊन खालीं उतरले. त्यांची ती गडबड, त्यांच्या मुद्रेवरील ती अधीरता आणि आनंद, थोड्याच वेळांत घरच्या माणसांचें आपल्याला दर्शन होईल या कल्पनेनें त्यांना लागलेली ओढ, हें सारें पाहून अशोकला समाधान वाटलें.

पण नेहमींच शेंकडों लोक बाहेर जातात, हेच कष्ट, हेच हाल त्यांच्या नशिबीं नेहमीं येतात.

'अन्नासाठीं गोमंतकीयांची परप्रांतांत धांवपळ, परमेश्वरा, तूं कुठवर चालूं देणार ?'

हे विरोधी विचार त्याच्या मस्तकांत नाचत असतांनाच लीना त्याच्या नजरेला पडली. याच वेळीं तिनेंहि त्याच्याकडे पाहिलें. ती धांवतच त्याच्याकडे आली आणि अनावर भावनावेगानें तिनें त्याला आलिंगन दिलें.

तो आश्चर्यस्तिमित झाला. जी लीना आपल्याला कायमची अंतरली असें आपण समजत होतों तीच का ही लीना ?

किती गोड, सुंदर, खेळकर !

मनाच्या अशा गोड विभ्रमांत त्याचे एक दोन क्षण गेले.

अलोट उल्हासानें लीना त्याच्याकडे भरल्या डोळ्यांनीं पहात होती. जणूं काय दहा वर्षांच्या वियोगानंतर त्याची आपली भेट होत आहे.

# २०

थोड्या वेळानें लीनेनें त्याला विचारलें, ' आतां कुठं चाललांत ? '

' घरीं. ' त्यानें उत्तर केलें आणि तिच्याकडे पाहिलें.

' आपण फारच थकलेले दिसतां. '

' सातआठ दिवसांची प्रवासाची दगदग आणि तांदळाचें हें धन सुखरूपपणें इथं आणण्यासाठीं करावी लागलेली यातायात यामुळं थोडाफार त्रास झाला. '

आणि खरोखरच एका आठवड्याच्या आंतच तो कितीतरी वाळला होता. त्याचे डोळे खोल गेले होते. आणि त्यांच्याखालीं काळीं वर्तुळं पडलीं होतीं. चेहऱ्यावर शिणाची, चिंतेची काळी छाया पडली होती. केस अस्ताव्यस्त झाले होते. आणि सतत आठ दिवस स्नान नसल्यामुळें मालिन्याचा ठसा सगळ्या देहावर आणि पोषाखावर उठला होता.

' तुम्हीं मला कळवलं असतं तर मी दिखील तुमच्या बरोबर आलें असतें. '

तो थोडा वेळ स्तब्ध राहिला. जलक्रीडेचा देखावा त्याच्या नजरेसमोर उभा राहिला आणि अकस्मात् तो खिन्न झाला.

'मला कवळावं असं तुम्हांला वाटलं नाहीं ?...' तिनें रोषपूर्ण स्वरांत म्हटलें.

‘ लीना, तुला बुद्धीनं असलीं कामं करावीं असं वाटतं. पण आपल्या रक्ताचे संस्कार एवढे प्रबल असतात कीं ते आपल्या इच्छेप्रमाणें आपल्याला वागूं देत नाहींत. ’

हा टोमणा अशोकनें आपल्याला कां मारला हें तिला लगेच कळून चुकलें. त्याला उत्तर देण्याच्या भानगडींत ती पडली नाहीं. फलाटावर धांवपळ करणाऱ्या लोकांकडे पहात तिनें म्हटलें, ‘ या इतक्या लोकांच्या सोबतीनं तुम्ही घाटमाथ्यावर जाऊन आलां असाल. ’

‘ हो. एकाच दुःखानं ते व मी ग्रस्त झालें आहेंत. त्या बिचाऱ्यांनीं किती त्रास सोसले आहेत त्याची इतरांना कल्पना येणार नाहीं.’ अशोकनें उदास स्वरांत म्हटलें.

‘तुम्हीं आतां माझ्याबरोबर आलं पाहिजे, अशोक.’ लीनेनें अधिकारानें म्हटलें.

‘ पण हें भांडवल आहे ना माझ्याबरोबर ? ’ त्यानें समोरच्या पंधरा—सोळा पोत्यांकडे नजर टाकून उत्तर केलें.

‘ त्याची व्यवस्था मी करतें. ’ इतकें सांगून लीना स्टेशनमास्तरला भेटली आणि त्याला दोन शब्द सांगून लगेच परत आली.

त्यांच्यादेखत हमालांनीं तीं सगळीं पोतीं मालाच्या कोठडींत ठेवून दिलीं.

दोघेंहि आवाराच्या बाहेर आलीं. लीनेनें मोटारीचें दार उघडून म्हटलें, ‘ चला. ’

अशोकनें आढेवेढे घेतले.जलक्रीडेचें शल्य त्याला अजून मागें ओढीत होतें.

‘ तुम्ही कबूल केलं आहे. आतां उशीर नको. ’ तिनें आग्रह केला.

तरीहि तो निश्चल राहिला. हें पाहून ती मोटारींत बसली. आणि अशोकचा हात पकडून त्याला आंत ओढीत तिनें विनवणीच्या स्वरांत म्हटलें, ‘अशोक, मला क्षमा करा...’

आणि इतकें म्हणून आपलें तोंड तिनें दोन्ही हातांनीं झटकन् झांकून घेतलें व हुंदके आवरण्याचा प्रयत्न केला. त्याबरोबर तिची नाजूक काया थरथरां हलली आणि तिचें वक्षःस्थल जोरानें वरखालीं झालें.

लीनेला इतकें दुःख झालें हें पाहून अशोक शरमिंधा झाला. मोटारींत चढून तो तिच्या शजारीं बसला आणि तिनें आपल्या तोंडावर धरलेला पंजा दूर सारीत त्यानें अगदीं प्रेमळ स्वरांत म्हटलें, 'लीना, तुला वाईट वाटलं, होय ?'

तिनें शोफरला हांक मारली व थोड्या वेळानें मोटार चालू झाली.

'अशोक, तुम्ही माझ्यावर इतके कशाला रागावलां ? माझ्या हातून एवढा कोणता गुन्हा घडला ? '

अशोक गप्प राहिला. जणूं काय त्या अप्रिय प्रकारासंबंधीं त्याला तिच्याशीं बोलावयाचें नव्हतें.

'अशोक, तुम्ही फार कठोर झालांत ! मी आल्बेर्तबरोबर जलक्रीडा केली अशी तुम्ही समजूत करून घेतली, नाहीं का ?'

अशोकनें मान हलवून 'हो' म्हटलें.

'मग तुमची चूक झाली. माझा भाऊ व आल्बेर्त तलावाच्या एका टोंकाला स्नान करीत होते. मी दुसऱ्या टोंकाला पाण्यांत उतरलें होतें. आमच्यामध्यें एका फर्लोंगाचं अंतर होतं. मी त्या निवांत जागीं पोहत असतांना आल्बेर्त मला नकळत माझ्यापाशीं आला आणि त्यानें फाजील-पणा करायला सुरुवात केली. त्याची त्याला मीं शिक्षा दिलीच. '

' काय केलंस तूं ? ' अशोकनें उत्सुकतेनें विचारलें.

'त्याच्या हाताचा पाण्यांतच चावा घेतला. जन्माची आठवण राहील त्याला त्याची. '

अशोकला आपल्या अपराधाची जाणीव झाली. त्यानें आपला पश्चात्ताप व्यक्त करीत म्हटलें, 'माझी चूक झाली.' आणि तिचा उजवा हात त्यानें भावनावेगांत दाबला.

लीना म्हणाली, 'अन् मी आल्बेर्तबरोबर खुषीनं जलक्रीडा केली असं जरी गृहीत धरलं तरी तुमच्या वर्तनाचं समर्थन होत नाहीं.'

ती थोडा वेळ थांबली. मोटार आतां विस्तीर्ण शेतांच्या मधून जात होती. त्यांतून पसरलेल्या गार पाण्याचा ओलावा त्यांना प्रतीत होत होता.

अशोकचें लक्ष याच वेळीं चंद्रेश्वर पर्वताच्या शिखराकडे लागलें आणि त्या शांत, सुंदर स्थलीं कलिकेच्या सहवासांत ज्या कांहीं घटका त्यानें घालविल्या होत्या त्यांची त्याला आठवण झाली. आपण त्या दिवशीं निग्रह केला नसता तर लीनेच्या सहवासाला अंतरल्याशिवाय आपण राहिलों नसतों हा विचार त्याच्या मनांत आला. आणि त्यानें समाधानाचा निश्वास टाकला.

लीना पुढें म्हणाली, 'मी ख्रिस्ती वातावरणांत वाढलें, त्यामुळं नृत्य, वादन, गायन, इत्यादि कलांचं मला शिक्षण मिळालं. त्याचबरोबर पुरुष-वर्गाचा सहवासहि मला अधिक लाभला. हें चांगलं असेल किंवा वाईटहि असेल. पण पाश्चात्त्य संस्कृतींत वाढल्यामुळं माझी प्रकृति ही अशी घडत गेली. हिंदु संस्कृति मला मनापासून आवडते. म्हणून तिचा स्वीकार करण्याचा माझा प्रयत्न चालू आहे. पण रक्ताची, परंपरेची ओढ अदम्य असते, हें तुम्हीं लक्षांत आणलं असतं,तर माझ्या वर्तनाकडे तुम्ही वेगळ्या औदार्यानं पाहिलं असतं.'

ती थांबली. अशोकला तिचें म्हणणें पटलें. आपलें लग्न होण्यापूर्वींच आपण तिच्यावर स्वामित्व गाजवूं लागलों, असेंच त्याला दिसून आलें.

मोटार आतां एका तलावाच्या कांठानें जाऊं लागली. तलावाचा पृष्ठभाग लाल व शुभ्र कमळांनीं भरून गेला होता व त्यांच्या हिरव्या पानांनीं त्याच्यावर जणूं काय आच्छादन टाकलें होतें. आसपासचें वातावरण कमलपुष्पांच्या सुगंधानें उल्हसित झालें होतें.

अशोकला वाटलें : या सुंदर निसर्गदृश्यामधून जातांना लीनेनें असलें

भाषण करायला नको आहे. त्यानें तिचा हात आपल्या हातांत घेऊन म्हटलें, ‘ लीना, आतां बंद कर पाहूं हें तुझं असलं बोलणं. मी चुकलों म्हणून तुला सांगितलं ना ? ’

लीनेचें मन आतां शांत झालें. तिच्या मनांत गेले कांहीं दिवस जी अस्वस्थता माजली होती, तिला तिनें आपल्या शब्दांतून व उद्गारांतून मोकळी वाट करून दिली होती.

तलावांतल्या पाण्यांत शुभ्र बदकांचा एक थवा मोठ्या डौलानें पोहत होता, तिकडे तिची दृष्टि वळली. पलीकडच्या आंब्याच्या राईला मोहर आला होता, त्यामुळें ते वृक्ष पिवळसर मंजिऱ्यांनीं डंवरून गेले होतें. जणूं काय एकाद्या देवतेचा रथ गुढ्यातोरणांनीं फुलला आहे.

दोघेंहि कोणत्यातरी कल्पनेंत मग्न होऊन गेलीं होतीं. सगळ्या जीवन-शक्तींचें केंद्रीकरण करून ज्या भावनेचा आस्वाद घ्यावा पण जी दुसऱ्या-पाशीं व्यक्त करतांना भाषेची अपूर्णता प्रत्ययाला यावी, अशा भावनेचा पगडा दोघांच्याहि मनावर हळूहळू बसूं लागला. दोन मनांची ही मूक संगति चालू असतांना अशोकनें तिचे दोन्ही हात आपल्या हातांत घेतले आणि त्यानें त्यांचें चुंबन घेतलें. तिच्या तोंडून नकळत ‘ अशोक ’ असा उद्गार बाहेर पडला.

‘ लीना ! माझी लीना ! ’ त्यानें अगदीं हळुवारपणानें म्हटलें. दोघांचेहि चेहरे अलौकिक आनंदानें फुलून आले होते. त्यांच्यापुढें भावनांचें नवें जग पसरलें होतें.

घर्र घर्र असा आवाज करून मोटार थांबली. तेव्हां दोघेंहि भानावर आलीं. मोटार लीनेच्या बंगल्याच्या दरवाजांत उभी होती.

## २१

'अशोक, रागावूं नकों. मी आतां तुम्हांला थोडं वाजवून दाखवतें.' खोलींत येऊन बसल्यानंतर थोड्या वेळानें लीना उत्फुल्ल नजरेनें अशोक-कडे पहात म्हणाली.

तिच्या स्वरांत व्हायोंलीनचा कंप होता. तिचा चेहरा आत्यंतिक आनंदानें चमकत होता. आपल्या मनांत भरलेलें जिवंत काव्य — सर्व काव्यांतील उत्कट, व्यापक व अनिर्वचनीय असें प्रेमकाव्य—वादनाच्या द्वारां व्यक्त करून सगळें वातावरण भरून टाकण्यासाठीं ती अधीर झाली होती.

तिच्याकडे कौतुकानें व अभिमानानें पहात अशोकनें म्हटलें, 'नुसतें वादन उपयोगी नाहीं. तूं गायलं पाहिजेस, लीना.'

तिनें घंटा दाबली. नोकर आंत आला. तिनें फर्मावलें, 'आधीं चहा आण.'

तिनें खोलीच्या सहाहि खिडक्या झपाझप उघडल्या. दोन खिडक्यांतून सागराचें उदात्त, व्यापक दृश्य; दुसऱ्या दोन खिडक्यांतून डोंगरमाथ्याचा हिरवाचार भाग आणि बाकीच्या दोन खिडक्यांतून विस्तीर्ण शेतें, याप्रमाणें त्याच्या नजरेसमोर निसर्ग खेळूं लागला.

चहा आला. पावाला आपल्या हातानें लोणी लावून लीनेनें तो

अशोकपुढें करीत म्हटलें, 'आज तुम्ही भरपूर खाल्लं पाहिजे. नंतर गरम पाण्याची आंघोळ. नंतर विश्रांती.'

'आणि नंतर...... ?' अशोकनें प्रश्न केला.

'तुमच्याशीं खूप खूप गप्पा गोष्टी.' तिनें हंसत हंसत म्हटलें आणि तिच्या दांतांची कांति आणि तिच्या ओंठांची गोड हालचाल यांकडे पहात अशोकनें पावाचा तुकडा तोंडांत टाकला.

लीनेनें तारांवरून गज ओढला. त्याबरोबर दूधसागराच्या जलधारांवर फेस उत्पन्न होऊन त्यांचें नर्तन सुरू होतें त्याप्रमाणें त्या तरल तारांमधून भरदार स्वरमाला निघाली आणि त्या शांत वातावरणांत ती आंदोलन पावूं लागली.

आणि लगेच लीनेच्या तोंडून एका पोर्तुगीज गीताची पहिली ओळ हळुवार स्वरांत निघाली. मग स्वरांत चढउतार होऊं लागला आणि थोड्या वेळानें त्या काव्यांतील भावनांची भरती तिच्या शब्दाशब्दामधून व तिच्या चेहऱ्याच्या रेषेरेषेमधून व्यक्त होऊं लागली. आणि त्या तंतुवाद्यांतून निघणारें स्वरसंगीत आणि लीनेच्या हृदयांतून अन् मुखांतून निघणारें भाव-संगीत या दोन्ही संगीतांचा एकजीव होऊन जणूं काय एक दिव्य सुंदरी निर्माण झाली आणि दिव्य रूप धारण करून त्या शांत वातावरणांत नर्तन करूं लागली, असाच अशोकला भास झाला.

एवढे उज्ज्वल गुण जिच्या अंगीं आहेत अशी लीना आपली आहे या अभिमानाच्या भावनेनें त्याला स्वर्ग तोकडा झाला.

अशोक थोड्या वेळानें स्नानगृहांत आला. तेथील राजशाही व्यवस्था पाहून त्याला विचित्र वाटलें. आपली योग्यता नसतांना आपण या वैभवाचा उपभोग घेत आहों, असा जाचक स्वर त्याच्या अंतःकरणांतून निघाला.

आठ दिवसांच्या श्रमांनंतर त्यानें गरम पाण्याचा पहिला तांब्या अंगावर ओतला. तेव्हां त्याला जी गोड संवेदना झाली, तिच्यामुळें आपल्या अवयवांत नवीन चेतना शिरत आहे असेंच त्याला वाटलें. त्या उष्ण जलोदकाचा त्यानें मनमुराद आस्वाद घेतला.

कपडे बदलून तो खोलींत आला तेव्हां लीना मेजाशीं बसून पेन्सिलीनें कांहीं खरडीत होती. अशोक दृष्टीस पडतांच तिनें तो कागद लपविण्याचा प्रयत्न केला व तिच्या चेहऱ्यावर नाजूक भावांची पखरण झाली. अशोकनें तिच्या जवळ जाऊन म्हटलें, 'आम्हीं पहायचें नाहीं का?'

'तुम्हीं पहायचें नाहीं, अशोक.' गोरीमोरी होऊन तिनें म्हटलें.

पण अर्थ शब्दांना फसवीत होता. तिच्या डोळ्यांतील प्रेमळपणा, हालचालींतील लाडीकपणा पाहून अशोकनें तिच्या हातांतील कपटा हिसकून घेतला आणि तो उलगडून त्याच्यावर त्यानें नजर टाकली. लीनेनें लिहिलें होतें:—

'अशोक, माझे अशोक, माझे प्रिय अशोक,......'

लहान बालिकेप्रमाणें गोंधळून तिनें आपलें तोंड दोन्ही हातांनीं झांकून घेतलें. अशोकनें आनन्दभरानें तिची मान वर केली आणि तिच्या मस्तकावर वांकून तिचे केंस हुंगले. आणि आपले ओठ तो तिच्या कपाळाला टेकणार, इतक्यांत बाहेरून दारावर कोणी तरी टक् टक् असा आवाज केला.

लीना दचकून उठली. तिनें घाबऱ्याघाबऱ्या दार उघडलें. आणि आपल्या वडिलांची रुक्ष, उंच, गंभीर मूर्ति समोर दिसतांच ती यंत्रवत् चार पावलें मागें सरली.

# २२

'अशोक, तुम्हीं इथं यायला नको होतं.' पैरेरांनीं रागीट मुद्रेनें अशोककडे पहात म्हटलें.

त्यांच्या तोंडचा हा अनपेक्षित उद्गार ऐकून अशोक गोंधळांत पडला. प्रसंग सांवरून नेण्यासाठीं लीना म्हणाली, 'मींच त्यांना बोलावून घेतलं आहे, पपा.'

'अस्सं!' लीनेकडे वळून पेरैरांनीं उपरोधक स्वरांत म्हटलें. मुलीचें उत्तर ऐकून त्यांचा जळफळाट झाला. पण तिची करारी मुद्रा पाहून त्यांनीं आपला राग गिळला आणि वळून दाराच्या दिशेनें जातांना त्यांनीं अशोकला म्हटलें,

'तुम्ही इथून निघण्यापूर्वीं मला भेटूं शकाल का? मला तुमच्याशीं बोलायचं आहे.'

आणि इतकें बोलून पैरेरा निघून गेले.

वडिलांच्या आकस्मिक आगमनामुळें लीना सर्वस्वीं बदलली. तिचा मघांचा आनंद पार मावळून गेला. चिंतेची छाया तिच्या तोंडावर पसरली. आपण जें कांहीं बोललों तें सारें स्वप्नच होतें असें तिला वाटलें. अशोकचें आपल्यावर असलेलें प्रेम हें स्वप्न असून वडिलांचा राग हें सत्य आहे असें तिला दिसून आलें. यांपूर्वीं हा विचार तिला केव्हांच शिवला नव्हता.

कारण इतक्या लवकर प्रेमाच्या धाग्यानें आपण जवळ येणार असें तिला वाटलें नव्हतें. त्यामुळें वडिलांचा विरोध तिला आतां वेगळ्याच उग्र स्वरूपांत दिसूं लागला. व त्याचे प्रत्यक्ष परिणाम आपल्या सुखस्वप्नाला कसे बाधक होतील हें चित्र तिच्या मनांत घोळूं लागलें.

अशोकनें तिच्या मौनाचा भंग करून म्हटलें, ' लीना, अशी भितेस कां तूं ? '

' अशोक, ही भीति नाहीं. हें भविष्याचं दर्शन आहे. भावी गोष्टी मला आतां स्पष्ट दिसत आहेत. '

पुनः दोघेंहि स्तब्ध झालीं. हें लीनेच्या मनःस्थितीचें प्रतिबिंब अशोकच्या चेहऱ्यावर उमटल्याशिवाय राहिलें नाहीं.

' आपल्या मार्गांत अनंत अडचणी आहेत. त्यांना आपण तोंड दिलं पाहिजे. ' लीनेनें निश्चयाच्या आवाजांत म्हटलें. तिच्या मुद्रेवर आंतरिक निग्रहाची छटा पसरून गेली. सगळें वातावरण गंभीर झालें. बाहेरचे उष्ण वारे खिडकींतून आंत येऊं लागले.

' आमचं प्रेम, आमचं जीवन, आमचं समाजकार्य, या गोष्टी आतां भिन्न राहाणार नाहींत, अशोक. एक चक्र हललं म्हणजे आपोआप सगळ्या चक्रांना गति मिळते. ' ती तात्त्विक मोघम भाषेंत बोलत होती. संकटाची जाणीव पुरुषांपेक्षां स्त्रियांना अधिक शीघ्रतेनें होत असली पाहिजे असेंच तिच्या मनःस्थितीवरून म्हणतां येण्यासारखें होतें. प्रेमाची गोड धुंदी अद्याप अशोकच्या मनासमोर तरळत होती, परन्तु लीनेला कठोर वस्तुस्थिति स्पष्ट प्रकाशांत दिसत होती.

थोडा वेळानें दोघेंहि एकाच टेबलावर जेवलीं. आणि मग अशोक परेरांना भेटण्यासाठीं त्यांच्या खोलींत गेला.

जातां जातां लीनेनें त्याला सूचना केली, ' कांहीं झालं तरी मस्तक शांत ठेवायचं हं. '

अशोकवर नजर पडतांच पेरैरांनीं त्याला बसण्याची खूण केली. त्यानें चटकन त्यांच्या मुद्रेचें निरीक्षण केलें. तेवढ्यांत त्या माणसानें आपल्या आयुष्यांत ज्या दुटप्पी भूमिका पार पाडल्या आहेत त्याचे ठसे त्याला त्यांच्या चेहऱ्यावर उमटलेले स्पष्ट दिसले.

त्यांच्या बुद्धिमान् डोळ्यांत कोल्ह्याची धूर्तता सांठली होती. जिवणीच्या कोपऱ्यांत कारस्थानीपणाची झांक दिसत होती. लीनेच्या चेहऱ्यावरचे भाव किती वेगळे होते ! पण दोघांच्याहि बाह्यरेषा समान होत्या. या एवढ्या साम्यविरोधांचें त्याला आश्चर्य वाटलें. एकाच द्रव्याचीं घडवलेलीं हीं दोन भांडीं; पण एकांत दूध व दुसऱ्यांत दारू. तसाच या पितापुत्रीचा प्रकार होता.

पेरैरांची मुद्रा हळूहळू पालटत गेली. तिच्यावर त्वेष, काठिण्य दिसूं लागलें. तिरस्काराची छाया पसरीत तुच्छतेच्या भावनेचीहि त्यांत भर पडली. थोड्याच अवधींत क्षुद्र विचारांचें तें रणमैदान झालें असेंच अशोकला वाटलें.

‘ अशोक, ’ त्यांनीं कर्कश स्वरांत म्हटलें, ‘ तुम्ही आमच्या कुटुंबाच सध्यां विध्वंस आरंभला आहे. यांत तुम्हांला मोठें समाधान वाटत असेल, नाहीं ? ’

आणि इतकें बोलून त्यांनीं जोरजोरानें खोलींत येरझारा घालायला सुरुवात केली. जणूं काय, मन व देह यांच्या गतींत त्यांना संगति राखायची होती.

अशोकनें पाहिलें कीं पेरैरांच्या अंगांत एक दुष्ट शक्ति संचरली आहे. चारशें वर्षांच्या परकी सत्तेनें व ख्रिस्ती धर्मानें ही शक्ति निर्माण केली आहे. सगळ्या सत्ताधारी ख्रिश्चनांत ती कमी अधिक अंशांत वास करीत आहे. हिंदूंशीं संबंध आला म्हणजे ही शक्ति उग्र स्वरूपांत थैमान घालूं लागते. हिंदु धर्म, हा बुद्धि, संस्कृति, या सगळ्याच दृष्टींनीं निकृष्ट

असून त्याचें भवितव्य खिश्चनांच्या हातांत असलें पाहिजे ही भयानक विचारसरणी आत्मसात् केल्यामुळें त्याला तुच्छ लेखण्याची जी वृत्ति खिश्चनांत आहे, तिचा परिपाक पेरैरांत झालेला आहे, असें अशोकला दिसून आलें आणि त्याच्या डोळ्यांत प्रतिकाराची चमक दिसूं लागली. तो योग्य तें उत्तर देणार तोंच त्याला लीनेची सूचना आठवली आणि त्यानें मनाशीं ठरविलें कीं, कांहीं झालें तरी शांतपणा सोडायचा नाहीं.

तो गप्पच राहिला. ' तुम्हीं माझ्या पोरीला वाईट मार्गाला लावलंत ! ' पेरैरानीं हातवारे करीत म्हटलें.

' तुमच्या शिकवणींत आणि तेंहि खिस्ती धर्माच्या छत्राखालीं वाढलेली लीना वाईट मार्गाला लागली असें तुम्ही कसें म्हणूं शकतां ? ' अशोकनें प्रश्न केला.

त्याचें भाषण ऐकलें न ऐकल्यासारखें करून पेरैरा बोलूं लागले, ' अशोक, तुम्ही पोरीला आपल्या नादीं लावलंत ! '

' असं मीं काय केलं तें सांगाल का तुम्ही ? '

' तुम्हीं तिच्या मस्तकांत भलतं वेड भरलं. ती आतां वेडी झाली आहे. घरदार, वडील, धर्म, यांपैकीं कोणत्याच गोष्टीला ती आतां जुमानीत नाहीं ! '

एक एक शब्द ते ठासून बोलत होते. अशोकच्या उत्तराची अपेक्षाच जणूं काय ते करीत नव्हते.

थोड्या वेळानें त्यांनीं आपलें भाषण चालू केलें, ' राष्ट्रीयत्वाच्या भलत्या कल्पना तुम्हीं तिच्या मनांत भरविल्या. '

फिरून त्यांची येरझार सुरू झाली. अशोककडे ते वळूनसुद्धां पहात नव्हते. जणूं काय त्याच्याकडे संभाषण करण्यासारखी अन्य अपमानास्पद गोष्ट त्यांना नव्हती.

'आणि तिच्या मनावर तुम्हीं ताबा मिळवलात.' आणखी एक वाक्य तारस्वरांत अशोकच्या कानावर आदळलें.

'हें सगळें तुम्ही कां करीत आहांत हें मला चांगलें माहीत आहे. तुम्हांला इथं ख्रिस्ती धर्माचा नायनाट करावयाचा आहे. तुम्हांला फिरंगी सत्तेला इथून हांकून लावायला पाहिजे, नाहीं का ?' त्यांनीं अशोककडे पाहून त्याला प्रश्न केला. त्या वेळीं त्यांच्या मुद्रेवर जे भयाण भाव पसरले ते त्याला असह्य झाले.

'पण एवढ्यानं झालं नाहीं. तुम्हांला माझी लीना पाहिजे आहे आणि या सगळ्यापेक्षां माझ्या इष्टेटीवर तुमचा डोळा आहे.'

आतां त्यांनीं आपले उग्र रागीट डोळे अशोकवर स्थिर केले आणि मेस्मेरिझमचा प्रयोग करणाऱ्या जादूगाराप्रमाणें अशोकच्या प्रतिक्रियेची ते वाट पाहूं लागले.

'तुमचं बोलून झालं का ?' अशोकनं वरकरणी शांतपणानें विचारलें, परंतु मनावरचा त्याचा संयम उडत चालला होता.

'पण अशोक, तुमचा हा उपद्व्याप शेवटीं पोरखेळ ठरेल एवढं लक्षांत ठेवा.' त्यांनीं निग्रही स्वरांत म्हटलें.

अशोकनें हंसल्यासारखें केलें. जणूं काय पेरैरांच्या त्वेषाची, तिरस्काराची, धाकाची आपल्याला पर्वाच नाहीं अशा पवित्र्यांत त्यानें उत्तर केलें. 'मग तुम्ही इतकं कां भ्यावं ?'

'माझ्या अब्रूसाठीं ! गेल्या चारशें वर्षांत कुणीं पाहिली नाहीं, कुणीं ऐकली नाहीं, ती गोष्ट माझ्या कुटुंबांत मला घडलेली नको आहे. त्यापेक्षां मी मरण पतकरीन.' एकाच क्षणापूर्वीं अशोकला त्यानीं जें उत्तर केलें होतें त्याच्याशीं सर्वस्वीं विसंगत असें वाक्य ते बोलून गेले.

'अशी कोणती गोष्ट ?' अशोकनें विचारलें.

'तुम्ही निर्लज्ज आहांत ! सगळं कांहीं ठाऊक असून तुम्हीं मुद्दाम हें वेड पांघरताहांत. तुमचं लीनाशीं लग्न शक्य आहे असं का तुम्हांला वाटतं ? ज्या दिवशीं ही गोष्ट घडूं पाहील त्या दिवशीं या भूमीला तुम्हांला मुकावें लागेल आणि आफ्रिकेच्या जंगलांत खडी फोडण्याचा तुमच्यावर प्रसंग येईल, समजलांत ? '

या वेळचा पेरैरांचा आवेश अशोकला राक्षसी वाटला. ज्या 'इंक्वीझीशन'च्या सत्तेनें हिंदुत्वाचा क्रूरपणानें संहार चालविला होता ती सत्ता कोणत्या जातीच्या माणसांच्या हातीं होती हें त्याला आतां कळून आलें.

कांहीं वेळ निघून गेला. बाहेरच्या उन्हाची रखरख आंत जाणवत होती. कॅलेंडरवरची फेब्रुवारीची तेरा तारीख उठून दिसत होती. समुद्र-किनाऱ्यावर गिधाडांच्या चाललेल्या फेऱ्या नजरेला पडत होत्या.

'एवढी शिक्षा करण्याचं अंगीं सामर्थ्य असतांना तुम्ही जिवाची ही व्यर्थ आटापीट कां करतां ?' अशोकनें प्रश्न केला.

'तुम्हां दोघांचें नुकसान होऊं नये म्हणून. लीना माझी मुलगी आहे ! '

'पण या प्रकरणांत मीं काय करावं हें तुम्हीं सांगितलं नाहीं.' अशोकनें म्हटलें.

'अशोक, तुम्ही हिंदु आहांत...'

'हं.' अशोकनें नुसती मान हलवून हुंकार दिला.

'अन् आम्ही ख्रिश्चन आहोंत.' पेरैरांनीं वाक्य पुरें केलें.

'हें मला कबूल आहे. पण तुम्ही एका काळीं हिंदु होतां आणि आतां शुद्धिकृत गावड्यांप्रमाणें तुम्हांलाहि परत हिंदु होतां येईल.' अशोकनें धीमेपणानें म्हटलें.

'अशोक, तुम्ही शुद्धीवर आहांत ?' पेरैरा किंचाळले.

'म्हणूनच तर मी तुम्हांला तशी सूचना केली.'

'तुमच्या त्या दरिद्री गावड्यांची काय गत होईल तें दिसणार आहे

तुम्हांला थोड्याच दिवसांत. घरादाराचा त्याग करून त्यांना देशोधडीला लागावें लागेल.'

'असं का ?' अशोकनें कृत्रिम आश्चर्य प्रगट करीत विचारलें.

'माझं म्हणणं तुम्हांला कळलं आहे. आतां आणखी थोडं ऐका. तुम्हांला पाहिजे तें राजकारण तुम्ही करा. त्यासंबंधीं मी तुम्हांला कांहींच सांगत नाहीं. पण यापुढं तुम्हांला लीनेची भेट घेतां येणार नाहीं.' पेरैरांनीं निक्षून सांगितलें.

'पण हें तुम्हीं लीनेलाच कां नाहीं सांगत ?'

'लीना स्त्री आहे. तुम्ही पुरुष आहांत. तुमची जबाबदारी मोठी आहे.'

'मोठी असली तर ती स्वीकारायला माझी तयारी आहे.' त्यानें निर्भयपणें उत्तर केलें.

'मग तुम्ही लीनेचा नाद सोडणार नाहीं म्हणतां ?' त्यांनीं क्रोधाविष्ट होऊन विचारलें.

'लीना माझा नाद सोडणार, मी तिचा नाद सोडणार कीं आम्ही दोघेंहि एकमेकांचा नाद सोडणार, हें मी कसं सांगूं ?'

'तोंड आवरा, अशोक.' ते ओरडले. त्यांच्या येरझारांची गति अकस्मात् वाढली आणि त्यांची मुद्रा अधिकच उग्र झाली. त्यांचे ओठ कांपूं लागले. त्यांचे डोळे लालबुंद झाले. चेहरा संतापानें फुलून आला. समुद्राची लाट खडकावर फुटून नष्ट व्हावी, अशाच प्रकारचा आपला हा त्वेष आहे या जाणिवेमुळें त्यांचा संताप अनावर झाला. त्यांनीं झटकन मेजाचा खण उघडला. त्यांतून पिस्तूल काढलें आणि अशोकला तें दाखवीत ते कडाडले, 'अशोक, इथून काळं करा. नाहीं तर मरून जाल.' सूड व वैताग यांच्या भरांत उच्चारलेले हे शब्द घरभर दुमदुमले आणि क्षणार्धांत खोलीचें दार खाडकन लोटून लीना विद्युद्वेगानें आंत आली आणि—

पेरैरांचा रुद्रावतार आणि त्यांच्या हातांतील पिस्तूल पाहून ती दचकली व पांढरी पडली. पण लगेच दोन पावलें पुढें टाकून कृत्रिम धैर्यानें अशोकला मागें सारीत ती वडिलांसमोर जाऊन उभी राहिली आणि त्यांच्या खदिरांगार दृष्टीवर आपली निर्भय दृष्टि रोखून तिनें सकंप स्वरांत म्हटलें, ' पपा, पिस्तूल माझ्यावर झाडा... ! '

लीनेच्या या अचानक साहसी कैवारानें सगळेंच दृश्य पालटलें. पेरैरांचा हात खालीं गेला. पिस्तूल आपोआप खणांत गेलें आणि त्यांची मान खालीं झाली. वीरस्त्रीप्रमाणें ती उद्गारली,

'अशोक, या नरकांत क्षणभर देखील राहूं नका अन् मीहि पण रहाणार नाहीं. ' तिच्या स्वरांतून निघालेल्या तिरस्काराच्या, धिक्काराच्या आणि घृणेच्या वाफाऱ्यानें सारें वातावरण भरून गेलें.

# २३

अशोक लीनेच्या बंगल्यांतून बाहेर पडला तेव्हां त्याची मनःस्थिति केविलवाणी झाली होती. प्रणयाचें भेसूर स्वरूप त्याला आतां स्पष्ट दिसत होतें. डोळ्यांपुढील कल्पनारम्यतेचा शुभ्र विरल पडदा फाटून गेला होता व पलीकडच्या भयाण काळ्याभोर आकृतींचा नंगानाच त्याला आतां भेडसावीत होता. प्रेमाच्या प्रवाहांत नकळत सांपडून तीं दोघेंहि वहात वहात सुखानें येथपर्यंत आलीं होतीं आणि आतां अचानक रीतीनें पाण्याचा विक्राळ भोंवरा समोर गरगरत होता. त्याच्याशीं झुंज खेळून टिकाव धरण्याची शक्ति त्यांच्यांत होती हें खरें; पण घडलेल्या प्रकारांतील भयानक चमत्कृतीमुळें अशोक आतां घाबरून गेला.

निरनिराळे प्रश्न त्याला सतावूं लागले. किती झालें तरी लीना ख्रिस्ती आहे, आपण हिंदु आहों. हा धर्मभेद आपण मानीत नसलों तरी समाज मानल्याशिवाय रहाणार नाहीं. आपले वडील, घरची इतर मंडळी आपला धिक्कार करतील. पेरैरांनीं तर आपली भूमिका स्पष्ट केलीच आहे. कोणतेंहि कृष्ण कारस्थान ते आपल्या विरुद्ध रचूं शकतील. लीना स्वाभिमानी असल्यामुळें घराचा त्याग करील अन् पुढें...

या शंकेचें समाधान त्याला करतां आलें नाहीं.

तो घरीं आला. वर्षाला पुरेल इतका तांदुळ त्यानें आपल्याबरोबर

आणला होता. व्यक्तिगत प्रश्न सुटला होता. पण हजारों लोकांच्या निर्वाहाचा प्रश्न त्याला अधूनमधून जाचीत होता.

घराच्या व्हरांड्यांत मांजरीचीं तीन गोजिरवाणीं पिलें बागडत होतीं. थोड्याच दिवसांपूर्वीं तीं जन्माला आलीं होतीं; पण त्यांच्या जीवनशक्तीची वाढ किती झपाट्यानें होत होती ! त्यांचे चिमुकले मिस्किल डोळे सारखे चमकत होते. त्यांच्या शेपट्या वरखालीं होत होत्या. त्यांची लव फुलत होती. आणि तीं एकमेकांच्या ज्या खोड्या करीत होतीं, त्यांवरून त्यांच्या जीवनांतला गाढ आनंद उतूं जातांना दिसत होता. इतक्या अल्पावधींत त्या चिमण्या जीवांचा झालेला तो द्रुत विकास आणि ते घेत असलेला जीवनाचा तो निर्भर आस्वाद यांच्या मोहक दृश्यानें तो आपल्या साऱ्या वेदना विसरून गेला. त्यानें ते गोजिरवाणे जीव उचलले. फुलाच्या हळुवारपणानें त्यानें त्यांना आरतेंपरतें केलें. त्यांना हुंगलें आणि नेहमीं-प्रमाणें त्याच्या अंगांत नवचैतन्य शिरलें. बाहेरचीं सगळीं दृश्यें विसरून तो एका क्षणांत कल्पनेच्या भावनेच्या गोड व धुंद साम्राज्यांत रमून जाण्यासाठीं त्याला हे प्राणी उपयोगी पडत, या गोष्टीचा प्रत्यय त्याला अधिकच उत्कटपणानें आज आला.

एवढ्या अवधींत बाकीची चतुष्पाद मंडळी केवळ त्याच्या वासासरशीं त्याच्या भोवतीं गोळा झाली आणि बेभान होऊन नाचूं लागली. आपल्या आवडत्या धन्याचा आठ दिवसांचा वियोग म्हणजे काय थोडा झाला ? या दिवसांत त्यांनीं किती तरी योजना करून ठेवल्या असतील. प्रत्येकानें त्याला आवडण्यासारखे खेळ करून दाखविण्याचें ठरविलें असेल. रामानें त्याच्या कुशीच्या उबेंत झोंपण्याचें ठरविलें असेल. हुसेननें पाय संभाळण्याचें योजलें असेल. लक्ष्मणानें त्याच्या अंगावर आरूढ होण्याचें मनोराज्य केलें असेल. याप्रमाणें त्या मुक्या पण प्रेमळ प्राण्यांनीं किती तरी बेत केले असतील.

इतक्यांत कुत्रीहि आली. अशोकला तिची केवढी काळजी लागून राहिली होती ! ती आतां पूर्वीप्रमाणें हुषार, आनंदी, गुबगुबीत झाली होती.

हिरा आणि काकी बाहेर आल्या. त्यांच्यापाशीं त्यानें खूप गप्पागोष्टी केल्या. आंघोळीसाठीं पाणी तापवण्याची मोलकरणीला वर्दी द्यायला लावली. प्रवासांतील दगदगीनें त्याचें अंग अजून ठणकत होतें. म्हणून त्यानें तैलमर्दन करून घेण्याचें ठरविलें. बागेंत जाऊन त्यानें फुलझाडांवर नजर टाकीत टपाल वाचलें. पुस्तकांची चाळवाचाळव केली. मनाच्या मोकळ्या वृत्तीनें त्यानें दोन तासांत कितीतरी काम उरकून घेतलें.

संध्याकाळच्या वेळीं हिरेला बरोबर घेऊन तो फिरायला निघाला तिनें वाटेंत त्याला हळूच विचारलें, 'सकाळीं कुठं होतास ?'

त्याच्या उडवाउडवीच्या उत्तरानें तिचें समाधान झालें नाहीं म्हणून तिनें पुन्हा विचारलें, 'लीनेकडे नाहीं गेलास ?'

'तुला कुणी सांगितलं ?' त्यानें प्रश्न केला.

'हल्लीं तूं तिच्याबरोबर फिरत असतोस हें का आम्हांला माहीत नाहीं ?'

'लीना आवडते का तुला ?' अशोकनें पृच्छा केली.

'हो तर. फार सुंदर अन् प्रेमळ आहे ती. लोक म्हणतात तूं तिच्याशीं आतां लग्न करणार.'

हिरेच्या तोंडचे हे उद्गार ऐकतांच अशोक चमकला. आपल्या व लीनेच्या स्नेहाला लोकांनीं इतक्यांत असलें स्वरूप दिलें याचें त्याला नवल वाटलें.

हिरा म्हणाली, 'भाऊ, मग लोक म्हणतात तें खरं का ?'

'तुला पसंत आहे ना लीना ?'

'पण ती तर ख्रिश्चन आहे.' हिरेनें आपली भीति व्यक्त केली.

'तिला हिंदु होतां येईल. खिस्ती गावडे हिंदु नाहीं का झाले ?' अशोकनें तिचें समाधान केलें.

‘ पण तात्या मान्य करतील का हें ? काकीला पसंत आहे. ’

‘ काकीनें सांगितलं का तुला ? ’

‘ त्या दिवशीं काकी म्हणत होती, अशोकनें लीनेला बायको म्हणून घरांत आणली तर आपल्याला आनन्दच वाटेल. ’ हिरेनें सांगितलें.

‘ पण लीना ख्रिश्चन आहे हें माहीत नसेल तिला. ’

‘ तिला माहीत आहे. पण तिचं असं म्हणणं कीं लीना स्वतःला हिंदु म्हणवते; मग ती हिंदुच आहे. नाहीं तरी ती मुळची ब्राह्मणच होती. ’

भावी गोष्टींची शक्यता अजमावून अशोकनें समाधानाचा निश्वास टाकला.

तो घरांत परत आला. तेंव्हां त्याला वडिलांकडून आलेली तार मिळाली. ते अत्यवस्थ असल्यामुळें ताबडतोब निघून येण्याबद्दल तारेंत कळविलें होतें.

## २४

पोशाख करून तो ताबडतोब निघाला. तो गांवीं पोंचला तेव्हां आठ वाजले होते. अंधार पडला होता. गांवांतील रस्त्यावरचे दिवे मिणमिण जळत होते. अनुकूल-प्रतिकूल कल्पनांनीं त्याचें हृदय धडधडत होतें. त्याचें मन अगदीं हलुवार झालें होतें. जणू काय आकाशांत उडणारा बिसतंतूच. वडिलांच्या मोठेपणाची खूण नुकतीच कुठें आपल्याला पटत चालली होती तोंच ते निघून गेले असतील काय ?

या कल्पनेबरोबर त्याच्या प्रकृतींतील सगळ्या प्रेमळ, नाजूक वृत्ती एकदम उचंबळून आल्या. ज्या भावनेची प्रतीति त्याला अद्याप आली नव्हती, कल्पनेनेंहि कधीं आली नव्हती, त्या भावनेच्या आवेगानें त्याचें शरीर इतकें कंपित झालें कीं आपण आतां घरांत पाय कसा ठेवणार हेंच त्याला कळेना. अशा मनःस्थितींत त्याला दिसून आलें कीं,आपल्या साऱ्या आयुष्यांत आपण पितृविषयक कर्तव्याला चुकलों. वडिलांच्या विचार-सरणीचा आपण सहानुभूतीनें केव्हांच विचार केला नाहीं. त्यांच्या सुख-दुःखाबद्दल आपण नेहमींच उदासीन राहिलों. त्यांचीं जीवनविषयक मूल्यें भिन्न असतील; पण ज्या परिस्थितींत ते वाढले आणि त्यांनीं संसार केला, त्या परिस्थितीला कांहींच किंमत न देतां स्वतःच्या आंतरिक प्रवृत्तीनुसार आपण वागत गेलों आणि भावनाप्रधान असूनहि त्यांच्या बाबतींत आपण भावनाशून्य झालों.

आपण लोकांवर प्रेम केलें, कुत्र्यामांजरांसारख्या जनावरांवर देखील मायेची पांखर घातली; दुसऱ्याचें दुर्दैव आपल्याला कल्पनेनें देखील पाहवत नाहीं; दुसऱ्यांच्या सुखासाठीं आत्यंतिक त्याग करण्याची आपली तयारी आहे; मग वडिलांच्या बाबतींत आपल्या हातून जें रुक्ष, कठोर वर्तन घडलें तो आपला फार मोठा गुन्हाच नाहीं का ?

ते आपल्या सुखदुःखाबद्दल उदासीन राहिले हें खरें. पण त्यांच्या उपदेशाप्रमाणं आपण वागलों नाहीं, म्हणूनच आपल्याला कर्तृत्वाचें पूर्ण स्वातंत्र्य मिळावें या हेतूनें त्यांनीं आपला आयुष्यक्रम आपल्यापासून अगदीं अलग असा घालविला, ते आपल्याशीं भांडलेतंडले नाहींत, त्यांनीं आपल्याला कोणताच विरोध केला नाहीं.आपलं भवितव्य ठरविण्याचा हक्क त्यांनीं सर्वस्वीं आपल्याकडे सोंपविला. मग मात्र त्यांनीं आपली कधीं चौकशी केली नाहीं. आपल्या तत्त्वनिष्ठेच्या आड ते कधींच कोणत्याहि कृतीनं आले नाहींत. कठोर व्यवहाराचं ज्ञान जें आपल्याला आतांच कुठं होऊं पहात आहे, तें त्यांनीं आपल्याला सुरुवातीलाच सांगितलं; पण आपण तिकडे दुर्लक्षच केलं.

आपलं तत्त्वज्ञान हें आपल्या बुद्धींतून, भावनांतून निघालं. संसाराच्या मंथनांतून निघालं नव्हतं. त्यामुळं त्यांच्या मनोवृत्तीचा आपण नेहमींच अधिक्षेप केला. त्यांना ही जाचक जाणीव खात्रीनं असली पाहिजे. आपल्या प्रेमाची, आपल्या त्यागाची कल्पना आपल्या मुलाला नाहीं, हा विचार त्यांना दुःसह झाला असला पाहिजे. आपल्याविषयीं त्यांच्या मनांत वात्सल्यभावना का नव्हती ? आपल्या हिताबद्दल जागरूकता त्यांनीं दाखवली नाहीं असं का म्हणायचं ? दहा लोकांसारखेच ते प्रवाहपतित होते, हा का त्यांचा दोष आहे ? त्यांनीं दहाजणांप्रमाणं नोकरी केली, दहाजणांप्रमाणं आपल्याला नोकरी करण्याचा त्यांनीं उपदेश केला. कारण नोकरीशिवाय अब्रूनं जगणं इथं किती कठीण

आहे हें त्यांना माहीत होतं. तत्त्वनिष्ठेचं महत्त्व त्यांना अवगत नव्हतं असं नाहीं. पण आपल्या मायेच्या माणसाच्या आयुष्याचं मातेरं तत्त्व-निष्ठेपायीं व्हावं, हें त्यांना नको होतं. आपल्यावरील आत्यंतिक प्रेमामुळंच त्यांना असं वाटत होतं. तत्त्वनिष्ठेच्या प्रखरतेमुळं आपल्या आयुष्याचा कोश करपून जात आहे, हें त्यांना कळून चुकलं होतं. हें प्रखर सत्य पाहण्याचं धैर्य त्यांच्या प्रेमळ नजरेंत नव्हतं.

आपली तत्त्वनिष्ठा—दिखाऊ, बोलघेवडी तत्त्वनिष्ठा त्यांच्या या मूक त्यागापुढं हिणकस ठरते. त्यांनीं शांतपणानं आंतरिक कलहाचं दुःख सोसलं. कधीं हूं कीं चूं केलं नाहीं. या कलहाचीभव्यता आपल्याला कधीं कळली नाहीं. तत्त्वनिष्ठेच्या दर्पातच आपण गर्क राहिलों. पुत्रकर्तव्य विसरलों. तात्यांना सुखी करूं शकलों नाहीं. आपण नोकरी सोडल्यामुळं त्रासांत पडलों असूं, या कल्पनेनं त्यांनीं आपल्याला आर्थिक साह्य केलं हें का औदासीन्याचं लक्षण मानायचं कीं आत्यंतिक कळकळीचं ? तत्त्वांच्या मोठेपणाला आपण भुललों. पण जीवनांतील दुःखांशीं झगडतांना, व्यवहारांतील साध्या माणसांना देखील जो मोठेपणा प्राप्त होतो, तो आपली भावना आकळूं शकली नाहीं. दिव्यत्व हें तत्त्वामुळं येतं तसंच तें हाल-अपेष्टांमुळं येतं. वडिलांचं व्यक्तित्व हें त्रासांतून घडलेलं आहे. म्हणून तें श्रेष्ठ आहे. त्याला आपला प्रणाम असो...

विचार करतां करतां अशोकला गहिंवर आला. वडिलांचें व्यक्तिमत्त्व त्याला आतां शतपटीनें मोठें दिसूं लागलें. आणि स्वतःचें लहानपण त्याला सहस्रपटीनें जाणवूं लागलें. स्वतःचे गुण त्याला दोषपूर्ण दिसूं लागले आणि वडिलांच्या दोषांना देखील गुणांचें सौंदर्यावरण चढत असल्याचा त्याला भास झाला.

हळुवार काळजानें तो घरांत शिरला. आपल्या कानावर वाईट बातमी पडेल का, ही भीति त्याला चोरी करूं पहाणाऱ्या गुन्हेगाराच्या भीतीपेक्षांहि

अधिक जाचक झाली. घरच्या एका माणसानें त्याला वाटेंत सांगितलें : 'वडील अत्यवस्थ आहेत....'

त्यानें क्षणिक समाधानाचा सुस्कारा सोडला. जें भयानक दृश्य आपल्याला दिसेल म्हणून तो भीत होता तें दृश्य सुदैवानं तात्पुरतें तरी टळलें होतें.

तो खोलींत आला. त्याचे वडील एका खाटेवर झोपले होते. शेजारीं घरची मंडळी गोळा झाली होती. दम्याच्या विकारानें ते तळमळत होते. त्यांनीं डोळे झांकून घेतले होते. त्यांच्या जिवाची धडपड त्यांच्या भकास व क्षीण चेहऱ्यावर प्रतिबिंबित झाली होती.

कुणीतरी मोठ्यानें म्हटलें, ' अशोक आला आहे. ' हे शब्द कानांवर पडतांच त्यांचीं इंद्रियें व इच्छाशक्ति यांचा जणूं काय झगडा सुरू झाला. त्यांनीं हळूहळू डोळे उघडले. त्यांतील लुप्त होणाऱ्या शक्ती त्यांनीं केंद्रित करण्याचा प्रयत्न केला आणि अशोककडे मान वळवून हळूच म्हटलें, ' आलास ? '

' हो. ' त्यानें इतकेंच उत्तर दिलें. भावनांच्या आवेगांत त्याच्या तोंडून शब्द फुटेना.

त्यांनीं त्याला बसण्याची खूण केली. तो खाटेवरच बसला. खोलींत घुटमळणारी मंडळी बाहेर जाऊं लागली. अननुभूत अशा विचारशक्तीची एक लाट आपल्या अंतरंगांत उठत असून ती गळ्यापर्यंत येऊन तेथें धडका मारीत आहे आणि त्यामुळें आपलें शरीर गदगदां हलत आहे असें त्याला वाटलें. वडिलांच्या मनांत आपल्याला कांहींतरी सांगावयाचें आहे, हें त्याला स्पष्ट दिसत होतें. त्यांच्या डोळयांत तरंगत असलेले भाव त्याला सर्वस्वीं नवीन होते. त्यांचें पूर्ण आकलन करणें त्याला शक्य झालें नाहीं. कारुण्य, असहाय्यता, विरक्ति इत्यादि कितीतरी भावनांचें तुंबळ रण तेथें माजून राहिलें होतें. तें पाहून वडिलांची ही शेवटची घटका आहे

अशी त्याची खात्री झाली. या विचाराबरोबर त्यानें एवढा वेळ दाबून धरलेला दुःखावेग त्याला अनावर झाला आणि त्याला पहिला जोराचा हुंदका फुटला.

वडिलांच्या हें लक्षांत आलें. त्यांच्या मुद्रेवर भावनांची विचित्र चाळवाचाळव झाली आणि त्यांच्या उदास गंभीर नेत्रांत पाणी चमकलें.

त्यांनीं मोठ्या प्रयासानें ताह उचलला आणि तो त्याच्या पाठीवरून फिरवला.आणि मग त्यांनीं घोगऱ्या आवाजांत म्हटलें,'ही घे.'त्यांनीं एक लहानशी चावी त्याच्या पुढें केली आणि जवळच्या आलमारीकडे नजर टाकून म्हटलें 'तुझ्या कार्यासाठीं.'

अशोकच्या लक्षांत सारा प्रकार येऊन चुकला.आपण जें जीवन पतकरलें होतें त्यांतील वैभवाचा फोलपणा सुरुवातीपासून जाणून वडिलांनीं जी त्यागी, विरक्त वृत्ति धारण केली होती तिचें मोल त्याला कळून आलें. आणि ज्याला आपण चिकूपणा समजून त्यांचा अधिक्षेप केला, त्याला कोणतें उदात्त नांव देणार ह्याच त्याला प्रश्न पडला.

अशोकनें हुंदके आवरले आणि पुढें केलेली चावी न घेतां त्यानें म्हटलें, 'तात्या, तुम्ही लवकर बरे व्हा.'

ते हंसले. जणूं काय 'तूं वेडा आहेस!' असेंच त्यांना म्हणावयाचें होतें. त्यांनीं पुन्हां हात पुढें करीत आग्रही स्वरांत म्हटलें 'ठेव.'

त्याला आतां ती घेतल्याशिवाय गत्यंतर नव्हतें. वडिलांच्या या मूक गुप्त त्यागांत उच्च भावनांचें सगळें जग सामावलें आहे असें त्याला वाटलें. तत्त्वनिष्ठ जीवन आपण पतकरलें, लौकिक व मानसिक दृष्टीनें या श्रेयाच्या समाधानाचा आपण आस्वाद घेतला, पण तत्त्वनिष्ठेपासून उद्भवणारीं खरीं दुःखें मात्र वडिलांनींच सोसलीं. आपण ज्या दिवशीं सरकारी नोकरीचा त्याग केला त्या दिवसापासून त्यांनीं जणूं संन्यस्त जीवन पतकरलें.

या शेवटच्या विचाराबरोबर आपलें आयुष्य हा एक फार्स आहे, आपण एक गुन्हेगार आहों आणि जें तत्त्वज्ञान वडलांनीं आपल्या इतक्या आग्रहानें सांगितलें त्याच्या श्रेष्ठतेची कबुली त्यांच्या शेवटच्या घटकेला देत आहों असें त्याला दिसून आलें आणि विचारांच्या व भावनांच्या या कल्लोळांत त्यानें वडिलांचे दोन्ही हात आपल्या हातांत घेतले आणि त्यांच्या छातीवर मान वाकवली. त्याबरोबर त्यांनीं आपल्या हातांनीं त्याचें मस्तक दाबून धरलें. त्याला फिरून हुंदके आले. वडिलांच्या प्रेमळ व उत्कट हस्तस्पर्शानें त्याचें सर्वांग थरथरून गेलें आणि तो स्फुंदस्फुंदून रडूं लागला.

# २५

दुसऱ्याच दिवशीं त्याचे वडील वारले. त्याला परम दुःख झालें. प्रेमाचें व उपदेशाचें छत्र त्याच्यावरून ढळलें होतें. त्यामुळें मित्रांचा व नातेवाइकांचा परिवार असूनहि त्याला असें वाटलें कीं आपल्या जिव्हाळ्याची माणसें या जगांत फार थोडीं आहेत.

श्राद्ध वगैरे विधि उरकून तो बारा दिवसांनंतर आपल्या बिऱ्हाडीं आला. शेवटच्या दिवशीं वडिलांनीं दिलेल्या चावीची त्याला आठवण झाली. त्यानें कृतज्ञता, आदर, इत्यादि भावनांनीं अलमारी उघडली. तींत त्याला एक थैली मिळाली. जवळच एक कागद ठेवला होता. त्यावर 'अशोकच्या कार्यासाठीं' एवढे शब्द लिहिले होते.

हा मजकूर वाचून आपल्या हृदयाच्या चिंधड्या उडत आहेत असें त्याला वाटलें. पै-पैशाची काटकसर करून आणि आपल्या साऱ्या गरजा मारून वडिलांनीं जी रक्कम सांठविली होती ती त्याच्या कार्यासाठीं होती. आपली असीम कृतज्ञता व आदरभाव व्यक्त करायला देखील त्याचे वडील हयात नव्हते. धुराच्या लोटानें घराचें एखादें दालन भरून जावें तसेंच त्याच्या मनाचें झालें. तें गुदमरून गेलें.

दोनच दिवसांनतर लीना त्याच्या भेटीला आली. तिला त्याच्या वडिलांच्या मृत्यूचें वर्तमान कळलें होतें. त्यामुळें त्याची भेट घेणें तिच्या जिवावर आलें.

ती त्याच्या खोलींत गेली. तिचा जीव जड झाला. तिच्यावर नजर पडतांच अशोकनें तिला बसायला सांगितलें.

ती बसली. पण संभाषणाला सुरुवात कशी करणार हें तिला कळेना.

ही स्तब्धता मोठी जाचक असते. सुधारणेच्या संस्कारामुळें माणसाला गळा काढून रडणें शक्य नसतें आणि भावनांचें जग मोठें असल्यामुळें दुःखाची व्याप्ति व खोली फार मोठी असते. अशा पेंचांत सांपडल्यामुळें हृदयांत उठलेल्या वेदना तेथेंच दडपून टाकाव्या लागतात. त्यामुळें जीव हैराण होतो.|

अशोकचें असेंच झालें. त्याची ही मनःस्थिति लक्षांत येतांच लीनेनें म्हटलें, ' इथं केव्हां आलांत ? '

' कालच. ' इतकें बोलून त्यानें दहा हजारांची थैली व सोबतचा कागद आणून लीनेला दाखवला. आणि मग कांहीं वेळानें त्यानें म्हटलें, 'वडिलांचा हा त्याग पाहिला म्हणजे मला माझ्या कार्याची लाज वाटते.'

आणि त्यानें थोडक्यांत वडिलांच्या आयुष्याचें सार तिला सांगितलें. दुहेरी आयुष्यामुळें त्यांनीं सोसलेल्या यातनांबद्दल तिलाहि हळहळ वाटली. आणि त्याच वेळीं आपल्या पपांची आठवण होऊन तिनें म्हटलें, ' अशोक, तूं पोरका झालास. पण माझी स्थिति किती वाईट आहे, याची तूं कल्पना कर. '

आणि तिनें दीर्घ निश्वास टाकला.

' खरंच. तुझे वडील हयात असून तूं पोरकी आहेस... '

हें सांगतांना त्याच्या मनांत पिस्तुलाचा प्रसंग उभा राहिला आणि लीनेनें पपांचा संबंध तोडल्यामुळें तिला किती त्रास झाले असतील हा विचार त्याच्या मनांत येऊन गेला.

अशोकची आर्थिक स्थिति समाधानकारक नाहीं, याची तिला जाणीव होती. दहा हजार रुपयांचें हें अकल्पित साह्य लाभल्यामुळें

त्याच्या डोक्यावरील जबाबदाऱ्यांचें ओझें त्याला सुसह्य होईल या विचारानें तिला आनंद झाला आणि तो व्यक्त करण्यासाठीं तिनें म्हटलें, 'तुझ्या आयुष्यांतील एक मोठाच प्रश्न सुटला म्हणायचा.'

'कोणता प्रश्न ? ' अशोकनें विचारलें.

'तुझ्या व्यवसायाचा. आतां अर्थप्राप्तीसाठीं तुला इतर व्यवसाय करण्याचें कारण नाहीं. '

'तसं नाहीं. लीना, वडिलांनीं ही रक्कम माझ्यासाठींठेवलेली नाहीं, माझ्या कार्यासाठीं ठेवलेली आहे. तिचा उपयोग मला माझ्या सांसारिक स्वास्थ्याकडे करतां येणार नाहीं.'

'मग कोणत्या कार्यासाठीं या पैशांचा उपयोग करायचं ठरवलं आहेस तूं ? ' लीनेनें त्याला प्रश्न केला.

' माझ्या गोमंतकाच्या कार्यासाठीं...आमचा भावी कार्यक्रम आपण आतां निश्चित केला पाहिजे. आपण जें गोमंतकाचं दर्शन घेतलं तें किती भयाण आहे! तें घेतल्यानंतर तुला काय वाटलं, सांग पाहूं ? ' अशोकनें प्रश्न केला.

'मला असं वाटलं कीं इथं नुसता chaos माजला आहे. निष्क्रियता व दुबळेपणा यांचं वर्चस्व जिथं तिथं प्रस्थापित झालं आहे. स्वार्थाचा जप चालला आहे. स्वाभिमानशून्यतेची पूजा करण्यांत येत आहे.'

'या परिस्थितीवर कांहीं उपाय सुचतो का तुला ?' अशोकनें प्रश्न केला.

'या परिस्थितीचं कारण आपण आधीं शोधून पाहूं. आमच्या दास्यानंच ही परिस्थिति निर्माण केली नाहीं का ? '

'दास्याची एक अवस्था आपण आज ओलांडीत आहों, हें अगदीं खरं आहे. ही अवस्था मोठी भयानक असते. जनतेचें सामुदायिक व्यक्तित्व नष्ट झालेलं असतं. तिला ध्येयाची तर जाणीव नसतेच; पण आपल्या दुर्दैवाचीहि नसते. शेणामेणाचा मोठा गोळा, यापलीकडे तिचं

वर्णन करतां येत नाहीं. त्यांत चैतन्य ओतणं हेंच आपलं पहिलं कार्य आहे.’ अशोक म्हणाला.

‘आपण या दिवसांत उघड्या डोळ्यांनीं जें पाहिलं तें किती दारुण आहे ! कोणत्यहि गोष्टींत आपल्याला आशेला स्थान आहे का ? बहुसंख्य जनता दारुडी झाली आहे. लोक अन्नाविना उपाशी मरत आहेत. पण त्यांच्या चरितार्थाची व्यवस्था झालेली दिसत नाहीं. उद्योग-धंदे नाहींत. लोकांच्या हरएक शक्तीचा विकास करून त्यांचा समाज-सुखाकडे उपयोग करून घेणारं कोणत्याच तऱ्हेचं शिक्षण नाहीं. आम्ही गोमंतकीय इतके नालायक आहोंत का, कीं आम्हांला आमच्या देशाचा उद्धार करतां येऊं नये ? या टीचभर प्रांताच्या मूठभर लोकांनीं जगाच्या सगळ्या भागांत जाऊन वेगवेगळ्या क्षेत्रांत आपलं वैशिष्ट्य प्रस्थापित केलं आहे. व्यक्ति या दृष्टीनं याप्रमाणं गोमंतकीय श्रेष्ठ आहे. पण समाज या दृष्टीनं त्याला अस्तित्व नाहीं. असं कां झालं ? ’ लीनेनें म्हटलें.

‘ हेंच पोर्तुगीजांचं येथील कार्य आहे. खिस्ती धर्म आणि स्वातंत्र्य-पराङ्मुखता या दोन गोष्टी त्यांनीं येथील समाजाला दान केल्या. ’

या चर्चेनें दोघांचीं अंतःकरणें बरींच हलकीं झालीं. शेवटीं निघण्याच्या तयारीनें लीना म्हणाली, ‘ एका महत्त्वाच्या कामासाठीं मला आतां गेलें पाहिजे. ’

‘ कुठं ? ’ अशोकनें प्रश्न केला.

‘ शुद्धीकृत गावड्यांच्या गांवीं. तिकडे येण्याचं मीं त्यांना कबूल केलं आहे. ”

आणि लीनेनें थोडक्यांत अशोकला गावड्यांची दुर्दैवी कहाणी सांगितली. ती ऐकून अशोक अधिकच अस्वस्थ झाला. दीडदोन हजार गावड्यांनीं आपखुषीनें हिंदु धर्म स्वीकारला एवढ्यासाठीं पेरैरा आपल्या जमिनींतून त्यांना बाहेर घालविणार ही नीचपणाची परमावधि झाली, असें त्याला

वाटलें. आणि या बाबतींत आपल्याला कांहीं तरी कार्य केलंच पाहिजे, या जाणिवेनं तो लीनेच्या बरोबर जायला तयार झाला.

तीं दोघेंहि मोटारींतून गावड्यांच्या गांवाला जाण्यास निघालीं. वाटेंत त्यांना भाणसारच्या पुलावर जें दृश्य दिसलें तें पाहून लीनेच्या जीवाची तळमळ झाली. रस्त्याच्या कडेला झाडाखालीं एक इसम पडला होता. तो अस्थिचर्म होता. त्याच्या अंगावर मळकीं चिरगुटें होतीं. उठून बसण्या-इतकेंहि आज त्याच्या अंगीं सामर्थ्य नव्हतें. तो आपल्या निस्तेज गढूळ डोळयांनीं इकडे तिकडे आशाळभूतपणानें पहात होता. पोटाची दामटी होऊन तें वर खालीं होत होतें.

रस्त्यानें लोक येत जात होते; पण चार पावलें पुढें सरून त्या निराश्रिताची वास्तपुस्त करण्याचें कुणालाहि सुचत नव्हतें. नुकतीच एक मोटार लॉरी येऊन थांबली होती. त्यांतील तीस पस्तीस प्रवासी खालीं उतरले होते. त्यांपैकीं कांहींजण हॉटेलांत शिरले, कांहीं दारूच्या दुकानांत शिरले आणि इतर कांहीं रस्त्यांत घुटमळत त्या प्राण्याची चौकशी करूं लागले; परंतु खालीं उतरून त्याला कोणतेंच सहाय्य करण्याचें त्यांना सुचलें नाहीं.

लीना व अशोक त्याच्याजवळ आलीं. बरोबर आणलेल्या न्याहरीचा थोडासा भाग त्यांनीं त्याच्यापुढें ठेवला. त्याला थोडें पाणी पाजलें. त्यानें मोठ्या प्रयासानें तशा त्या स्थितींत दोन घांस तोंडांत घातले आणि थोड्या वेळानें त्यानें अगदीं जड आवाजांत म्हटलें, ‘ देव तुमचें बरें करील. गेले तीन दिवस पोटांत कांहीं गेलं नव्हतं. ’

आणि तो म्हणत होता तें अगदीं खरें होतें. तेथें थांबणाऱ्या मोटारीं-पाशीं जाऊन प्रवाशांकडे भिक्षा मागण्याइतकी ताकद त्याच्या अंगीं नव्हती आणि रस्त्याच्या खालीं उतरून त्याला अन्नपाणी देण्याइतकी कळकळ लोक दाखवीत नव्हते. अशा स्थितींत तो तेथेंच खितपत पडला होता.

लीनेनें त्याची हकीकत त्याच्याकडून विचारून घेतली. गांवोगांव पसरलेल्या हजारों उपासपोटी जीवांचें तें एक प्रतीक होतें. तांदळाचा तुटवडा पडला. काबाडकष्ट करून पोट भरेना. त्यांतच एक दिवस त्याला ताप भरला. आजार आठवडाभर टिकला. कोणींच चौकशी केली नाहीं. तशा स्थितींतच तो दारोदार फिरूं लागला. तरीहि पोट भरेना. अशक्तता वाढतच गेली. त्यानें गांव सोडला. फिरतां फिरतां तो येथें येऊन पोंचला आणि हैराण होऊन तेथेंच पडून राहिला. अशी थोडक्यांत त्याची दुःखद कहाणी होती. लीनेला व अशोकला वाटलें कीं हे असले असंख्य जीव ठिकठिकाणीं विखुरलेले आहेत. अन्नाला मोताद होऊन ते तडफडून मरून जातात. त्यांच्या जीविताचा प्रश्न कुणालाच बेचैन करीत नाहीं. सरकार, समाज, धर्म, सगळे कांहीं शांतपणें आपापले व्यवहार करीत आहेत. चहाच्या दुकानांत एक फौजदार आपल्या मित्रमंडळींशीं गप्पा छाटीत बसला होता. जवळच पोलिस चौकी होती. पण त्या भिकाऱ्याचें दैन्य निवारण्याचा प्रयत्न त्यानें केला नाहीं. अशोकनें त्याला बोलावून घेतलें आणि सरकारी हॉस्पिटलांत त्याची व्यवस्था करण्याची फौजदाराला विनंति केली. पण त्यानें हा प्रश्न थट्टेवारी नेला. तो म्हणाला, 'आज ना उद्यां हा माणूस खचित मरणार ! याच्या बाबतींत कांहीं केलं तरी तें फुकटच जाणार !'

लीना—अशोकचा निरुपाय झाला. त्यांनीं शोफरच्या साह्यानें जवळच एक रिकामें झोपडें होतें तेथें त्याला आणून घातलें आणि हॉटेलच्या मालकाला बोलावून घेऊन त्याला सांगितलें, 'हे दहा रुपये ठेवून घे. त्याला दररोज पेजपाणी, चहा, पाव जें लागेल तें घालीत जा. आठ दिवसांनीं आम्ही याला घेऊन जातों. तोंवर याची चौकशी कर.'

आसपासचे लोक या दोन वेड्यापीरांकडे टकमकां पहात हंसूं लागले.

गांवीं मोटार पोंचली तेव्हां संध्याकाळचे चार वाजले होते. उन्हें अजून उतरलीं नव्हतीं. शेतांतून शेंकडों कामकरी बाया शेत कापीत होत्या. त्यांचे भारे अंतराअंतरावर ठेवले होते. त्यामुळें त्या भूमींतून समृद्धीचे वाफारे निघत आहेत असें लीनेला वाटलें. पण ही समृद्धि काय कामाची ? असंख्य लोक निराश्रित स्थितींत गांवोगांव पडलेले असतांना शेतांतून पिकांच्या वेळीं दृष्टीस पडणारी ही समृद्धि तकलुपीच नाहीं का ? असा प्रश्न तिच्या मनांत उद्भवला आणि भाणसारीला त्यांना जें भिकाऱ्याचें दृश्य दिसलें होतें त्याची स्मृति होऊन आपल्याच असहाय्यतेच्या जाणिवेनें तिचा जीव आकुळपिकुळ झाला.

मोटार गावड्यांच्या वाड्यावर थांबली व दोघेंहि खालीं उतरलीं.

मोटारीच्या आवाजानें तेथील कितीतरी रहिवासी थोड्याच वेळांत तिकडे गोळा झाले आणि पेरैरा भाटकाराची मुलगी आली आहे असें कळतांच हा जमाव भराभर वाढतच गेला.

थोड्याच वेळांत तेथें अक्षरशः शेंकडों लोक गोळा झाले.

ज्या गावड्यांच्या पुढाऱ्यानें लीनेला तेथें येऊन जाण्याचें आमंत्रण दिलें होतें त्या राम गावड्यानें पाहुण्यांचें आनंदभरानें स्वागत केलें आणि त्यांना फलाहार नजर केला.

त्या विस्तीर्ण भाटांत गावड्यांचें शेंदीडशें घर होतें. कांहीं दिवसांपूर्वी ते शुद्ध झाले होते आणि आतां सरकार व ख्रिश्चन भाटकार यांनीं त्यांना त्रास द्यावयास सुरुवात केली होती.

सरकारचा त्रास सहन करण्याची त्यांची एक वेळ तयारी होती; पण पेरैरा भाटकारांनीं जो धाक त्यांना घातला होता त्यापुढें त्यांना कांहींच करतां येण्यासारखें नव्हतें.

आपलीं घरेंदारें सोडून जाण्यासाठीं पेरैरांनीं त्यांना पंधरा दिवसांची मुदत दिली होती. एकाच अटीवर आपला हुकूम मागें घ्यावयाला ते

तयार होते. गावड्यांच्या दृष्टीनें ती अट प्राणांतिक होती. त्यांनीं फिरून ख्रिस्ती धर्मांत प्रवेश करावयाचा ही ती भयंकर अट होती.

चारशें वर्षांच्या वियोगानंतर ते अकस्मात् आपल्या मायभूला जणूं काय परत आले होते. तेथें पाऊल टाकतात न टाकतात तोंच त्यांच्यावर देशत्याग करण्याची सक्ती व्हावी तशांतलाच हा प्रकार होता. बळजबरीनें लादलेल्या ख्रिस्ती धर्मांत राहून त्यांचे असंख्य पूर्वज हिंदु धर्माचा जप करीत हताश स्थितींत हा लोक सोडून गेले होते. चर्चमध्यें प्रार्थना चालली असतांना आपल्या अंतःकरणांत ते रामकृष्णांचा नामजप करीत होते. संकटाच्या प्रसंगीं हिंदु देवतांना कौल लावण्यासाठीं ते धांवत होते. सणासुदीचे दिवस ते मूकभावानें पाळीत होते.आपण ख्रिस्ती आहोंत असें धर्माधिकाऱ्यांना भासविण्याची धडपड एका बाजूनें चालली असतांना दुसऱ्या बाजूनें आपलें आंतरिक जीवन हिंदु रहावें म्हणून त्यांचा अट्टाहास होता. हिंदुधर्मांत पुन्हां प्रवेश करण्याचे त्यांनीं अधूनमधून केलेले धाडसी प्रयत्न फसले होते आणि त्याचें प्रायश्चित्त म्हणून त्यांना हुतात्म्याचें जीवन पतकरावें लागलें होतें. शेवटीं भाग्याचा दिवस उजाडला. हिंदुधर्माच्या शुद्धिकरणाचा संदेश त्यांच्या कानांवर पडला. सहा हजार गावडे एकाच देहाप्रमाणें उठले आणि शेंकडों वर्षें परधर्माच्या नरकांत लोळणारे हे प्राणी पुन्हां हिंदु झाले.

पण आतां त्यांच्यापुढें बिकट प्रश्न उभा राहिला. घरेंदारें आणि गांव यांचा त्याग केल्याशिवाय त्यांना गत्यंतर नव्हतें. पण जायचें कुठें ? हा प्रश्न होता. कोणताच ख्रिस्ती भाटकार त्यांना आपल्या जमिनींत आसरा देणार नव्हता हें स्पष्ट होतें. हिंदु भाटकारांना इच्छा असली तरी धैर्य नव्हतें. सरकारी अधिकाऱ्यांच्या वक्र दृष्टीच्या भीतीनें ते पुढें पाऊल टाकण्यास धजत नव्हते.अशा स्थितींत पेरैरांची समजूत घालण्याचा प्रयत्न करावा या उद्देशानें त्यांनीं मुद्दाम लीनेला पाचारण करून तेथें आणलें होतें.

पण तिचीहि स्थिति फार विचित्र होती. अशोकशीं झालेल्या पिस्तुलाच्या त्या अतिप्रसंगापासून तिचा वडिलांशीं संबंध तुटल्यासारखा झाला होता. त्यामुळें गावड्यांच्या वतीनें वडिलांशीं मध्यस्थी करणें शक्य नव्हतें. तसें करायला तिचा स्वाभिमान आड येत होता. शिवाय त्यांच्याशीं तिचे संबंध सलोख्याचे असते तरीहि तिच्या याचनेला काय फळ येणार तें उघड होतें. कारण आपलें धर्मप्रेम व्यक्त करून प्रतिष्ठा मिळविण्याची अमोल संधी त्यांना लाभली होती. ते ती कशी दवडणार? वात्सल्य,दया, इत्यादि भावनांचा बळी घेऊन ते आपलें धर्मप्रेम व राजनिष्ठा कसोटीला लावून दाखवणार यांत शंका नव्हती.

गावड्यांच्या बायकामुलांच्या तोंडावर चिंतेची छाया पसरली होती. अडाणी रानवट लोकांना घरादाराचा त्याग करणें किती कठीण असतें तें पांढरपेशांना कळणार नाहीं. भावनेचा हा प्रश्न अगदीं नाजुकांतला नाजुक आहे. निश्चयाच्या समाधानांत पुरुषांना संकटाची क्षिति वाटत नव्हती. पण बायकामुलांना असलें समाधान कुठून लाभणार? कितीतरी बाया लीनेच्या पायां पडल्या. मुलीचें मागणें न ऐकणारा बाप कसला ? असेंच त्यांना वाटलें असेल.आपला सगळा रागद्वेष विसरून वडिलांपाशीं गावड्यांचें गाऱ्हाणें न्यावयाचें एवढाच उपाय तिला शिल्लक राहिला होता. लीनेनें तसें करण्याचें त्यांना वचन दिलें आणि ती जड अंतःकरणानें मोटारींत जाऊन बसली.

अशोकचे विचार मात्र वेगळ्याच दिशेनें वहात होते.

# २६

गावड्यांच्या वतीनें पपांकडे बोलण्याचें अभिवचन लीनेनें त्यांना दिलें खरें; पण तें आपण कसें पार पाडणार हा तिला प्रश्न पडला. कारण तसें करायला तिचा स्वाभिमान तयार नव्हता. पिस्तुलाच्या प्रसंगानें त्यांचें नातें तुटल्यासारखें झालें होतें. त्या दिवसापासून ती पपांबरोबर जेवली नव्हती. त्यांच्याशीं एक शब्दहि बोलली नव्हती. इतकेंच नव्हे तर त्यांचें दर्शन देखील तिनें टाळलें होतें. मनाची ही एवढी अढी उत्पन्न झाल्या-नंतर आतां त्यांच्यापाशीं कोणत्याच प्रकारची याचना करणें तिला शक्य नव्हतें.

पण हें जितकें खरें, तितकेंच गावड्यांच्या प्रश्नाचें महत्त्व असाधारण होतें हेंहि खरें. हजारबाराशें लोकांच्या जीविताचा हा प्रश्न होता. कोणताहि त्याग करावा लागला तरी तो पतकरून त्यांच्यावर आलेलें हें संकट निस्तरण्याचा प्रयत्न करावा असें तिला गावड्यांची भेट झाल्यावेळेपासून वाटत होतें. पपांशीं आपलें नातें तुटलें असून गावड्यांचा पक्ष त्यांच्यापुढें आपल्याला मांडतां येणार नाहीं असेंहि तिनें त्यांना सांगितलें नव्हतें; कारण तसें करणें तिला शक्य नव्हतें.

अशा पेचांत लीना पडली होती. पण बऱ्याच विचारानंतर शेवटीं तिनें आज पपांशीं हें बोलणें काढण्याचा निर्धार केला. स्वाभिमानाच्या

मर्यादा परसेवेच्या क्षेत्रांत लुप्त होतात. परार्थासाठीं सोसलेले अपमान हेच शेवटीं मानाचे ठरतात. किती झालें तरी ते आपले वडील आहेत. आपलें त्यांच्याशीं भांडण झालें तरी त्यांच्यापुढें आपलें हृदय उघडें करायला आपल्याला हरकत नाहीं. अशा विचारानें लीना वडिलांच्या खोलींत जाण्याच्या तयारीनें उठली. तिनें मनाचा निश्चय केला तरी तिचें शरीर या गोष्टीला तयार होईना. पपांच्या खोलीच्या दिशेनें तिचे पाय उचलेनात. ते जागच्या जागीं खिळल्यासारखे झाले. कडू औषध घेण्यापूर्वीं आपण ज्या प्रकारचा निर्धार करतों तशाच निर्धारानें ती दारापर्यंत जाऊन पोंचली. ती आतां उंबरठ्यांत पाऊल टाकणार तोंच बाहेरून दार आंत लोटलें गेलें आणि पेरैरांची भव्य, उग्र मूर्ति खोलींत शिरली. त्याबरोबर लीना दचकून मागें परतली.

परंतु त्यांची मुद्रा पहातांच तिचें मन स्थिर झालें.शेवटच्या प्रसंगांतील विकारांचा लेशहि त्यांच्या चर्येवर नव्हता. उलट त्यांच्या नजरेंत गाढ वात्सल्यभावना भरून राहिली होती. त्यांच्या मुखावर प्रेमळ पुसट हास्याची रेषा उमटली होती आणि कारुण्य व अनुताप या दोन भावनांचें प्राबल्य त्यांच्या चेहऱ्यावरील रेषांतून प्रतीत होत होतें.

त्यांच्या आकस्मिक आगमनानें लीना जशी कोड्यांत पडली तशीच त्यांची मुद्रा पाहून तिला आशा उत्पन्न झाली. त्यांनीं तिच्या शेजारीं बसून तिच्यावर मायेची पांखर घातल्यासारखें केलें. इतक्या वात्सल्यानें, कळकळीनें आपल्या जवळ बसलेले पपांना तिनें कधींहि पाहिलें नव्हतें. त्यामुळें पितृप्रेमाला आसावलेल्या तिच्या हृदयाला त्यांच्या या ममतेमुळें हायसें वाटलें.

पेरैरांनीं म्हटलें, 'लीना, त्या दिवशीं माझ्या हातून तसं घडायला नको होतं... तुला फार त्रास झाला असेल... मला क्षमा केली पाहिजेस तूं.' ते वाक्यावाक्याला थांबत होते. त्यांच्या स्वरांत अनुतापाचा भाव व्यक्त होत होता.

लीना गोंधळली. कांहींशी वरमली. समोरासमोर हा प्रश्न उभा राहिल्या-मुळें अपराधी नसूनहि ती शरमिंधी झाली. कांहींतरी उत्तर केलें पाहिजे म्हणून ती म्हणाली,

'तो प्रकार आतां आपण विसरून जाऊं या.'

'तसं शक्य नाहीं,लीना. अन् हें पहा, त्या प्रकाराच्या मागं माझी जी मनःस्थिति होती ती मी कशी विसरूं शकेन ?'

अशा अप्रिय विषयावर फिरून पपांशीं बोलण्याचा प्रसंग तिला नको होता. पण आतां कांहीं तरी बोलल्याशिवाय गत्यंतर नव्हतें. ते पुढें काय बोलतील याचीहि तिला अटकळ झाली.

'लीना, तुला आई नाहीं...तुला माझ्या स्थितीची कल्पना नाहीं...तूं व्यक्तिसुखाच्या दृष्टीनें या प्रश्नाकडे पहात आहेस...'

त्यांच्या स्वरांत जो कारुण्यभाव उमटला होता त्याचा परिणाम तिच्या मनावर झाल्याशिवाय राहिला नाहीं. आपल्या स्वार्थासाठीं त्यांनीं प्रेम, औदार्य, इत्यादि सगळ्या भावनांचा त्याग केला आहे ही जाणीव तिच्यांत हळूहळू नष्ट होऊं लागली.

लीना स्तब्ध होती. पण तिचें मन अस्वस्थ होऊं लागलें होतें. पेरैरांनीं आपल्या भाषणानें जें वातावरण निर्माण केलें होतें तें तिला सर्वस्वीं नवीन होतें. म्हणून मुलीच्या भूमिकेवर उभी रहातांच ज्या आवेशानें व निर्भयतेनें ती या प्रश्नाकडे पहात होती तो आवेश व ती निर्भयता आतां निमाली होती.

या तिच्या स्थित्यंतराची जाणीव तिच्यापेक्षांहि पेरैरांना अधिक चांगली झाली. युक्तिवाद जेथें अपुरा पडतो तेथें भावना विजयी होते. दंडाचा जिथें उपयोग होत नाहीं तिथें करुणा प्रभावी होते हें तत्त्व त्यांना चांगलें माहीत होतें. म्हणून त्यांनीं आतां पवित्रा बदलला होता.

ते पुढें म्हणाले, 'व्यक्तिगत सुखदुःखापेक्षांहि माणसाला अधिक महत्वाचीं कर्तव्यें असतात...कुटुंब...समाज...धर्म...'

या वाक्यांत लीनेला ढोंगाचा वास आला. पण तिनें कांहींच म्हटलें नाहीं.

'आपल्या आवडीनिवडीचा त्याग करण्याचा आयुष्यांत कधीं कधीं आपल्यावर प्रसंग येतो...' पेरैरा तात्त्विक भाषा बोलूं लागले. पण तिचा रोख कोणावर आहे हें लीनेला समजून चुकलें.

ते संदिग्ध भाषेंत बोलत होते. स्पष्ट शब्दांत आपला आशय सांगण्याचा जणूं काय त्यांना धीर होत नव्हता. मुख्य नाजुक प्रश्नाला स्पर्श लीनेनेंच करावा असा त्यांचा हेतु होता म्हणून त्यांनीं म्हटलें, 'लीना, तूं बोलत नाहींस ?'

'तुम्ही म्हणतां तें मला मान्य आहे.' ती उत्तरली.

'मग ?'

'पण असं कीं तुमचा आशय मला अमान्य आहे.' आणि थोडा वेळ थांबून ती गभीरपणानें म्हणाली, 'व्यक्तीचं सुख ज्या वेळीं तत्त्वावर, नीतीवर, सनातन हक्कावर आधारलेलं असतं त्या वेळीं तें एकाद्या अन्याय्य अशा कौटुंबिक किंवा सामाजिक सुखापेक्षांहि श्रेष्ठ असतं, पपा...'

तात्त्विक भाषा ओसरण्याचा क्षण जवळ येत होता. थोडा वेळ कोणीच कांहीं बोललें नाहीं. हें मौन दोघांनाहि जाचक होत होतें. वडिलांसाठीं कोणताहि त्याग करायची एरवीं तिची तयारी होती. तसें करण्यांत तिला आनंदच झाला असता. त्यांच्या सुखासाठीं, न्याय्य व धर्म्य सुखासाठीं लौकिक सुखांवर लाथ मारण्याचा तिच्यावर प्रसंग आला असता तर तिनें त्याचें आनंदानें स्वागत केलें असतें. परंतु आतां लौकिक सुखदुःखांपेक्षांहि श्रेष्ठ अशा प्रश्नाची या प्रकरणांत जी गुंतागुंत झाली होती ती तिला स्पष्ट दिसत होती.

वडिलांची मनीषा कळून घेण्यासाठीं ती आतां अधीर झाली. मागच्या भेटींत जें तिला कळून आलें होतें त्यापेक्षां तिला आतां अधिक कळणार होतें. कदाचित् हा शेवटहि असावा......

शेवटीं ती म्हणाली, ‘ पपा, तुम्ही स्पष्ट कां बोलत नाहीं ? माझ्या-पासून तुम्ही कोणती अपेक्षा करतां ? ’

‘ माझ्या डोळयादेखत आमच्या कुटुंबाची वाताहत झालेली पहावत नाहीं, लीना. ’ पेरैरा भावनाविवश स्वरांत म्हणाले.

‘ एवढं अरिष्ट कोणतं ओढवलं आहे आमच्यावर ? ’ तिनें प्रश्न केला.

‘ तुझं वर्तन बदललं नाहीं तर तसा प्रसंग लौकरच आपल्यावर ओढ-वेल. ’ ते तीव्र स्वरांत टांसून म्हणाले.

‘ माझं वर्तन ?...एवढं भयंकर माझं वर्तन आहे का ?’ तिनें आश्चर्य-युक्त मुद्रेनें विचारलें.

‘ होय,लीना. भ्रामक तत्त्वज्ञान कवटाळल्यामुळें तुला सध्यां वस्तुस्थिति दिसत नाहीं. ’

‘ तुमच्या सुखाला,पपा, मी धक्का कधींहि लावूं इच्छित नाहीं...तुमचं वैभव मला नको आहे...’ ती किंचित् उद्वेगानें म्हणाली.

‘ वैभवापेक्षांहि मला नांवाची चाड आहे...’

‘ त्या नांवाला देखील मी काळं लावणार नाहीं...’ तिनें ठांसून सांगितलें.

‘तुझ्या वर्तनानं तें लागणार हें निश्चित. तुझा अशोकशीं स्नेह...’

‘हा स्नेह तुम्हांला नको आहे ?...’

‘लोक फार वाईट बोलतात, लीना...’

‘खरं असेल हें...पण लोकांच्या टीकेला तुम्हीं कां भ्यावं ?’

‘मला भीति वाटते. सगळ्या घटना इतक्या शीघ्रतेनें घडत आहेत कीं तें पाहून माझं मन भांबावून जातं. कांहीं सुचत नाहीं.’ त्यांचा स्वर

अधिकाधिक करुण होऊं लागला. असहायतेची छाया त्यांच्या निराश मुद्रेवर तरळूं लागली. तें पाहून लीनेच्या मनाला दुःख झालें. पपांची समजूत काढणें आपल्याला शक्य झालें असतें तर ? आपण किती भाग्यवान ठरलों असतों, अशी कल्पना तिच्या मनांत येऊन गेली.

'पपा, तुम्हांला भिण्याचं बिलकुल कारण नाहीं....तुमचा नांवलौकिक एवढा ठिसुळ आहे का, कीं मीं अशोकशीं मैत्री केल्याबरोबर तो कोलमडून पडावा?... तुमचें सरकारदरबारांतील वजन माझ्या वर्तनावर अवलंबून आहे असें मला नाहीं वाटत. तुम्ही उगाच मनाचीं भुतं निर्माण करतां.'

लीना प्रेमळपणानें बोलत होती. तिच्या शब्दांत स्पष्टपणा होता, जिव्हाळा होता; पण आवेश नव्हता.

'लीना, तूं बुद्धिमान आहेस. तुला सगळं समजलं पाहिजे. मी तुमच्या स्नेहाला भीत नाहीं...'

आणि ते थांबले. पुढचा आशय सांगावा कीं न सांगावा अशा संदेहानें ते गोंधळले.

आणि हा विषय मध्येंच सोडून देण्यासाठींच जणूं काय त्यांनीं खिशांतून एक कागद बाहेर काढला आणि तो लीनेच्या पुढें करीत ते म्हणाले, ' वाचून पहा. '

लीनेनें कागदावरून चटकन् नजर फिरविली. ख्रिस्ती धर्माधिकारी पात्रियार्क यांचा तो आज्ञारायस होता. त्यांत त्यांनीं तिच्या वडिलांना असा हुकूम सोडला होता कीं, पंधरा दिवसांच्या आंत शुद्धीकृत गावड्यांना त्यांच्या जमिनींतून हुसकावून लावावें.

धर्माधिकाऱ्याचें हें क्रूर, जुलमी कृत्य पाहून लीनेचें मस्तक भडकलें. धर्म व मानवता यांची फारकत करणारे धर्माधिकारी किती राक्षसी असले पाहिजेत याचा ती विचार करूं लागली.

'ही आज्ञा तुम्हीं पाळलीच पाहिजे का, पपा ?' तिनें शेवटीं विचारलें. तिला हजारबाराशें गावड्यांनीं जी विनंति केली होती तिची तिला आठवण झाली आणि कोणत्या रीतीनें या जुलमी आज्ञेपासून त्याचें संरक्षण करावें हा विचार तिच्या मनांत बळावला.

पेरैरा थोडा वेळ चिंताक्रांत दिसले. पण लगेच त्यांनीं म्हटलें, 'आमचा धर्म अन् आमचें सरकार या दोघांनाहि या गोष्टीचं अगत्य आहे. हा हुकूम मीं न पाळला तर माझ्याविरुद्ध काहूर उठेल.'

'तुम्ही फुसक्या काहुराला भितां; पण निरपराधी लोकांच्या जीवितनाशाला भीत नाहीं. क्षणजीवी धूमकेतू तुम्हांला सूर्यगोलापेक्षां अधिक चिरंजीव वाटतो ! पपा, कसला धर्म घेऊन बसलांत ?'

पेरैरा गप्पच होते.

लीना पुढें म्हणाली, 'पपा, ही धर्माज्ञा नव्हे. आणि धर्माज्ञा तरी आपण कुठं पाळतों ? गांवांत शेंकडों लोक अन्नाविणें तडफडत असतांना आपण इथं वैभवांत लोळत आहोंत ही का ख्रिस्ताची शिकवण झाली ?' ती तळमळीनें बोलत होती. वडिलांचा उपमर्द करावा असा तिचा उद्देश नव्हता.

'मानवतेचें सुख हीच खरी धर्माज्ञा होय.' लीना गंभीर स्वरांत म्हणाली.

तिच्या वडिलांना हें तत्त्वज्ञान अवगत नव्हतें असें नाहीं. असलीं सारीं तत्त्वज्ञानें पचवून त्यांनीं स्वतःचें तत्त्वज्ञान निर्माण केलें होतें. ते लीनेच्या सदुपदेशाला पुरून उरण्याइतके खंबीर होते.

पेरैरा म्हणाले, 'तुझं म्हणणं पटतं मला, लीना. क्षणांत वाटतं कीं, तुझ्यासाठीं ही आज्ञा बाजूला सारावी.'

त्यांची मुद्रा, त्यांचा स्वर, त्यांचें वात्सल्य, हें सारें पाहून तिनें अधीर मनानें विचारलें, 'पपा, मी गरीब गावड्यांना वचन देऊन चुकलें आहे.'

‘ वचन दिलंस तू त्यांना ? ’ त्यांनीं आश्चर्यानें विचारलें.

‘ हो. आतां आपल्याला तें पाळलंच पाहिजे.’ तिनें म्हटलें. वडिलांचा निकाल ऐकण्यासाठीं ती आतुर झाली.

‘ पोरी, तूं वचन दिलंस. तुझा बाप या नात्यानं तें पाळण्याची मी पराकाष्ठा करीन. ’ पेरैरा हळूहळू म्हणाले.

‘ खरंच का हें, पपा ? ... माझे पपा किती चांगले आहेत ! ’ आणि असीम आनंदाच्या भरांत ती वडिलांना बिलगली. तिला वाटलें, आपले पपा किती थोर, प्रेमळ आहेत ! त्या बिचाऱ्या गावड्यांना किती आनंद होईल हें ऐकून; आणि आपल्या अशोकला देखील ! त्याला केव्हां एकदांची भेटेन असें तिला होऊन गेलें.

पेरैरा म्हणाले, ‘ लीना, माझ्या लीना, माझ्यासाठीं तूं कांहींच करणार नाहींस का ? ’

‘पपा, मी तुमची ना ? ... सांगा. तुमच्यासाठीं मी काय करूं ? ’ ती उत्साहानें, साधेपणानें बोलून गेली.

पेरैरा अकस्मात् गंभीर झाले. त्यांनीं लीनेच्या आईच्या समोर टांगलेल्या प्रतिमेकडे अंगुलिनिर्देश करून शांतपणानें म्हटलें, ‘लीना, तुझ्या आईच्या समोर मला असं वचन दे कीं अशोक... ’

‘नाहीं, पपा...अशोक माझे स्नेही आहेत.’ ती आवेगानें म्हणाली.

‘ऐक, लीना. अशी उचंबळ होऊं नकोस. माझं म्हणणं ऐकून घे. अशोकच्या स्नेहाचं रूपांतर प्रेमांत अन् मग लग्नांत होणार नाहीं असं मला वचन दे. ’

‘पपा, पुरे करा...’ तिनें ताडकन् खुर्चीवरून उठून व दोन्ही कानांवर हात ठेवून भेदक स्वरांत म्हटलें. जणूं काय तिला सगळ्याची शिसारी आली.

'लीना, सांग, मला सांग...'

'पपा, मला कांहींच सुचत नाहीं...मी तुम्हांला उत्तर देऊं शकत नाहीं.' आणि इतकें घाईघाईनें बोलून लीना एकाद्या झंझावाताप्रमाणें दार उघडून बाहेर निघून गेली.

## २७

गावड्यांच्या घरादाराचा प्रश्न सोडविण्यासाठीं लीना-अशोकनें हिंदूंची जाहीर सभा बोलविण्याचें ठरविलें.

अशोकनें विनंतीचा मसुदा तयार केला. यांत त्यानें गावड्यांवर ओढवलेल्या संकटाची कल्पना देऊन तें निवारण्यासाठीं सर्व हिंदूंनीं एकत्र येऊन विचार केला पाहिजे असें जळजळीत भाषेंत सांगितलें. ही विनंती समाजांतील प्रमुख व्यक्तींच्या नांवानें प्रसिद्ध करण्यांत येऊन गांवोगांव तिचा प्रसार करण्यांत आला.

लीनेनें आपली मागणी अमान्य केली आहे, हें पाहून तिच्या वडिलांनीं दुसऱ्याच दिवशीं गावड्यांना घरेंदारें सोडून जाण्याचा हुकूम कायदेशीर रीत्या कळविला.

केवळ जाहीर विनंतीनें काम भागणार नाहीं असें दिसून आल्यावरून लीना व अशोक यांनीं प्रमुख हिंदु जमीनदारांच्या भेटी घेऊन त्यांना सभेला उपस्थित रहाण्याचा आग्रह केला.

पेरेरांसारख्या वजनदार ख्रिस्ती गृहस्थाची मुलगी जातीनें गावड्यांच्या वतीनें खटपट करीत आहे, हें पाहून बऱ्याच भेकड हिंदु जमीनदारांनीं आपला दुबळेपणा टाकून सभेला येण्याचें कबूल केलें. थोड्याच दिवसांच्या

आंत या सभेच्या विषयानें हिंदु समाजांत विलक्षण खळबळ उडाली. मृत हिंदु समाजांत जणूं काय नवजीवनाचें वारें खेळूं लागलें.

लीनाच्या मनाची धुगधुग वाढतच होती. कारण गावड्यांचा प्रश्न समाधानकारक रीत्या सुटला नाहीं तर आपणच अप्रत्यक्षपणें तो बिकट केला असें होईल, ही जाणीव तिला जाचत होती.

सभेचा दिवस उगवला. शेंकडों गावडे सभास्थानीं जमले होते. इतर हिंदु समाजहि दिसत होता. वीसपंचवीस बडे जमीनदारहि उपस्थित होते. कांहीं सरकारी अधिकारीहि चमकत होते. हिंदुसमाज नवहिंदूंना जवळ करणार कीं दूर लोटणार, हा प्रश्न होता.

अध्यक्षस्थानीं लीनेची योजना झाली. ती उठली तेव्हां टाळ्यांचा कडकडाट झाला. कारण प्रसंगच तसा अपूर्व होता. तिच्या वडिलांनीं गावड्यांना घरेंदारें सोडण्याचा हुकूम दिला होता. आणि त्यांचीच मुलगी लीना या सभेची अध्यक्ष होती. ही घटना लोकदृष्टीनें रोमहर्षक होती.

लीनेनें सभेचा हेतु सांगितला आणि नियोजित वक्त्यांना बोलण्याची विनंति केली.

श्रोतृसमुदायांतून एक गावडा उठला. त्याचें नांव राम. तो त्यांचा पुढारी होता. मृत्यूला दाढेखालीं घालून त्यानें या दिव्यांत उडी टाकली होती. तो स्फूर्तीचा झरा होता. त्याच्याकडे नजर लावूनच इतके लोक शुद्धीकरणाच्या चळवळींत पडले होते.

त्याच्या जातभाईंनीं आरोळ्या ठोकून त्याचा जयजयकार केला. तो हातवारे करीतच पुढें सरसावला. त्याची बेदरकार मुद्रा, काळाकभिन्न धिप्पाड देह, जाडजूड मिशा आणि रासवट आवेश यांचें दर्शन घडतांच सभाजनांच्या तोंडून एकच उद्गार निघाला, 'आगा, देंवचार मंगा हो.' आणि खरोखरच तो गावड्यांचा देवचार होता. त्यांच्या काजासाठीं

मरणाला सिद्ध झालेला हा वीर त्या लोकांना त्यांचा देवचार न वाटावा तर काय ? तो हातवारे करीत बोलूं लागला :

'आज अधिकारानें आम्ही आमच्या घरांत शिरत आहोंत. तुम्ही आम्हांला लाथाडणार काय ? ख्रिस्ती धर्मात मेलेले आमचे पूर्वज आज इकडे गोळा होऊन तुमच्या तोंडाकडे पहात आहेत, तुमच्याकडून आम्हांला अभय मिळालेलें पाहून त्यांच्या आत्म्यांना सद्गति मिळेल. आम्हांला जवळ करण्याची ताकद तुमच्या अंगीं नाहीं असें सिद्ध झालें तर तुम्हांला लाथ मारून तुमच्या घरादारांतून बाहेर फेंकायला ख्रिश्चन लोक कमी करणार नाहींत... '

हें भाषण त्यानें एवढ्या आवेशानें, आवाजांत चढउतार करीत व मुद्रेवरील भाव क्षणाक्षणाला बदलीत केलें कीं त्याचा ठसा लोकांच्या मनावर खोलवर उमटला. लोकसमुदायाचा वीरपुरुष होण्याचे गुण या माणसाच्या अंगीं खात्रीनें आहेत असेंच प्रत्येकाला वाटलें. नंतर अशोक उठला. त्यानें म्हटलें :

'प्रस्तुत प्रश्न धार्मिक आहे असंच नाहीं. माणुसकीवरील हें आक्रमण आहे. आमच्या जीवनमरणाचा हा प्रश्न आहे. आमचे नैसर्गिक हक्क आजवर आपण तुडवूं दिले त्याचं हें प्रायश्चित्त आहे. धर्मस्वातंत्र्य हा अबाधित सनातन हक्क आहे. तो यापुढं आपण पायदळीं तुडवूं देणार काय ? हा माझा तुम्हांला सवाल आहे. बाटलेले हिंदू आपल्या मूळ धर्मांत परत आले तर त्यांचा छळ कां ? ही त्यांची दैना आपण चालूं देणार काय ? आपलें अस्तित्व सिद्ध करण्याची अशी सुसंधी आम्हां हिंदूंना पुन्हां मिळणार नाहीं. आपण या वेळीं दुबळेपणा दाखवूं तर आपण चतुष्पादांच्याच पंक्तीला बसूं ... आपण जगांत माणसं म्हणून जगणार कीं जनावरं म्हणून जगणार ?... '

त्याचें व्याख्यान संपलें. श्रोतृसमाज अस्वस्थ झाला.

शेवटीं लीना बोलूं लागली. तिचे तेजस्वी नेत्र विद्युल्लतेप्रमाणें चमकूं लागले. तिचा त्वेष मुद्रेच्या रेषेरेषेंतून व्यक्त होऊं लागला. तेजाचें, उदात्ततेचें वलयच तिच्या मुखाभोवतीं तयार झालें. एकादी हिंदु देवताच बोलत आहे असा लोकांना भास झाला.

'मी आतां हिंदु म्हणून बोलत आहें.' तिच्या तोंडून शब्द निघाले. तोंच तिचा प्रचंड जयजयकार झाला. टाळ्यांचा कडकडाट केवढा वेळपर्यंत बंद होईना. शांतता प्रस्थापित झाल्यावर ती म्हणाली :

'होय, मी हिंदु म्हणून बोलत आहें. पण मला वाईट वाटतं तें अशाकरतां कीं माझ्या या नव्या भाईबंदांना मला कोणतीच मदत करतां येत नाहीं. त्यांना आसरा देतां आला असता तर मीं स्वतःला भाग्यवान मानलं असतं. पण आज माझ्यापाशीं साध्या सहानुभूतीपेक्षां कांहीं नाहीं. पण माझी खात्री आहे कीं, इथं असलेले हिंदु जमीनदार आपल्या या धर्मबंधूंना उबत टाकणार नाहींत. आपण इथं पुष्कळ बोललों अन् कांहींच न करतां निघून गेलों तर तें आपल्याला लज्जास्पद होईल. गावड्यांच्या नव्या वस्तीचा प्रश्न सोडवूनच आपल्याला इथून निघालं पाहिजे. आपल्यामध्यें एकहि असा उदारात्मा नाहीं काय, कीं जो यांना आसरा देईल ?...' आणि इतकें बोलून ती सभेवरून आपली नजर फिरवूं लागली.

श्रोतृवर्गांतून एक हात वर झाला आणि लगेच एक वृद्ध सद्गृहस्थ उठून उभे राहिले. सगळ्यांचे डोळे त्यांच्यावर स्थिर झाले. लोकांच्या सगळ्या शक्ती डोळ्यांत केंद्रित झाल्या. सगळ्यांच्या अंतःकरणांतून एकच उद्गार बाहेर पडला, 'अरे, हे तर आमचे हरीबाबा.'

हरीबाबांची मान कांपत होती. चेहरा सुरकुतला होता. डोळ्यांतील तेजाला ओहोटी लागलेली होती. त्यांच्याच शेजारीं अशोक बसला होता.

तो चटकन् उठला आणि त्यानें हरीबाबांना आपल्या हाताचा आधार दिला. आणि अशा रीतीनें जमावांतून वाट काढीत ते दोघेहि व्यासपीठावर आले.

सगळ्यांना आश्चर्य वाटलें. हरीबाबा कांहीं वक्ते नाहींत,मग ते व्यासपीठावर कां येत आहेत ? असाच प्रश्न कित्येकाच्या मनांत उद्भूत झाला.

पण ज्यांना त्यांच्या मोठेपणाची ओळख होती त्यांनीं मनाशीं खूणगांठ बांधली कीं हरीबाबा उभे राहिले आहेत ते बोलण्यासाठीं नसून कांहींतरी करून दाखवण्यासाठीं.

अन् लोकांचा हा कयास बरोबर होता. कारण हरीबाबांनीं कोंकणींत म्हटलें :

' हांव मोठो भाटकार न्हंय. पुणुन त्या म्हज्या भावांक रावपाक म्हजे घर देवदयेन व्हेड आस. कितल्या लोकांक जागो जाय? ' हरीबाबांनीं सभेला उद्देशून प्रश्न केला.

' बाराशें. ' कुणींतरी उत्तर केलें.

' शांतादुर्गेच्या कृपेने काय उणें ना. या सगळ्या लोकांनीं आमच्या सांतेर भाटांत येवचें. तांका हांव लागत ती जमीन दितां आनि घरादारां बांधून दितां. जाय जाल्यार तांका रोंवक शेतां दितां. कोणेच भियोंचें लागना....' इतकें बोलून हरीबाबा खालीं बसले.

अशोकनें त्यांना कडकडून मिठी मारली. लीनेनें नमस्कार केला. तिच्या डोळ्यांत अश्रू उभे राहिले. त्यांच्या नांवाच्या गजरांत सभा विसर्जन झाली.

लीना व अशोक सभागृहांतून बाहेर आलीं आणि लगेच अशोकला पोलिसांनीं अटकाव

# २८

अशोकला पकडण्यांत आलें तेव्हां त्याच्याबरोबर लीना होती. तिनें त्याला सोबत करण्याचा आग्रह धरला. गावड्यांचा घोळका मोटारीभोंवतीं गोळा झाला. थोड्या वेळानें मोटार पणजीला जायला निघाली. अशोकच्या अटकेच्या बातमीनें सगळे लोक दुःखी झाले.

अशोकला पणजीच्या पोलिस चौकीवर अटकेंत ठेवण्यांत आलें. त्या दोघांची अशी कल्पना होती कीं, गावड्यांच्या प्रकरणांत भाग घेतल्यामुळेंच त्याला अटक झाली आहे व त्याला एक दोन दिवस कैदेंत ठेवून नंतर सोडून देण्यांत येईल. पण लीनेला असें कळून आलें कीं त्याच्यावर भयंकर आरोप करण्यांत आले असून ते सिद्ध करण्यासारखे पुरावे देखील पोलिसांनीं हस्तगत केले आहेत. ही वार्ता कळतांच लीना फारच घाबरली. कारण कोणत्याहि अप्रिय इसमाला हद्दपारीची शिक्षा देण्याचा अधिकार गव्हर्नर जनरलला होता. या अधिकाराचा उपयोग करून अशोकला आफ्रिकेला पाठविणें सरकारला अशक्य नव्हतें....याच वेळीं एक दुष्ट शंका तिच्या मनाला चाटून गेली व ती अस्वस्थ झाली.

कांहीं पोलिस अधिकाऱ्यांशीं लीनेची दाट ओळख होती. तिच्या वडिलांना भेटण्यासाठीं ते अधूनमधून रायला येऊन जात. तेथेंच त्यांच्याशीं लीनेचा परिचय झाला होता.

लीना कॅप्टन कोस्नांना भेटली आणि आपल्या आगमनाचा हेतु तिनें त्यांना सांगितला. त्यासरशीं ते चिंताक्रांत झाले. तिला वस्तुस्थिति सांगावी कीं नाहीं या विचारांत ते पडले. बऱ्याच वेळानंतर त्यांनीं प्रेमळ स्वरांत म्हटलें :

‘ लीनाबाई, तुम्ही समजतां तेवढें हें प्रकरण साधें नाहीं. त्याच्यामागें मोठी गुंतागुंत आहे. मोठमोठ्या व्यक्तींचं यांत अंग आहे. ’

असें मोघम भाषेत बोलून ते गप्प राहिले.ते पोलिस अधिकारी असले तरी सहृदय होते. अशोकला देशोधडीला लावण्यासाठीं जें कृष्णकारस्थान रचण्यांत आलें होतें त्याचा त्यांना मनापासून तिटकारा होता. त्याच्या-सारखा बुद्धिमान व हुषार तरुण वायां जावा हें त्यांना नको होतें.

कॅप्टनच्या तोंडचे हे शब्द ऐकून लीना घाबरली. तिचा आवेश आतां मावळला. अशोकवर कोणते आरोप ठेवण्यांत आले आहेत हें समजून घेण्यासाठीं तिनें विचारलें, ‘ अशोकला अटक कां करण्यांत आली हें मला सांप्रत कळूं शकेल काय ? ’

‘ गावड्यांचा प्रश्न हा निमित्तमात्र आहे. गेल्या पंधरा दिवसांपासून अशोकला पकडण्याचें घाटत होतें. त्यांच्यावर मोठे गंभीर आरोप ठेवण्यांत आले आहेत. तसे पुरावेहि तयार करण्यांत आले आहेत. हा सगळा उपद्याप गव्हर्नरपाशीं वजन असलेल्या प्रतिष्ठित व्यक्तींचा आहे. त्यांचीं नांवं मी तुम्हांला सांगूं शकत नाहीं.तुम्ही चाणाक्ष आहांत.कल्पनेनं तीं तुम्हीं ताडूं शकाल......’ कॅप्टननें तिला माहिती दिली.

लीनेच्या मस्तकांत प्रकाश पडला. पेरैरांनीं विकाराच्या भरांत तिच्या-पाशीं मागें एकदां म्हटलें होतें कीं, अशोकला आफ्रिकेची हद्दपारी देण्याचें सामर्थ्य आपल्या हातीं आहे...

लीना तेथें अधिक वेळ राहिली नाहीं. कोस्नांचे आभार मानून ती तेथून निसटली.

ती आतां मनांतल्या मनांत चवताळली होती. वडिलांचा नीचपणा एवढ्या थराला पोंचेल असें तिला कधींच वाटलें नव्हतें. आपल्या प्रांतांत अन्यायानें परिसीमा गांठली आहे, असें तिला ऐकून माहीत होतें; त्याचें तिला आतां प्रत्यंतर आलें. सत्तेच्या जोरावर केवढेहि घोर जुलूम येथें पार पडतात. खरे गुन्हेगार अधिकारावर आले म्हणजे स्वतंत्र वृत्तीच्या माणसांना छळतात...

तिच्या मनाचें चक्र जोरानें चालू लागलें. तिचीं सुखस्वप्नें आतां मातीला मिळाल्यासारखींच होतीं. तिचें समाजकार्य, तिचीं ध्येयें, तिचा प्रणय, सारें कांहीं विरून जाऊं पहात होतें. वडिलांचे संबंध तुटत होते. अशोक नाहींसा होऊं पहात होता...

तिच्या मनाची तळमळ झाली. तिला कांहीं सुचेना. न्यायखात्यांत खटला गेला तर अशोकचा बचाव करणें शक्य होतें.पण गव्हर्नरनें आपल्या खास अधिकाराचा उपयोग करून त्याला हद्दपार केलें तर ?... सगळे उपाय हरणार होते.

तिच्या विचारांचें चक्र जसजसें चालूं लागलें तसतशी तिची निराशा विरूं लागली. तिला नवें धैर्य प्राप्त झालें. अशोकवरील तिच्या प्रेमानेंच तिला नवी शक्ति दिली. वडिलांबद्दलचा तिचा तिरस्कार आतां शिगेला पोंचला. ध्येयवाद जागृत झाला आणि संकटें क्षुल्लक वाटूं लागलीं. प्रेमासाठीं वाटेल तो त्याग करण्याची वृत्ति ध्येयशील वृत्तीशीं एकजीव झाली. प्रेम व ध्येयवाद या अमर भावना प्रबल ठरल्या आणि त्यांच्या उदयानें तिच्या विकारांना उच्चत्व आलें. तिची वृत्ति निर्भय झाली. आपल्या आकांक्षांच्या मार्गांत जें जें आड येईल तें तें आपण कापून काढूं असा आत्मविश्वास दृढ झाला आणि अशा या बेफाम, अनिवार मनःस्थितींत तिनें पेरैरांच्या वाड्यांत प्रवेश केला.

त्या वेळीं तिला तें घर आपलें वाटलें नाहीं. आपल्या आवडत्या खोलींत

पाऊल टाकण्याचीहि तिला इच्छा झाली नाहीं. धर्म, न्याय, नीति, इत्यादि सद्भावनांचा निर्दयपणानें चुराडा करणाऱ्या नरराक्षसाच्या घरांत आपण प्रवेश करीत आहों असेंच त्या वेळीं तिला वाटलें.भीतीचा लेशहि तिच्या मनाला शिवला नाहीं.

ती तडक पेरैरांना भेटायला गेली.त्या पापी घरांतून चालत असतांना तिचें हृदय जणूं काय गुदमरत होतें.

पेरैरा खोलींत होते. लीनाची चाहूल लागतांच ते उठले. आणि तिच्यावर नजर पडतांच ते दचकले. क्षणार्धांत काळे ठिक्कर पडले.

लीनेची मुद्रा क्रोधाविष्ट तपस्विनीची होती. तिला आतां पपा दिसत नव्हते. त्यांच्यांत तिला चांडाळ दिसत होता.

'पपा,' तिनें आत्यंतिक तिरस्काराच्या कठोर स्वरांत म्हटलें,—' तुम्ही माझे पपा राहिलां नाहीं. तुम्ही चांडाल आहांत ! '

या वाक्याबरोबर पेरैरांच्या उरल्यासुरल्या शक्ती गळून गेल्या. त्यांचा चेहरा अगदीं मलूल झाला.

' लीना,...' एवढाच उद्गार त्यांच्या तोंडून निघाला. तिचें सांत्वन करण्याची वृत्ति त्यांच्यांत दिसून आली.

पण लीना चवताळलेली नागीण होती. ती फूत्कारली: ' होय, तुम्ही चांडाळ आहांत ! तुम्हीं कारस्थान करून अशोकला पकडायला लावलंत. होय ना ? मला सारं कळून चुकलं आहे. '

पेरैरा हतबुद्ध व दिङ्मूढ झाले होते. मुलीचा आत्यंतिक आवेश, तिचा क्रुद्ध स्वर पाहून ती कोणतेंहि दिव्य करायला या वेळीं तयार होईल हें त्यांना दिसून आलें.

'पपा, मी इथं क्षणभर देखील रहाणार नाहीं. अशोकला हद्दपार करण्याचा तुमचा निर्धार आहे; पण तुम्ही पक्कं समजा कीं, अशोक मला मुकण्यापूर्वीं तुम्ही मला मुकाल. ऐका, अशोकला तुम्ही पकडायला लावलंत.

तुम्हींच त्याची मुक्तता केली पाहिजे. उद्यां या घटकेपर्यंत अशोकची सुटका नाहीं झाली तर... तर माझें प्रेत ओलांडून तुम्हांला या घरांतून बाहेर पडावं लागेल.'

आणि इतकें बोलून व वडिलांवर तुच्छतेचा एक भयाण कटाक्ष टाकून ती तेथून बाहेर पडली.

# २९

अशोकची सुटका केल्याशिवाय आतां पेरैरांना गत्यंतर नव्हतें. आपला निर्वाणीचा शब्द खरा केल्याशिवाय लीना कदापि राहाणार नाहीं हें त्यांना पक्कें ठाऊक होतें. आणि म्हणूनच या नवीन संकटांतून मुक्त होतांना त्यांना 'त्राहि' आठवलें; कारण जें कारस्थान त्यांनीं मोठ्या कौशल्यानें रचलें होतें तें स्वतःच्या हातानें विस्कटून टाकणें त्यांना फारच दुर्घट गेलें. अशोक क्रांतिकारक असून सरकारसत्ता उलथून पाडणाऱ्यांचा प्रमुख आहे अशी भुमका उठवणें त्यांना जितकें सोपें गेलें तितकेंच तो निरपराधी असल्या-मुळें त्याची मुक्तता झाली पाहिजे आणि ती देखील चोवीस तासांच्या आंत झाली पाहिजे असा आग्रह धरून तो खरा करणें कठीण होतें.

परंतु वर्तनाची केवढीहि विसंगति पत्करायला ते तयार होते. म्हणूनच त्यांनीं आपलें वित्त,मान,सत्ता सारें कांहीं इरेला घातलें. जें कार्य इतक्या सायासांनीं केलें तें आज त्याच हातांनीं मोडावें लागत आहे हें विरोधी दृश्य त्यांना भयंकर जाचक झालें. कारण त्यामुळें एकाच दिवसांत त्यांची सरकारदरबारांतील प्रतिष्ठा किती तरी खालीं उतरली. पण शेवटीं त्यांना यश आलें. चौकशीचें नाटक करण्यांत येऊन शेवटच्या घटकेला त्याला सोडण्यांत आलें.

डोळ्यांत प्राण सांठवून लीना अशोकची वाट पहात बसली होती. ज्या

बेफाम अवस्थेंत ती घरांतून बाहेर पडली त्याच स्थितींत ती अद्याप होती. निराशेचे झटके तशांतच तिला येऊन जात. देशकार्यामुळें ती अशोककडे आकर्षित झाली होती आणि मग प्रेमानें तिच्यावर मोहिनी टाकली होती. हे दोन प्रांत तिला वेगळे करतां येत नव्हते. हे दोन धागे एकजीव होऊन तिच्या जीवनाचा नवा धागा बनला होता. प्रणय कीं देशकार्य हा आतां प्रश्न नव्हता. या दोन्ही भावना तिच्या रक्तांतून खेळूं लागल्या होत्या. आणि याचमुळें अशोकला पकडण्यांत येऊन क्रांतिकारकत्वाचा आरोप त्याच्यावर ठेवण्यांत आला आहे असें तिला कळलें, तेव्हां तिच्या स्वभावांत क्रांति झाली. ती निर्भय व निष्ठुर झाली. तिला स्वतःचें जीवन मातीमोल वाटलें व वडिलांच्या जीवनालाहि तिनें तीच किंमत दिली. अशोकनें तिला जीवनाचा खरा अर्थ दाखवून दिला होता. ती तत्त्वप्रांगणांत तरळत होती. तिच्या मनांत जें अनिश्चित होतें तें त्यानें निश्चित केलें होतें. समोरचें धुकें नष्ट केलें होतें. दिशा स्पष्ट केल्या होत्या. त्याचें कर्तृत्वशाली व्यक्तित्व तिला दिसलें नसतें तर तिचें मन तत्त्वचिंतनांतच कुढत राहिलें असतें. त्याच्या ध्येयवादानेंच तिला स्फूर्ति मिळाली होती. तिच्या गात्रांना चेतना मिळाली होती. घरच्या वातावरणाचीं बंधनें तोडून टाकणें तिला शक्य झालें होतें. कुटुंब, धर्म, समाज, भावना, विकार, या सगळयांच्या वर जाऊन आपल्या अंतरात्म्याला प्रतीत होणारें सत्य शोधण्याची प्रचंड धडपड ती करूं लागली होती.

अशोक तुरुंगांतून मुक्त होतांच लीनेच्या भेटीसाठीं धांवला. ती पंणजीलाच आपल्या एका मैत्रिणीकडे उतरली होती. आणि सुटका होतांच आपल्याला येऊन भेटण्याबद्दल तिनें त्याला आधींच कळवून ठेवलें होतें.

अशोकवर नजर पडतांच तिच्या मनाचा तोल सुटला. ती उठली व धांवत जाऊन तिनें दारांतच त्याला आलिंगन दिलें. आणि आपल्या अंगांतील सगळया शक्ती अकस्मात् लुप्त झाल्यासारखें होऊन तिला ग्लानि आली.

अशोकनें तिला सांवरून खाटेवर आणून निजविलें. आनन्दाच्या अतिरेकानें तिला असें झालें असेल किंवा गेल्या दिवसांत तिच्या मनावर जो प्रचंड ताण पडला होता तो अकस्मात् गेल्यामुळें तिला असें झालें असेल या विचारानें तो भ्याला नाहीं.

लवकरच तिनें डोळे उघडून त्याच्याकडे पाहिलें. तिची मुद्रा आतां किती पालटली होती ! प्रसूतिकाळीं मृत्यूचें ग्रहण लागून विव्हळणारी स्त्री सुटकेनंतर अर्भकावर नजर पडतांच उत्तेजित होते आणि मुद्रेवरची उदास अन् भयाण कळा जाऊन तेथें मुग्धमधुर भावनांचें सतेज आणि सुरम्य नृत्य चालू होतें, तसेंच स्थित्यंतर या वेळीं लीनेच्या मुद्रेवरहि दिसून आलें. नव्या चिरवांछित जगांत पहिल्या प्रथम पाऊल टाकल्याचा तिला भास झाला. तिचा अशोक, तिचें देशकार्य, सारें सारें नवीन आशामय प्रकाशांत चमकूं लागलें. ती उल्हसित झाली.

ती उठून बसली. जणूं काय थोड्या वेळापूर्वी तिला ग्लानि आलीच नव्हती. दुःस्वप्नांतून माणूस उठावें व आसपास त्याला गोड सत्यसृष्टि दिसून यावी तसेंच तिला झालें. तिनें म्हटलें, 'शेवटीं आलांत तुम्ही, अशोक ? '

त्यानें ' हो. ' म्हटलें.

पण लीनेनें कोणतें दिव्य केलें हें मात्र त्याला कळलें नाहीं.

लीनेचा हात प्रेमभरानें दाबून त्यानें म्हटलें, 'घडलं तें स्वप्न होतं...

' पण दिसतं तें स्वप्नंच ठरणार नाहीं ना, अशोक ?...'

अशोकनें तिच्या तोंडावर हात ठेवला.

इतक्यांत दारांत उभा असलेला राम गावडा त्यांच्या दृष्टीस पडला. त्याचा काळा कुळकुळीत चेहरा आनंदानें फुलून आला होता. अशोकच्या सुटकेचा हर्ष त्याच्या सर्वांगांत जणूं काय संचारला होता.

तो खोलींत आला. गावड्यांच्या कामासाठीं अशोक अटकेंत पडला, अशीच त्याची कल्पना होती. त्याची मुक्तता व्हावी म्हणून गावड्यांनीं

सत्यनारायणाचें व्रत आज साजरें करण्याचें ठरविलें होतें आणि सत्य-नारायणाच्या कृपेनेंच त्याची ही अशी त्वरित सुटका झाली असें त्याला वाटत होतें. त्यानें निमंत्रण देतांना म्हटलें, 'आज तुम्ही सत्यनारायणाला आलें पाहिजे.' त्यानें प्रेमाचा अधिकार गाजविला.

अशोकनें संमतीसाठीं लीनेकडे पाहिलें. जावें कीं न जावें असा संदेह त्याच्या चेहऱ्यावर घुटमळत असलेला पाहून रामानें म्हटलें, 'बाबा, आम्हीं सत्यनारायण पुजण्याचं काल ठरवलं आणि आज तुमची सुटका झाली. तुम्ही देवाला नमस्कार केलाच पाहिजे. तुमच्याच कृपेनें आम्हाला नवीन घरं मिळत आहेत. हिंदु झाल्यानंतरचा आमचा हा पहिलाच समारंभ आहे.' तो अंतःकरणपूर्वक बोलत होता.

अशोकनें आमंत्रण स्वीकारलें. दोघांनींहि संध्याकाळीं जाण्याचें ठरविलें.

रामानें त्यांचा निरोप घेतला.

संध्याकाळीं दोघेंहि मोटारनें..ला आलीं. गावड्यांनीं वाड्याच्या मध्यभागीं पोफळीच्या गोल खोडांचे खांब मध्यें पुरून व माडांच्या झावळ्यांचें सपाट छप्पर घालून मोठा मंडप तयार केला होता. जमिनीवर बांबूचें हातर पसरलें असून त्यावर शेंकडों स्त्री-पुरुष बसले होते. समोर सत्यनारायणाची मोठी तसबीर लावली होती. तिच्या भोंवतीं फुलांच्या माळा घातल्या होत्या. केळींचीं झाडें दोन्हीं बाजूला उभीं केलीं होतीं. मृत्तिकेचे जलकलश तेथेंच ठेवले होते. जायांच्या सरांनीं मांडव शृंगारला होता.

त्या जमावांतून जो कोलाहल निघत होता त्यांत गावड्यांच्या उल्हासाचें प्रतिबिंब पडलें होतें. त्यांचे काळे कुरूप चेहरे प्रफुल्ल दिसत होते. जाईचा सुवास वातावरणांत भरून राहिला होता.

लीना व अशोक दृष्टीस पडतांच त्या जमावांतून हर्षाची लाट नाचत गेली. त्यांना पहाण्यासाठीं स्त्रीपुरुषांची केवढा वेळ तरी धडपड चालली होती.

त्यांना बसण्यासाठीं स्वतंत्र बैठक तयार केली होती. तेथें रामा

गावड्यानें त्यांना नेऊन बसवलें. अडाणी, निरक्षर समाजाच्या निर्धाराचें प्रतीत असें तें दृश्य पाहून अशोकच्या मनांत कितीतरी विचार येऊन गेले. श्रद्धा आणि त्याग या दोन गोष्टींच्या जोरावर त्या समुदायानें केवढें दिव्य पार पाडलें होतें! सरकार, जमीनदार, इत्यादि सगळयांच्या रोषाची पर्वा न करतां त्यांनीं आपलें ईप्सित साधलें होतें. आणि कोणतीच श्रद्धा नाहीं, निर्धार नाहीं, संघटना नाहीं, म्हणून श्रेष्ठ समाज पारतंत्र्यांत खितपत पडला होता.

अशोकच्या मनांत हे विचार चालले असतांना लीनेच्या भावना वेगळयाच दिशेनें वावरत होत्या.

ती आतां ग्रामीण हिंदु वातावरणांत आली होती. त्या सगळया दृश्यांचा परिणाम हळूहळू तिच्या मनावर होत गेला. मंत्रमुग्धाप्रमाणें डुलणारीं तीं शेकडों माणसें, मंगल वाद्यांचे ते स्वर, लतापल्लवांनीं व केळीच्या झाडांनीं शृंगारलेला तो मंडप, इत्यादि दृश्य पाहून तिला वेगवेगळयाच संवेदनांचा अनुभव आला आणि तिचें हृदय एका गोड कल्पनेनें पुलकित झालें.

इतक्यांत रामा गावड्याची बायको सीता तिच्यापाशीं आली. तिच्या कपाळाला तिनें कुंकू लावलें. तिच्या केसांत जाईची वेणी घातली. आणि त्याबरोबर एका नव हिंदूच्या त्या स्पर्शानें आपण जणूं काय हिंदु होत आहों अशा गाढ भावनेनें लीनेचे नेत्र चमकले. तिच्या चेहऱ्यावर लाली पसरली आणि मनाच्या गोंधळलेल्या गोड अवस्थेंत तिनें अशोककडे पाहिलें.

त्यानेंहि सुहास्य मुद्रेनें तिच्यावर आपले डोळे स्थिर करीत हळूच म्हटलें, ' लीना, तूं आतां हिंदु झालीस!'

हे उद्गार कानावर पडतांच अशोकच्या हृदयावर मान ठेवून पूर्ण एकांतांत खूप रडावें, खूप हंसावें, अशी विचित्र इच्छा तिच्या मनांत उदित झाली आणि सकंप आवाजांत तिनें म्हटलें, 'अशोक, आपण थोडें फिरून येऊं.'

तीं उठलीं. त्यांच्यासाठीं मुद्दाम तयार केलेल्या झावळ्यांच्या पर्णकुटींत रामानें त्यांना आणून सोडलें. त्यांनीं थोडा फराळ केला आणि कांहीं वेळानें मांडवीच्या घाटावर दोघेंहि फिरायला निघालीं.

लीनेची मनःस्थिति फार विचित्र झाली होती. परस्पर विरोधी भावना-विकारांचा ती एकाच वेळीं अनुभव घेत होती. वडिलांच्या प्रेमाचा धागा तिनें आपणहून तोडला होता. पण त्याची उणीव भरून काढील असा दुसरा धागा अजून पुरा तयार झाला नव्हता. घरचा आसरा तिनें सोडला होता; पण हक्काचा नवा निवारा अजून तिला लाभला नव्हता. त्यामुळें अधांतरीं राहून पंखांची फडफड करणाऱ्या निर्गृह पाखरांसारखी तिची गत झाली होती, किंवा असेंहि म्हणतां येण्यासारखें होतें कीं, तिचें जीवित झोके खात होतें. क्षणांत ती आकाश गांठी तर क्षणांत तिचे पाय जमिनीला लागत. या दोन्ही स्थितींत हेलकावे खातांना तिचें मन भीतीनें थरकून जाई. पण क्षणांत धैर्याची, उन्मादाची, धुंद अवस्था उत्पन्न होई व सगळीं संकटें तिला अगदीं क्षुल्लक वाटत.

मनाच्या या अवस्थेंतच ती अशोकबरोबर मांडवीच्या तीरावर आली.

अशोकला लीना कितीतरी सुंदर दिसली. पण तें सौंदर्य रजपूत रमणीचें आहे असें त्याला वाटलें. तिच्या उदात्तरम्य चेहऱ्याला ठसठसीत कुंकुम तिलकानें वेगळीच छटा प्राप्त झाली होती. गेल्या कांहीं महिन्यांच्या कालावधींत तिची वृत्ति हळूहळू लढाऊ बनत चालली होती व तिचेंच प्रतिबिंब तिच्या मुद्रेवर पडलें होतें. त्यामुळें तिच्या स्वाभाविक माधुर्याला व आकर्षकतेला मुळींच बाध आला नव्हता. उलट तिच्या सौंदर्याला उदात्ततेचा साज चढला होता. अशोकच्या दृष्टीला तो फारच हृदयंगम वाटला आणि त्यानें म्हटलें, 'आतां तू वीरबाला शोभतेस, लीना.'

'हा तुझ्याच पायांचा प्रसाद आहे, अशोक.' तिनें उत्तर केलें.

हळदी रंगाची अन बिनकिनारीची साडी तिनें परिधान केली होती.

तिच्या विशिष्ट पद्धतीप्रमाणें केंस फुगीर करून त्यांचें वलय आपल्या कपाळाभोंवतीं तिनें तयार केलें होतें. तिच्या कानांत नेहमीं झुलत्या कर्ण-फुलांऐवजीं दोन टपोरें मोतीं शोभत होते. गळ्यांतहि मोत्यांचाच सर होता. त्यामुळें तिच्या गळ्याची कांति व डौल यांना अधिकच उठाव मिळाला होता. तिची काया सडपातळ होती; तरीहि तिचे उरोज व विस्तृत नितंब यांच्यांतून तिच्या यौवनाचा बहर फुलून आला होता.

अशोकची दृष्टि तिच्या या लावण्यावर स्थिर झाली आणि तिच्या या मार्मिक उत्तराला प्रत्युत्तर देण्याचें भान त्याला राहिलें नाहीं. पण घटकाभरानें त्यानें म्हटलें, 'तूं वीरबाला शोभावीस अशीच तुझी कृति आहे.'

' असं काय केलंय मीं, अशोक ? ' लीनेनें प्रश्न केला.

' तूं वडिलांशीं भांडलीस... '

'एवढंच ना ? अजून कितीतरी शक्तींशीं भांडायचं आहे मला.' ती म्हणाली.

'त्यागाची प्रचंड तयारी करूनच तू घरांतून बाहेर पडली आहेस.' तो तिला खुलवण्यासाठीं म्हणाला.

' माझी त्यागाची तयारी असली तर ती तुझ्याच स्फूर्तीनें झाली आहे. त्या दिवशीं तुझ्यावर पपांनीं पिस्तूल रोखलं त्या वेळीं माझ्या अंगांत जें धैर्य संचरलं, तें तूंच दिलं नाहींस का मला ? अन्...' ती पुढें कांहीं तरी बोलणार तोंच तिनें जीभ आवरती घेतली.

'अशी थांबलीस कां तूं, लीना?' अशोकनें अधीर होऊन विचारलें. तिला सांगायचें होतें, आपण पपांना कोणता निर्वाणीचा खलिता दिला आणि त्याचा काय परिणाम झाला. तें पण तसें करण्यांत आपण आत्मप्रौढी करीत असल्यासारखें वाटल्यामुळें ती गप्पच राहिली.

' सांगत नाहींस ना तूं मला ? ' त्यानें लटक्या रोषानें विचारलें.

' त्यांत एवढं रागावण्यासारखं कांहींच नाहीं, अशोक. '

' मग सांग तर... ' त्यानें आग्रह चालू ठेवला.

‘तुझ्याविरुद्ध भयंकर आरोप होते.’

‘गावड्यांचा पुरस्कार हाच ना ?’ त्यानें प्रश्न केला.

‘नाहीं. क्रांतीचे, कटाचे, असले भयंकर आरोप ठेवून तुला पकडलं होतं.’

आणि मग तिनें साद्यंत हकीकत त्याला निवेदन केली. ती ऐकून लीना केवढ्या साहसाला प्रवृत्त झाली होती याची त्याला कल्पना झाली.

तो म्हणाला, ‘पेरैरांनीं मला सोडवल नसतं तर केवढा अविचार करून बसणार होतीस तूं, लीना ?’

‘आणि त्यांनीं तुला सोडवलं नसतं तर केवढा घात होणार होता माझा !’ तिनें संकटाच्या कल्पनेनं अंग शहारल्यासारखं करून म्हटलें.

अशोकला तिच्या तोंडचें हें उत्तर ऐकून समाधान वाटलें. आपल्या प्रेमासाठीं लीना आत्मदान करायला तयार झाली ही जाणीव त्याला सुखद झाली.

‘लीना, ही तुझी साहसी वृत्ति आम्हांला पुढं फार उपयोगी पडणार आहे.’

त्याच्या बोलण्याचा रोख लक्षांत येऊन तिनें म्हटलें, ‘साहसानंच आतां आपण पुढची उडी घेतली पाहिजे.’

‘गोमंतकाचं दर्शन घ्यायचं आपण ठरवल होत; नाहीं का ?’

‘पुरं झालं तें दर्शन आतां, अशोक. कृतीसाठीं आतां आपण तयार झालें पाहिजे. गोमंतकाच्या दारिद्र्याचं, दुबळेपणाचं जें दर्शन आपण घेतलं तेवढ्यावरून आपणाला पुढचा निश्चय करतां येईल.’ लीना म्हणाली.

नीलाकाशांत आतां चंद्रकोर उगवत होती. त्या क्षीण मंद प्रकाशांत आसपासचा विस्तीर्ण देखावा अंधुक दिसत होता.

मांडवीचें विशाल पात्र आतां भयाण दिसत होतें. तिचा प्रशांत प्रवाह आतां ओहोटीनें अगदीं रोडावला होता. त्यामुळें काळाभोर चिखल, त्यांत रुतून बसलेल्या लहानमोठ्या अनेक होड्या व अस्थिपंजर झालेल्या माणसाच्या डोळ्याप्रमाणें भासणारा तो प्रवाह, हें दृश्य अगदीं

भयाण होतें. त्यावर नजर रोखून अशोक म्हणाला, ' आमच्या गोमंतकाचें हें दर्शन आहे. '

' खरंच. आमच्या समाजाचा जीवनप्रवाह असाच आटून गेला आहे. '

' भोंवतालचा निसर्ग किती समृद्ध आहे पहा! ' त्यानें म्हटलें.

आणि त्याचे नेत्र आसपासच्या नारळीच्या राया, सभोंवतालचीं शेतें, त्यांत दिसणारीं मिठागरें, त्यांच्या मागच्या डोंगरांच्या ओळी आणि निळें रत्नखचित आकाश, यांवर क्रमाक्रमानें स्थिर होत गेली.

'अशोक, आपल्याला निराश व्हायचं कारण नाहीं. सुकती आतां संपली आहे. '

'चारशें वर्षांची सुकती... ! किती राक्षसी !... ' अशोकच्या तोंडून उद्गार निघाले.

'राष्ट्राचं आयुष्य दिवसांनीं मोजायचं नसतं, अशोक. '

'आतां भरती येईल म्हणतेस तूं ?' अशोकनें आशापूर्ण स्वरांत विचारलें.

' हो. ती पहा, भरती आतां सुरू झाली आहे. त्या पहा होड्या आतां वरच्या दिशेनें वाहूं लागल्या. चंद्राची कोर आतां स्पष्ट झाली. कोळी लोकांचे साद, हे पहा, कानावर पडत आहेत. अशोक, हीं सगळीं शुभचिन्हं आहेत. ' लीना उल्हसित होऊन म्हणाली. तिच्या मनांत व गात्रांत भरतीच्या लाटा चढूं लागल्या होत्या. त्यामुळें तिला सगळें आशादायक दिसत होतें.

सत्यनारायणाचा कोलाहल अजून कानावर आदळत होता. मंडपांतील बत्त्यांचे झगझगीत झोत नारळीच्या झाडींत मजेदार रीतीनें हलत होते. अधूनमधून वाद्यांचे स्वरहि ऐकूं येत. आणि हें सारें अशोकच्या मनांत हुरहूर उत्पन्न करी.

थोडा वेळ कुणीच कांहीं बोललें नाहीं. लीनेच्या मनांत फिरून भावनांचें चक्र फिरूं लागलें. तें तिला आवरेना. त्या आवेगांत ती बोलूं लागली:

' अशोक, मी सगळं सोडून तुझ्याकडे आलें आहें.' तिच्या स्वरांतला कंप आणि असहायतेचा भाव अशोकचें काळीज कापून गेला. त्याबरोबर त्यानें तिला जवळ ओढली. तिनें केलेल्या त्यागामुळें तिला आतां एकाकी वाटलें असेल अशी त्यानें समजूत करून घेतली.

' लीना, माझ्या लीना, तूं कां भितेस अशी ?'

'मी कुणाला भीत नाहीं. पण एकदां असं वाटतं, मीं काय करून बसलें ?'

' तुला पश्चात्ताप होतो का ? ' अशोकनें प्रश्न केला.

' नाहीं. हा पश्चात्ताप नाहीं. ही आनंदाची परिसीमा आहे.' भावनेचे जणूं काय झटके आल्याप्रमाणें ती बोलत होती. तिच्या डोळयांच्या कडांत अश्रू चमकूं लागले, आणि तिचे ओठ सूक्ष्म रीतीनें कांपूं लागले. अशोकनें तिला दंडाला धरून आपल्याजवळ ओढली आणि म्हटलें, ' होय. तूं किती सोसलंस! पपांचा त्याग केलास, समाजांतील मित्रमंडळींकडे पाठ फिरविलीस आणि शेवटीं घरच्या संपत्तीवर लाथ मारलीस!'

'नाहीं, अशोक, ही शेवटची गोष्ट मी कधीं करणार नाहीं. वाडवडिलांच्या संपत्तीवर लाथ मारणार नाहीं. माझा हिस्सा मी अवश्य घेईन. आमच्या कार्यासाठीं तो आम्हांला हवा आहे, अशोक. मूर्खासारखा असा त्याग मी कसा करूं ? खंबीर पायावर आतां आपल्याला नव गोमंतकाची उभारणी करायची आहे. त्यासाठीं संघटना केली पाहिजे. हें काम पैशाचं आहे....'

अशोकला तिचें म्हणणें पटलें. त्याच्या वडिलांनीं त्याला ठेवलेले दहा हजार रुपये त्यानेंहि त्याच कार्यासाठीं राखून ठेवले नव्हते काय ? या गोष्टीची त्याला आठवण झाली आणि लीनेचा जो संकल्प तिला पहिल्या प्रथम स्वार्थी दिसला, तोच त्याला आतां कितीतरी उदात्त वाटला आणि आयुष्याच्या पुढच्या टप्प्यांत आपल्याला जें प्रचंड कार्य करावयाचें आहे त्याला आपल्याला सबळ आधार मिळेल या कल्पनेनें त्याला धीर आला.

चांदणें आतां स्वच्छ झालें होतें. भरतीचा प्रवाह वाहतांना आतां स्पष्ट दिसत होता.

आयुष्यांतील एक मोठा टप्पा आपण आज गांठला असेंच दोघांनाहि वाटलें. पूर्वी जेथें गोंधळाचें धुकें पसरलेलें त्यांना दिसत होतें तेथें त्यांना आतां त्या गोंधळाची कारणपरंपरा निश्चितपणें कळून आली होती. आतां पुढच्या दिशा उजळल्या होत्या. पुढें पाऊल टाकायचाच अवकाश होता.

या कार्यनिश्चितीबरोबरच त्याचें प्रणयी जीवन सपत आलें होतें. प्रणयाचा जो सूक्ष्म प्रवाह देशप्रेमाच्या प्रबल प्रवाहाच्या अनुरोधानें वहात होता त्याचें अस्तित्व संपून वेगळ्या स्वरूपांत तो आतां परिणत होत होता. याची जाणीव दोघांनाहि झाली होती. अशोक अटकेंतून मुक्त होऊन तिच्या भेटीला आला होता त्या वेळीं तिनें त्याला जें आलिंगन दिलें होतें त्यांतच परस्परांना हा पालट जाणवला होता. या वृत्तीची परिपूर्ति होण्याची वेळ आतां आली होती

चंद्रप्रकाशांत त्यांना एकमेकांचे चेहरे दिसूं लागले. पुढच्या उज्ज्वल दृश्यानें ते फुलून आले होते. त्यांच्यावर कृतकार्याचें समाधान होतें. भावी कार्याचे आशादीपक तळपत होते. प्रेमभावाच्या उत्कट पहिल्या छटा त्यांतच मिसळल्या होत्या. आपल्या समाजाच्या उज्ज्वल भवितव्यावरील श्रद्धा तेथें चमकत होती. आणि हातांत हात गुंफून यशोमंदिराच्या दिशेनेंच आपण चालत जाऊं हा आत्मविश्वास तेथें विलसत होता.

निसर्गाच्या त्या प्रशांत एकांतस्थानीं त्यांच्या प्रेमभावनांना बहर आला. आतांपर्यंत प्रणयाचे खेळ निर्वेधपणें खेळण्याइतकें स्वारस्य व शांति त्यांना लाभली नव्हती. एकाद्या शीघ्र प्रवाहाप्रमाणें त्यांचा जीवनक्रम व्यतीत झाला होता. प्रणयभावना रंगांत येई तेव्हां संयम आडवा येत होता. एका प्रमुख प्रवाहांत दुसरा क्षीण प्रवाह वहात असावा आणि मधून मधून या दोन प्रवाहांनीं जलपृष्ठावर आपलें अस्तित्व दाखवावें असेंच त्याचें झालें होतें.

आतां स्थलकालाची मर्यादा त्यांनीं गांठली होती. विवेकाला स्थान नव्हतें. संयम अविचाराचा ठरणार होता. दोघांच्याहि मनांत एकच प्रबळ भाव आतां भरून राहिला होता.

खालीं नदी, पुढें विस्तीर्ण शेत, वरती आकाश, या निसर्गाच्या अगदीं साध्या वेषांत स्तब्धता निजली होती. ही गूढ सर्वव्यापी शांतताच आपल्या प्राणाप्राणांस व गात्रागात्रांस आवाहन करीत आहे असाच दोघांनाहि भास झाला. आतां चर्चेला, वादविवादाला मनाच्या अवकाशांत जागा नव्हती. प्रेमाच्या धुंद धूसर धुक्यांत दोघेंहि गुरफटून गेलीं होतीं. एकच संवेदना त्यांच्या अवयवांना स्फुरण देत होती. पण गाढ प्रेमाच्या परिपूर्तीचे क्षण किती विचित्र असतात !

आतां शब्द सरले होते. मौन बोलत होतें. एकाच प्राणाच्या कोशांत दोन जीवांचें स्पंदन चाललें होतें. जीव अगदीं हळुवार झाले होते व वृत्ती तरलतर झाल्या होत्या. कल्पनेचे पख करून जणूं स्वर्गांत उड्डाण करावें व जमीन विरत जावी असें त्यांना झालें होतें.

अशोकनें तिच्या कंबेरभोवतीं हात घालून तिला अगदीं जवळ ओढली आणि हळूच तिच्या कानांत तो पुटपुटलाः

'तूं आतां हिंदु झालीस, लीना.'

'तुझ्यासाठीं, अशोक, तुझ्यासाठीं.' तिनें आत्मार्पणाच्या वृत्तीनें म्हटलें.

अशोकनें तिला आपल्या बाहुपाशांत घेतलें. तिचें मस्तक हृदयाशीं आवळलें आणि तिची मान वर करून तिच्या स्फुरणाऱ्या मुखाचें दीर्घ चुंबन घेतलें आणि त्या क्षणांत आपल्या गतायुष्यांतील सारी कटुता विरत चालली असून सगळ्या विश्वांत अवघें माधुर्यच भरून राहिलेलें आहे आणि प्राणांचीं इंद्रियें करून त्याचाच आपण आतां पूर्ण आस्वाद घेत आहोंत, असा त्यांना भास झाला.

# देशमुख आणि कंपनीचीं प्रकाशित पुस्तकें

## वि. स. खांडेकर.

| | | |
|---|---|---|
| १ | फुलें आणि दगड | ३ |
| २ | घरट्या बाहेर | ३ |
| ३ | पहिली लाट | ३ |
| ४ | स्त्री आणि पुरुष | २ |
| ५ | सूर्य कमळें | २॥ |
| ६ | कालचीं स्वप्नें | ३ |
| ७ | आजचीं स्वप्नें | ३ |
| ८ | चंदेरीं स्वप्नें | ४॥ |
| ९ | कलिका | २। |
| १० | सोनेरी सांवल्या | २। |
| ११ | मृगजळांतील कळ्या | २॥ |
| १२ | सुवर्णकण | २। |
| १३ | मंजिऱ्या | २। |
| १४ | सायंकाळ | २॥ |
| १५ | अविनाश | १॥ |
| १६ | मंदाकिनी | १॥ |
| १७ | चांदण्यांत | २ |
| १८ | कल्पलता | ३ |
| १९ | सहा भाषणें | २ |
| २० | तीन संमेलनें | २॥ |
| २१ | फुलें आणि कांटे | २। |
| २२ | मराठीचा नाट्य संसार | ३ |
| २३ | हिरवा चांफा | ५ |
| २४ | दोन ध्रुव | ५ |
| २५ | उल्का | ४॥ |
| २६ | पहिलें प्रेम | ४॥ |
| २७ | दोन मनें | ६॥ |
| २८ | क्रौंच वध | ५ |
| २९ | पांढरे ढग | ४। |
| ३० | जळलेला मोहोर | ३ |
| ३१ | तुरुंगांतील पत्रें भाग १ | २ |
| ३२ | तुरुंगांतील पत्रें भाग २ | ३ |

## वि. स. खांडेकर यांनीं संपादन केलेलीं पुस्तकें

| | | |
|---|---|---|
| ३३ | आगरकर व्यक्तिविचार | ३॥ |
| ३४ | वा. म. जोशी व्यक्ति | ४॥ |

## शालेय वाङ्मय

| | | |
|---|---|---|
| ३५ | नवे किरण | १। |
| ३६ | काव्य ज्योती | १। |
| ३७ | अग्निनृत्य | १। |
| ३८ | मुक्या कळया | १। |
| ३९ | इंद्र धनुष्य | १। |
| ४० | गुदगुल्या | १। |

## साने गुरुजी

| | | |
|---|---|---|
| १ | पुनर्जन्म | ३ |
| २ | आस्तिक | ३ |
| ३ | संध्या | ५ |
| ४ | ना खंत ना खेद ( कृष्णा हातीसिंग ) | ५ |
| ५ | सोन्यामारुती | २ |
| ६ | निळा पक्षी | २॥ |

७ गोड निबंध भाग १ — ३
८ गोड निबंध भाग २ — ३
९ गोड निबंध भाग ३ — ३
१० चिंतनिका भाग १ — ६॥

**आवडत्या गोष्टी भाग १ ते ४**

११ आपण सारे भाऊ — १।
१२ गोप्या — १
१३ दुर्दैवी — १॥
१४ मिरी — १॥

**ग. त्र्यं. माडखोलकर**

१ अवशेष — २
२ व्यक्तिरेखा — २।
३ माझी नभोवाणी — २
४ नवे संसार — ४
५ चंदनवाडी — ६॥
६ नागकन्या — ५
७ कांता — ५
८ दोन तपें — ५

**ना. धों. ताम्हनकर**

१ तात्या भाग १ ला — ४
२ तात्या भाग २ रा — ३
३ निवाडे भाग १ ला — २॥
४ निवाडे भाग २ रा — ४
५ वडिलांचे सेवेशी — ४॥
६ गुजाताई — ६
७ संतू — २
८ चकमकी — १॥
९ बच्चा नवरा — १॥
१० अनेक आशीर्वाद — ३॥
११ दाजी भाग १ ला — ३॥
१२ बहीण भाऊ — -॥।-

**वा. म. जोशी**

१ स्मृति लहरी — २
२ विचार लहरी — २।
३ विचार विहार — ४।

**चिं. वि. जोशी**

१ आणखी चिमणराव — ४
२ वायफळाचा मळा — ५
३ नवें भारुड — २
४ स्टेशनमास्तर — २
५ गुंड्याभाऊ — ४
६ लंकावैभव — ४॥
७ नटश्रेष्ठ — -॥।-

**दत्तु बांदेकर**

१ सख्या हरी — २
२ नवी आघाडी — २
३ तूं आणि मी — २।
४ नजरबंदी — २।
५ अमृतवाणी — ३

**प्र. के. अत्रे**

१ साखरपुडा — २
२ ललित वाङ्मय — ३॥
३ दूर्वा आणि फुलें — २।
४ हास्यकथा — ४॥

**ना. म. पटवर्धन**

१ हितपत्रें — ३
२ वा. म. जोशी चरित्र — ४।